# गूढबंध

(लोकसंस्कृतीवरील लघुनिबंध)

डॉ. जयंती नायक




8338
Short essays
JAY



# गूढबंध

(लोकसंस्कृतीवरील लघुनिबंध)

डॉ. जयंती नायक

प्रकाशन क्र. : २८

प्रथमावृत्ती : २०१९

© डॉ.जयंती नायक

मुद्रण :
रिया ग्राफिक्स,
ओल्ड गोवा,
तिसवाडी, गोंय

मुखपृष्ठ :
श्रीधर कामत बांबोळकर

प्रकाशक :
अवधूत आमोणकर
राजाई प्रकाशन,
आमोणे, केपे, गोवा
गोवा-४०३७०३
मो. ९८२३५७५६२३
ईमेल : jaynaikamona@gmail.com

मुल्य : ₹ २००/-

# GUDABANDH

(Short Essays on Folk-Culture)

Dr. Jayanti Naik

Publication N0. : 28

First Publication : 2019

© Dr. Jayanti Naik

Printing :
Riya Grphics
Old Goa,
Tiswadi, Goa

Cover :
Shridhar Kamat Bambolkar

Publisher :
Avadoot Amonkar,
Rajaee Prakashan,
Amona, Quepem,
Goa- 403705
M. 9823575623
E-mail : jaynaikamona@gmail.com

Price : ₹ 200/-



*या जगातील गूढ, अगम्य, अनाकलनीय गोष्टींमागचे*
*रहस्य जाणून घेण्याची माझ्या मनात*
*जिज्ञासा जागवली त्या सर्व ज्ञात- अज्ञातांना...*
*- जयंती*



# प्रकाशकाचे शब्द

'गूढबंध' हे डॉ. जयंती नायक यांचे लोकसंस्कृती विषयावरील लेखांचे मराठी भाषेतील पुस्तक प्रकाशीत करताना आम्हाला खूप आनंद होत आहे. डॉ. नायक या कोंकणी भाषेतील सुप्रसिध्द साहित्यिक आणि लोकसंस्कृतीच्या संशोधक. गेली तीस-पस्तीस वर्षे त्या या क्षेत्रात कार्यरत आहेत. प्रज्ञा आणि प्रतिभेचं देणं लाभलेल्या या लेखिकेची आतापर्यत आम्ही एकूण सतरा पुस्तके प्रकाशीत केलेली आहेत. त्यातील सगळीच पुस्तके कोकणी भाषेत लिहिलेली आहेत परंतू हे गूढबंध पुस्तक मराठी भाषेतील असून आमच्या प्रकाशनाचे हे दुसरे मराठी पुस्तक. यापूर्वी आम्ही त्याच्याच 'मृद्‌वेणा' या कविता संग्रहाच्या डॉ. सिसिलिया कार्वाल्हो यांनी केलेल्या मराठी अनुवादाचे पुस्तक प्रकाशीत केलेले आहे.

भारतीय संस्कृती ही जटील, तिची मूळं खूप खोलांत आहेत. असंख्य विचारधारांनी ती प्रभावीत आहे. त्यांत कित्येक अगम्य अशा गोष्टींचा समावेश आहे. या विज्ञानयुगातही अशा गोष्टी समाज मनावर आपली पकड ठेऊन आहेत. मानवाच्या उत्क्रांती पथावर निर्माण झालेल्या आणि आजही समाजात रूढ असलेल्या अशा कित्येक गूढ, अगम्य प्रथा- परंपरांचा मागोवा डॉ. नायक यांनी २०१६ साली लोकमत दैनिकाच्या रविवार पुरवणीतून लिहिलेल्या 'गूढबंध' या लेखमालेतून घेतला. वाचकांकडून प्रचंड प्रतिसाद मिळालेल्या आणि शोधमुल्ये असलेल्या ह्या लेखमालेचे लिखाण आज आम्ही पुस्तकरुपाने प्रकाशीत करीत आहोत. फक्त गोमंतकीयच नाही तर एकंदर लोकसंस्कृतीच्या आणि समाज विज्ञानाच्या अभ्यासकांसाठी हे पुस्तक एक महत्वपूर्ण संदर्भग्रंथ ठरेल, तसेच यांतील वाचनियता आणि गूढरम्यतेमुळे ते सामान्य वाचकालाही भावेल अशी अपेक्षा आहे.

डॉ. जयंती नायक यांचे मन:पूर्वक अभिनंदन, तसेच पुस्तक निर्मितीत ज्यांनी ज्यांनी सहकार्य दिले, त्या सर्वांना धन्यवाद.

**– प्रकाशक**

मनोगत

# गूढबंध प्रकाशित होताना...

गेली सुमारे तीस वर्षे लोकसंस्कृतीच्या क्षेत्रकामासाठी गोव्यातील खेडोपाडी, डोंगर कपारी फिरताना कितीतरी गूढ, अनाकलनीय, अगम्य अशा प्रथा-परंपरा, रीति-रिवाज, समज - अपसमज लोकांमध्ये रुढ असलेले माझ्या निरिक्षणात आले. किंबहुना ज्याला आज लोकसंस्कृती म्हणण्यात येते तिची निर्मितीच गूढ शक्तीचे अस्तित्व मानण्यातून, तिची कृपादृष्टी प्राप्त करण्याच्या उद्देशातून झालेली आहे हे उमगले. या जगाची उत्पत्ती धरून सभोवताली घडणाऱ्या कितीतरी गोष्टींची उकल आज विज्ञानाने केलेली असली तरी त्या गोष्टींविषयी समाजातील काहीं घटकांमध्ये वेगळ्याच धारणा अजूनही प्रचलीत असलेल्या बघायला मिळाल्या. आदिम मानवाने या जगात घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीचा संबंध गूढ शक्तीशी जोडलेला होता, या विचारधारेचा प्रभाव आजही समाजमनावर काहीं अंशी का असेना परंतू स्थित असलेला दिसला. यातुतंत्र हे आदिम मानवाचे विज्ञानच. त्याच्या आधारे त्याने आपल्या गूढ प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा प्रयत्न केलेला आहे. आजही यातुतंत्राचा उपयोग समाजात होताना बघण्यात आला. आपल्या आदिमानव अवस्थेतून उत्क्रांती होत होत विज्ञान युगात पोहचलेला मानव अजूनही गूढ शक्तीच्या विचारप्रभावातून पुर्णपणे मुक्त झालेला नाही हे उमगले. दृष्य-अदृष्य शक्तीविषयी असलेल्या आणि श्रध्दा-अंधश्रध्देच्या सीमारेषेवर उभ्या असलेल्या कित्येक प्रथा अवलोकनात आल्या. फक्त अशिक्षित समाजातच नाही तर शिक्षित वर्गालाही आपल्या प्रभावात ठेऊन असलेल्या या गूढ, अगम्य , अनाकलनीय गोष्टीं संबधी लिहिण्याचा, त्यांची माहिती वाचक- अभ्यासकांसमोर आणण्याचा विचार बऱ्याच वेळा मनात आला, काहीं निबंध - लेखांमध्ये त्यासंबंधी ओझरते लिहिणेही झाले, परंतू सविस्तर असं लेखन झालं नाही. २०१६ साली लोकमतचे संपादक श्री. राजू नायक यांनी लोकमतच्या रविवार पुरवणीसाठी लोकसंस्कृती विषयावरील एक लेखमाला लिहिण्याचा प्रस्ताव ठेवला आणि तो ठेवताना एक सूचनाही केली, 'काहींतरी वेगळे लिही'. त्यावेळी मी या विषयावर लिहायचा निर्णय घेतला आणि मग 'गूढबंध' ही लेखमाला जानेवारी ते डिसेंबर २०१६ या एका

वर्षभराच्या कालात लिहून झाली. श्रध्दा - अंधश्रध्देच्या बुन्यादीवर उभारलेली, लोकसंस्कृतीवरची ही शोधपुर्ण लेखमाला लिहिताना मला अत्यंत तारेवरची कसरत करावी लागली. कुणाच्या भावना दुखावणार नाहीत ना, कुणाच्या श्रध्देला तडा जाणार नाही ना , यावर लक्ष देतानाच , अज्ञानाचे - अंधश्रधेदेचे माझ्याकडून नकळत सुध्दा समर्थन होणार नाही याचे मला भान राखावे लागले, तरी सुध्दा एक दोन वाचकांच्या आकलन दोषामुळे गैरसमजाचे प्रसंग उद्भवलेच.

लहानपणापासून मला गूढ गोष्टींचे, अद्‌भूत कथांचे आकर्षण. त्यामुळे ही लेखमाला लिहिताना मी स्वत: खूप रमले. पुर्ण वर्षभर मी भारूनच होते म्हटल्यास अतिशोक्ती होणार नाही. या लेखमालेने मला खूप प्रसिध्दी दिली, मोठा वाचकवर्ग दिला. फक्त गोवाच नाही तर सावंतवाडी, कारवार वगैरे भागातूनही मला फोन-पत्रे, मेसेजीस येत होते. सामान्य रोजंदारीवर काम करणारा वाचक ते बुध्दीजीवी प्राध्यापक अशा सर्व थरामधून मला अभिप्राय मिळाले. माझ्या परिसरात मी खूप लोकप्रिय झाले. एकापरीने या लेखमालेमुळे गोव्यातील लोकसंस्कृती विषयाच्या अभ्यासक्षेत्राकडे बघण्याची दृष्टी गंभीर झाली.

आज ही लेखमाला पुस्तकरुपाने प्रकाशीत होत आहे. यांत एकूण ५२ लघुलेख समाविष्ट आहेत. ते मूळ एका लेखमालेसाठी लिहिलेले असल्याने काही तपशील किंवा मुद्यांची पुनरावृत्ती होण्याची शक्यता नाकारता येणार नाही. लोकमतच्या एका मोठ्या वाचकवर्गाने उचलून घेतलेली ही मालिका आता पुस्तकरुपाने एक संदर्भग्रंथरुप घेतेय याचा मला अतिशय आनंद होत आहे. या प्रसंगी मी श्री. राजू नायक, ज्यांनी मला लेखमाला लिहिण्याची संधी दिली, तसेच या पुस्तकाला 'पुरस्कार' लिहिला, त्यांचे मन:पूर्वक आभार व्यक्त करते. तसेच लोकमतचे कार्यकारी संपादक श्री. मयुरेश वाटवे आणि श्री. अनंत साळकार यांचेही लेखमाला यशस्वी होण्यासाठी दिलेल्या सहकार्यासाठी आभार मानते. सहित प्रकाशनाचे श्री. किशोर शिंदे यांचेही खास आभार. तसेच आपल्या संग्रहातून या लेखमालेत तसेच पुस्तकात वापरण्यासाठी काही छायाचित्रे दिल्याबद्दल गोवा कोंकणी अकादेमीचे ही आभार. पुस्तकाचे मुद्रितशोधन केल्याबद्दल सौ. आरती सरदेसाई नायर यांचेही आभार.

या पुस्तकाच्या निर्मितीत रिया ग्राफिक्सचे खास योगदान आहे, त्यांचेही मन:पूर्वक आभार. शेवटी, अल्पवेळात पुस्तकासाठी सूचक मुखचित्र काढून देणारे गोव्यातील ख्यातनाम चित्रकार श्री. श्रीधर कामत बांबोळकार यांचे खास ऋणनिर्देश व्यक्त करते.

**- डॉ. जयंती नायक**

# अगम्य, गूढतेचा ध्यास

देश, राज्य असे आपण म्हणतो तेव्हा ते काही उभ्या आडव्या रेघांचे नकाशे नसतात. त्यांना जिवंतपणा येतो तो तेथील माणसांमुळे. माणसांमाणसांमधील परस्परसंबंध, रीतीरिवाज, परंपरा, यातून एक संस्कृती आकार घेत असते. घट्ट मुळे धरलेल्या या संस्कृतीच्या तळाशी अनेकदा दृष्ट अदृष्टासंबंधीच्या गोष्टी फेर धरून असतात. विश्वास-अविश्वासाच्या सीमारेषेवर घुटमळणाऱ्या या गोष्टींचा तेथील स्थानिक लोकमानसावर जबरदस्त पगडा असतो. या गोष्टी, घटना-प्रसंग मागील पिढीकडून पुढील पिढीकडे झिरपत येत असतात. येथील भूमीशी नाते सांगणाऱ्या कला, नृत्य, खाद्य अशा गोष्टींप्रमाणेच त्याचाही एक खास चाहता वर्ग असतो.

भारतात विविध प्रांत, राज्यांत एकाच सारख्या गोष्टी थोडासा तपशील बदलून लोकमानसात रूढ झालेल्या दिसतात. आज वर्तमानात त्या गोष्टी सांगाव्यात तर वैज्ञानिक जाणिवांच्या अभावाचा शिक्का बसू शकतो. अंधश्रद्धेला प्रोत्साहन दिल्याचे खापरही फुटू शकते. पण त्या मागे नेमके काय कारण असू शकते याचा आपल्या विवेकाने अर्थ लावत रसाळ गोष्टींच्या माध्यमातून ते सांगितले तर ते श्रवणीय-वाचनीय होऊ शकते. त्यात रूढ विज्ञान नसले तरी सामाजिक विज्ञान आहेच.

वाचनीयता हा एकच निकष लावून अशा प्रकारची लेख मालिका चालवता येईल का अशी विचारणा 'लोकमत'मधून आम्ही डॉ. जयंती नायक यांना केली तेव्हा वरील भीती त्यांनीही व्यक्त केली. पण अखेर हे आव्हान स्वीकारत त्यांनी वाचकांना बांधून ठेवणारी 'गूढबंध' ही लेखमाला एक वर्षभर चालवली. नुसत्या वरवरच्या सांगोपांगीच्या गोष्टी सांगून भीती निर्माण करणे किंवा अद्‌भुतरम्यतेचा आसरा घेत वाचकांचे मनोरंजन करणे एवढ्यापुरतीच

ती लेखमाला मर्यादित राहिली नाही. डॉ. जयंती नायक या प्रत्यक्ष 'फिल्डवर' काम करणाऱ्या लोकवेद अभ्यासक असल्याने त्यांच्या म्हणण्याला काहीएक ऑथेंटिसीटीचे अधिष्ठान होते. सुरुवातीला 'हे आणखी काय' म्हणून नाके मुरडणाऱ्यांनीही ती लेखमाला वाचनीय असल्याचे नंतर मान्य केले. हे लेख म्हणजे विज्ञान नाही. पण मानसात मूळ धरून बसलेल्या गोष्टी – अरे आपणही हे ऐकले आहे – पुनर्प्रत्ययाचा आनंद निश्चितच देत होत्या. अशा प्रकारचे साहित्य फार कमी देशांत लिहिले गेलेले आहे. आणि आपल्या देशात तर अशा गोष्टींचा खजिनाच आहे. तो योग्य पद्धतीने समोर येण्यात काही गैर नाही.

आज 'गूढबंध' या लेखमालेचे पुस्तक होत आहे याचा आनंद लेखिके एवढाच मलाही आहे.

आज हे सांगण्याची गरज काय? असा एक स्वाभाविक प्रश्न अनेक जण विचारतात. वर्तमानात जगत असताना आणि भविष्याविषयी अनेक स्वप्ने पाहत असताना भूतकाळाशी नाळ तुटून चालत नाही. चुकीचे, अप्रिय असले तरी या गोष्टी आपल्या सामाजिक इतिहासाचा भागच आहेच. समाज विज्ञानाच्या दृष्टीने त्याचा अभ्यास करणे, निष्कर्ष काढणे यात वावगे काही नाही.

अर्थात अशा प्रकारचे लेखन करताना एक पथ्य पाळावेच लागते. या गोष्टी आहेत तशा समोर ठेवायच्या असतात. त्याचे समर्थन करण्याच्या फंदात आपण पडू नये. त्या दृष्टीने कोणत्याही प्रकारचा चुकीचा संदेश समाजात जाणार नाही, पण ते वाचनीय, रोचक होईल ही तारेवरची कसरत त्यांनी यशस्वीरीत्या केली होती असे म्हणावे लागेल.

आज विज्ञान प्रगत झालेले आहे आणि अमुक एखादी गोष्ट का घडते याचे कोडे उकलण्याचा प्रयत्न मानव करत असतो. पण हजारो वर्षांपूर्वी आकाशात चमकणाऱ्या विजा किंवा ग्रहणासारखी घटनाही मानवाच्या मनात भीती उत्पन्न करण्यास पुरेशी असे. जगात सुष्ट शक्ती असतात तशाच काही दुष्ट शक्तीही असतात असा पगडा तेव्हाच्या समाज जीवनावर होता. सुष्ट आणि दुष्ट यांच्यामध्ये असणारे 'जाग्यावयलो', 'राखणदार' अशा प्रतिमाही मानवाने निर्माण केल्या होत्या. त्यांच्या प्रति आदरयुक्त भीती जनमानसात असली तरी या शक्ती आपल्याला मदत करतात अशी कौतुकाची भावनाही असे.

पाऊस न पडणे, एखाद्या विवाहित स्त्रीला मूल न होणे यामागे अदृश्य

शक्तीचा हात आहे असा पगडा असणाऱ्या त्या समाजात त्याच्यावरील उतारा म्हणून अगम्य असे यातुविधीही केले जात. या गूढशक्तींना तृप्त करण्याचा, संतुष्ट करण्याचा आणि त्यातून आपल्याला हव्या त्या गोष्टी साध्य करून घेण्याचा हव्यास त्यामागे असे. तशी हे सर्व विधी करण्यामागची त्यांची कळकळही प्रामाणिक होती हे इथे नोंदवले पाहिजे. आपल्याला ज्या गोष्टी आज हास्यास्पद वाटू शकतात त्या हजारो वर्षांपूर्वी किंवा अगदी १०० वर्षांपूर्वी स्वाभाविकपणे आपल्या दैनंदिनीचा भाग असत.

लोकवेदाच्या अभ्यासक या नात्याने अशा गोष्टींचा नेमका उगम कुठून झाला? ते का केले जातात, कुठे केले जातात? त्याच्याविषयीचा काही धागा मिळतो का? असे प्रश्न डॉ. जयंती यांना पडले. त्याचा शोध घेता घेता अनेक गोष्टी उलगडल्या. प्रत्यक्ष अभ्यास झाल्यानंतर लिहिलेली ही लेखमाला होती. या लेखनात येणारे काही संदर्भ, काही निष्कर्ष त्यांची लोकवेद अभ्यासावरील पकड किती घट्ट आहे याचे निदर्शक होते.

मानवाच्या उत्क्रांती अवस्थेत अनेक गूढं त्याला उकलली. काही उकलली नाहीत. त्यांचा शोध तो अजूनही घेतो आहे. माणसाने हजारो वर्षांपूर्वी आरंभलेले हे यातुतंत्र आधुनिक युगात नामशेष झाले तरी त्याच्या पाऊलखुणा आपले लग्नविधी, मुंजविधी, लोकगीते, लोकनृत्यात डोकावताना दिसतात. त्यासंबंधीचा शोध डॉ. जयंती यांनी घेत ही अभ्यासपूर्ण मालिका लिहिली होती. जिचे आज पुस्तकरूपात प्रकाशन होताना मलाही आनंद होतोय.

गोवा आणि कोकण प्रदेशात आजही भुतेखेते, देवदेवस्की, प्रसादपाकळी, अवसर यांच्यावर विश्वास ठेवणारा मोठा वर्ग आहे. त्यात शिक्षित - अशिक्षित असा भेद नाही, हे अधिक आश्चर्यकारक. अशा वेळी लोकवेदाच्या अभ्यासकांनी अशा प्रकारांची डोळस समीक्षा करणे हेही एक आव्हान आहे. डॉ. जयंती नायक यांच्यासारख्या अभ्यासकांनी त्याल रेटा द्यावा अशी अपेक्षा या निमित्ताने करणे गैर ठरणार नाही. किंबहुना अशा प्रकारचा प्रयत्न या लेखनात बऱ्याच प्रमाणात झालेला जाणवतो. त्याला अधिक गती आणि खोली प्राप्त व्हावी.

अशा प्रकारचे लेखन अनेकदा क्लिष्टतेत अडकून कंटाळवाणे होण्याचा धोका असतो. पण सुदैवाने या लेखनाची भट्टी जमल्यानंतर ती भीती दूर

झाली आणि आपल्या लोकसंस्कृतीतील अगम्य आणि अपरिचित असे संचित लोकांसमोर ठेवण्यात त्यांना यश आले.

'लोकमत'चा वाचक आडवा तिडवा पसरलेला असला तरी या स्तंभाला गोव्याची भौगोलिक मर्यादा होती. पण पुस्तकरूपातील हे संचित त्या पलीकडच्या वाचकांच्या हातात पडून त्यालाही आनंद देईल अशी अपेक्षा करतो.

डॉ. जयंती यांच्या हातून अशा प्रकारचे अधिकाधिक लेखन व्हावे आणि त्यातून हे साहित्य दालन समृद्ध व्हावे अशी शुभेच्छा व्यक्त करतो.

**– राजू नायक**

संपादक, लोकमत – गोवा

# अनुक्रमणिका

१.

# रंभा-बंधव भेट : पूर्वजांनी रचलेले एक गूढ

आदिम अवस्थेत मानवाला निसर्गातील कित्येक घटनांचे, गोष्टींचे गूढ उकलले नव्हते. आपल्या जीवनातील आपत्ती बघून तो भेदरला होता. रात्र-दिवस, पाऊस-पाणी, वादळ-तुफान, जन्म-मृत्यू... या कित्येक गोष्टीमागचे सत्य त्याला उलगडत नव्हते. कित्येक घडामोडींचे त्याला आकलन होत नव्हते. मग या जगात कोणत्या तरी अचाट शक्ती वावरतात. त्याच या सगळ्याचे नियंत्रण करतात, असा समज त्यांच्या मनात दृढ झाला. त्या शक्तींना वश करून घेऊन आपल्या जीवनात सुख आणि स्थैर्य आणण्यासाठी त्याने कित्येक यंत्रे-तंत्रे रचली. पुढे हीच यंत्रे-तंत्रे त्याच्या संस्कृतीची साधने झाली.

हजारो वर्षांच्या प्रवाहात आदिम मानवाची उत्क्रांती होत होत तो आजच्या विज्ञान युगात पोहोचलेला आहे. त्यानेच निर्माण केलेल्या विज्ञानाने त्याच्या कित्येक प्रश्नांना उत्तरे दिलेली आहेत. तरी पण अजूनही त्याच्यासाठी कित्येक प्रश्न अनुत्तरीतच आहेत. विज्ञानाने दिलेल्या उत्तरांनी तो अजूनही पूर्णपणे समाधानी झालेला नाही, म्हणूनच शेकडो वर्षांआधी त्याच्या पूर्वजांनी रचलेली यंत्र-तंत्रे सुधारीत स्वरुपात का होईना तो अजूनही पुढे नेतो आहे. आपल्या पूर्वजांकडून वारसाने प्राप्त झालेल्या लोकमानसाच्या प्रभावाखाली तो अजूनही वावरताना दिसतो आहे. गोव्यातील लोकसमूहही याला अपवाद नाही.

गेल्या सत्तावीस वर्षांत लोकसंस्कृतीच्या संकलन-संशोधनाच्या उद्देशाने मी गोव्याच्या डोंगर-कपारी आणि खेडोपाडी फिरलेली आहे आणि अद्यापही माझी फिरती चालू आहे. या माझ्या शोधकार्यात मला अशा कित्येक विधी,

प्रथा, परंपरा सापडल्या ज्या अजूनही गूढ स्वरुपातच आहेत. विज्ञानाची आपल्या परीने त्यासाठी उत्तरे असतील, परंतु लोकमानसाने मात्र त्यांची अचाट शक्तीशी सांगड घालून ठेवलेली आहे.

'रंभा' ही अशीच लोकमानसातली एक गूढ संकल्पना. पौष महिन्यात होणाऱ्या स्त्रियांच्या 'धालो' नृत्योत्सवाशी ती निगडित आहे. गोव्यातील गावडी, नाईक आणि देवदासी या समाजातल्या स्त्रियांचा प्रामुख्याने सहभाग असलेला हा नृत्योत्सव एके काळी गोव्यातील प्रत्येक तालुक्यात साजरा होत होता आणि प्रत्येक मांडावर (धालो नाचण्याची वर्तुळाकार जागा) रंभा अवतरत होत्या. आज एखाद्याच मांडावर प्रत्यक्ष रंभा अवतरलेल्या दिसतात. बहुतेक कडे रंभा अवतरल्याची 'भोगावळ' म्हणजे सोपस्कार केले जातात.

परंपरेने धालो नऊ रात्री चालायच्या आणि प्रत्येक रात्री, मध्यान समयी रंभा मांडावर अवतरायच्या, म्हणजेच काही ठराविक कुलातील अथवा घराण्यातील स्त्रियांच्या अंगात संचारायचे (भार यायचे). प्रामुख्याने कुमारी कन्यांच्या (ऋतुप्राप्ती न झालेल्या) अंगांत हे भार यायचे. सर्वसाधारणपणे सात रंभा यायच्या. परंतू एकवीस रंभांची नावे काहीं मांडावर घेतली जातात. नागावंती, कमळावंती, तुळजावंती, विजयावंती, शेवंत्यावंती अशी त्यांची काही नावे आहेत. गावानुसार रंभांची संख्या आणि परंपरा बदललेली आढळते. काही गावात वडील रंभा ही देवदासी समाजातील सदैव अहेव मानली जाणारी स्त्री असलेली दिसते. रंभांना 'भयण' (बहीण) असेही संबोधले जाते. त्यांना 'माया' म्हणूनही उल्लेखलेले दिसते.

रंभाविषयी गावात अतिशय आदरयुक्त भावना दिसते, त्याचबरोबर त्यांच्या अंगात अचाट शक्ती असते, असा समज असून त्यांच्या विषयी भीती पण बाळगलेली दिसते. धालांच्या उत्सवात त्या मध्यानरात्री स्वर्गातून मांडावर अवतरतात असा समज आहे. त्यांची अन् बंधवाची (अवसर) मांडावर भेट होते. बंधवाच्या जागी काहींकडे 'नागबाळ' अथवा 'पुंडलीक' अवतरतो. संपूर्ण धालांच्या नृत्य-विधीत बंधव हा एकटाच पुरुष असतो. त्याची अन् रंभांची मांडावर भेट घडणे अत्यंत गरजेचे असे मानले जाते, अन्यथा गावात पीक-पाणी होणार नाही, स्त्रियांच्या कुशी वांझ होतील, असा समज आहे.

१९९१ साली सष्टी तालुक्यातल्या वेरोडा गावात रंभा-बंधव भेटीचा



**रंभा मांडावर अवतरून बंधवाला येण्यासाठी आर्त साद घालीत आहेत.**
**(वेरोडा–सासष्टी, १९९१)**

अद्वितीय सोहळा बघण्याचा योग मला आला. त्या आधी व नंतर मी कित्येक मांड फिरले, परंतु असा योग परत कधी आला नाही. अंगावर शहारे आणणारा आणि बघणाऱ्याला काळाची पावले उलटवीत हजारो वर्षामागील आपल्या संचिताशी नेऊन जोडणारा तो अलौकिक सोहळा होता.

वेरोड्याचा मांड प्रामुख्याने गावडी समाजाचा, परंतु वडील बहिणीचा भार देवदासी समाजातील बाईवर येतो, इतर भार गावडी समाजातील कुमारी कन्यांच्या शरीरात अवतरतात.

...धालाचे नृत्य चालू होते. मध्यान रात्र जवळ येताच खेळगड्या स्त्रियांनी रंभांचे आवाहन केले आणि मग जिथे होत्या तेथून स्फूंदत स्फूंदत एक एक करून त्या मांडावर अवतरल्या. त्यांची यायची सुद्धा एक आगळी पद्धत होती. 'भोकया' चालत म्हणजे जमिनीवर बसून ढुंगण ओढत ओढत त्या मांडावर आल्या. येताच गाऊ लागल्या. एकमेकींना येण्यासाठी साद घालू लागल्या. वडील बहीण आधी आली, नंतर ती आर्ततेने मागील बहिणींना साद घालू लागली. एक एक बहीण अवतरून तिच्या पाठीमागे रांगेत जाऊ लागली. मग त्या संमोहीत अवस्थेत मांडभर हाताच्या फडा करून गडबडा लोळत, मध्येच भोकया फिरत बंधवाला व्याकुळतेने येण्यासाठी सादवू लागल्या. बंधवही आर्त

स्वरांत गात मांडावर अवतरला (मोठ्या बहिणीच्याच घराण्यातील पुरुष). बंधव अवतरताच रंभा त्याच्या भेटीसाठी जवळ धावल्या. तोही बहिणींच्या भेटीसाठी आतुर झाला होता. त्यांची अलौकीक भेट घडून आली. काही वेळाने भार स्थिर झाले.

रंभा-बंधवाच्या भेटीचा हा सोहळा चालू असताना आसमंत जणू थबकला होता. बघणारा प्रत्येक जण श्वास रोखून ते दृश्य बघत होता. काहींच्या अंगावर तर भितीने शहारे आले होते. वातावरणात किण्ण शांतता पसरली होती. या शांततेत हृदयाची धडधड वाढवणारं रंभा-बंधवाचं स्फुंदण तेवढं ऐकू येत होतं.

माझी खात्री आहे, कितीही वैज्ञानिक सत्याच्या गोष्टी बोलणारा माणूस असला तरी त्या वातावरणात त्याला एक शब्दही बोलायचे धाडस खात्रीने झाले नसते.

मर्त्य अमर्त्याचे मीलन घडवून आपले आणि आपल्या वंशावळीचे संचित सुनिश्चित करण्याची पूर्वजांची ही प्रथा म्हणजे एक गूढच आहे, जे अजुनही उकलेलं नाही.



## २.

# गडे :
# माणसांच्या उत्क्रांती अवस्थेचा एक टप्पा

गोव्यात कित्येक गावांत शिगम्याच्या उत्सवात 'गडे पडण्याची' (गडे येण्याची) परंपरा प्रचलित आहे. ही परंपरा आजही गूढ स्वरूपातच आहे. श्रद्धा आणि अंधश्रद्धा या दोन्हीची सांगड या परंपरेत घातलेली दिसते. या परंपरेशी जोडलेल्या कित्येक प्रथा, निर्बंध कालप्रवाहात आज सैल झालेले दिसतात, काही हरवलेलेही दिसतात. तरीही त्या मागचे गूढ अजूनही शाबूत आहे. ज्या परिसरात, ज्या समाजात हे गडे येतात, तिथल्या लोकांची श्रद्धा अजूनही पक्की आहे. अजूनही तेथील लोक या प्रथेविषयी अपशब्द बोलण्यास धजावत नाहीत.

गड्यांच्या प्रथेचे एकंदर स्वरूप बघितले तर तिचा उगम माणसाच्या रानटी अवस्थेशी (प्रिमिटिव्ह) जोडलेला दिसतो. माणसाच्या उत्क्रांती अवस्थेचा तो सुरुवातीचा काल, देव-देवता संकल्पनेच्या आधीचा, अप्रगत अवस्थेचा. आज गोव्यात प्रचलित असलेल्या गडे परंपरेचा अभ्यास केल्यास, त्याच्या उगम कालाचा सहजपणे अंदाज करता येतो.

'गडे पडणे' अथवा 'गडे येणे' म्हणजे अंगात संचारणे, हे संचारणे विकसीत संस्कृतीत उदयाला आलेल्या कोणा देव-देवीचे नसून निनांवी अशा अचाट आणि अदृश्य शक्तीचे असते. गड्यांचा संबंध अशा तऱ्हेच्या 'देवचार' अथवा 'म्हारू' या शक्तींशी जोडलेला दिसतो.

या पृथ्वीतलावर कित्येक गूढ आणि विलक्षण शक्ती वावरतात. त्यातील काही शक्ती सुष्ट आहेत तर काही दुष्ट. दुष्ट शक्ती आपल्या जीवनात संकटे

उत्पन्न करतात, आपल्यावर आपत्ती कोसळवतात, मृत्यू आणतात. त्या रात्री-अपरात्री, दुपार-माध्यान्ही जास्त चेकाळतात. अमावास्येला त्यांचा 'मेळा' भरतो. त्या विशिष्ट झाडांवर राहतात. घनदाट अरण्य, पाणीस्थळे ही त्यांची निवासस्थाने असतात. एकटा-दुकटा फिरणाऱ्याला त्या आपल्या कचाट्यात ओढळतात. त्यांनी झपाटलेल्या माणसाचे जगणे मुश्कील असते. याच्या उलट सुष्ट शक्तींचे. त्या माणसाला संकटाला धावून येतात. दुष्ट शक्तींपासून त्याचे रक्षण करतात. मात्र, त्यासाठी त्यांना प्रसन्न करणे, त्यांचे आवाहन करणे जरुरी असते. या भावनेतूनच आदिम माणसाने जी काही तंत्रे रचली, त्यामध्ये, 'गड्यांचे अवसर' हे एक महत्त्वपूर्ण तंत्र आहे.

रक्षणकारी शक्ती या असामान्य असल्याने त्यांचे आवाहन करणे सामान्य माणसाला शक्य नाही. त्यासाठी अंगात असामान्य गुण असावे लागतात. या शक्तीकडे संवाद साधण्याची भाषा अवगत असावी लागते, असाही समज आदिमामध्ये होता आणि त्यातून गोव्यात 'जाण' आणि 'जाणकार' (जाणभाषा) या संकल्पना उदयाला आल्या. जाणभाषा म्हणजे गूढभाषा. काही विशिष्ट व्यक्तीनाच त्याचे ज्ञान असल्याचे मानले जाते.

रक्षणकारी शक्तींचे नुसते आवाहन करूनच उपयोगी नाही. तर, त्या शक्ती 'सायेला' (मदतीला) आल्या आहेत हे जाणून घेणे, त्यांचा निर्वाळा मिळणेही जरुरी आहे. या श्रद्धेतून जाणभाषा जाणणाऱ्या व्यक्तींच्या अंगांत या शक्ती संचारण्याचे आणि त्यांच्याच हस्ते रक्षणाचे कार्य संपन्न करण्याचे यातुतंत्र विकसित झाले. जे 'गडे' नावाने आजही गोव्यात कित्येक ठिकाणी प्रचलित असलेले दिसते.

आज गोव्यात केपे, काणकोण, डिचोली वगैरे तालुक्यांत जिथे प्रामुख्याने आदिम वसाहती आहेत, तिथे शिगम्याच्या उत्सवात 'गडे' परंपरा दिसते. डिचोली तालुक्यातील साळ गावचे गडे प्रसिद्ध आहेत. माझ्या 'आमोणे' (केपे) गावातही गडे पडतात. मात्र त्यांचा जास्त गवगवा आज नाही. एकेकाळी संपूर्ण चंद्रवाडी महालातून या गड्यांना लोक जमायचे असे सांगितले जाते. मात्र आज चुकून दुसऱ्या गावचा एखादा गावकरी या गड्यांना उपस्थित राहिलेला दिसतो.

गवगवा नसला तरी अभ्यासकांच्या दृष्टिकोनातून हे गडे (आमोणेचे) अतिशय महत्त्वपूर्ण आहे. त्यांना जुळलेले कितीतरी आचार या प्रथेचे आणि



**आमोणे-केपे येथे गड्यांच्या मांडावर गड्यांना येण्यासाठी अवाहन करताना.**
**(आमोणे-केपे, २००६)**

या गावच्या वसाहतीची मुळे किती खोलात गेलेली आहेत हे सत्य उलगडून दाखवतात. आमोणे गावची वसाहत म्हणजेच पर्यायाने गोव्याच्या भूमीतील मानवाची वसाहत किती आदिम काली झाली हे सिद्ध करण्याचे येथील गडे ही परंपरा एक महत्त्वपूर्ण प्रमाण आहे, असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. या गड्यांचे दृश्य बघताना, डोळ्यांसमोर हजारो वर्षाआधी राना-वनात हिंडणाऱ्या, या जगातील कितीतरी घटना बघून अचंबित झालेल्या आणि आपल्या परीने त्या गूढ प्रश्नांची उत्तरे शोधणाऱ्या मानवसमूहाचे नकळत चित्र उभे राहते.

येथील गड्यांचा मांड झाडा-झुडपांनी वेढलेल्या जागी आहे. गड्यांच्या दिवशी थोडी साफसफाई केली तरी या परिसराचे मूळचे जंगलाचे वातावरण अजूनही स्पष्ट दिसते. मांडावर एक मोठे जुने आंब्याचे झाड आहे, ज्याला 'गड्यांचा आंबा' म्हणून उल्लेखतात. या आंब्यावर गड्यांच्या देवचाराचा निवास असतो, अशी श्रद्धा आहे. मांडावर पारंब्यांनी वेढलेला एक वडाचा पुरातन वृक्ष आणि एक आपट्याचे झाड आहे. सभोवताली पाला-पाचोळा आणि मध्ये लाल धुळीचा वर्तुळाकार मांड, हे चित्रच गूढ वातावरण तयार करते. मुद्दाम नोंद करण्याची गोष्ट म्हणजे या गावात पाल्या-पाचोळ्याला महत्त्व आहे. इथल्या देव-दैवतांना 'पाल्या-पाचोळ्यातील दैवते' म्हणून संबोधले जाते.

गड्यांच्या दिवशी सकाळी गावची पुरुष मंडळी मांडावर जमते, ज्यात 'गड्यांची कुडी' (ज्यांच्यावर गडे येतात ते) ही असतात. कमरेला फक्त 'काष्टी' अथवा 'मुंड' आणि डोक्याला 'मुंडासा' अशा वेशात ते मांडावर

येतात. त्यांचे वरचे धड उघडेच असते. आजही ही पारंपारीकता सांभाळलेली दिसते. आज गडे सोडून इतर जण कपडे घालतात.

'शेंसर' मारून (तांदूळ शिंपडून) देवचाराला सांगणे केले जाते. नंतर मांडावर 'हर हर हर...' म्हणत वर्तुळाकार फेरे काढतात. एका विशिष्ट आवाजात ढोल-ताशे वाजवले जातात. 'हर हर'चे आणि वाद्याचे स्वर वाढतात तसे एक एक करून गडे अवतरतात. पाच, सात, अकरा अशा संख्येत गडे येतात.

ज्यांच्या अंगांत गडे येतात, ते संमोहित अवस्थेत असतात. एक एकट्याला उचलून गड्याच्या आंब्याच्या खाली निजवले जाते. सगळे गडे आल्यानंतर प्रमुख गडा उठून चालू लागतो. त्याच्या मागे इतर जातात. ते दूर रानात असलेल्या 'मसणवटीत जातात.' (गावचे प्राचीन स्मशान) इथे इतरांना जायला मज्जाव असतो. मसणवटीत गड्यांचा देवचाराशी संवाद होतो. त्याच्याकडून वर्षभर गावाला रक्षण देण्याचा शब्द घेऊन गडे तेथून गावात परत येतात. येताना खांद्यावरच्या दांड्यावर 'मसण' (मसणवटीत ठेवलेला कपडा) घेऊन येतात. ते मसण घेऊन गावभर आचरट हावभावात नाचतात. गावच्या सर्व पुरुषांनी गड्यांबरोबर जायलाच पाहिजे, असा नियम आहे. मात्र, त्या दिवशी गडे विसर्जन होईपर्यंत कुठल्याही स्त्रीने घराबाहेर येता कामा नये, असा प्रतिबंध आहे. गड्यांना ती दिसली तर ते तिच्यावर धूळ फेकतात. तसे झाले तर तिचे स्त्रीत्व हरवते, असा समज आहे.

गडे मांडावर परतून अचकट-विचकट नाचतात, याला 'चाळा' म्हणतात. जननेंद्रियांच्या नावाचा उद्घोष करतात. त्यांचा संबंध देव-दैवतांशी जोडतात. नंतर धूळ फेकून 'धूळवट' खेळतात. इतरही काही विधी होतात, ज्यांचे गूढ आणि गुपित राखले जाते. दुपार ओसरल्यावर गडे मसणवटीत मसण परत नेऊन ठेवतात आणि विधीयुक्त विसर्जित होतात. यावेळी प्रार्थना केली जाते. गड्यांच्या कुडींना अचाट शक्तींच्या जगातून मृत्य जगात सुखरूप पाठवल्याबद्दल देवचाराचे आभार मानले जातात. या रात्री 'भोंवर' असते. सारे गडे आणि इतर पुरुष तिन्हीसांजा झाल्यावर गावच्या सीमेवर जमतात. तिथे काही विधि करून मध्यरात्री गावात परत येतात. येताना 'कुले' घालीत (कुंकारा घालीत) आणि परत एकदा जननेंद्रियांच्या नावाचा उद्घोष करीत येतात. नंतर नदीवर जाऊन सर्व देव-देवचारांना साकडे घालून आंघोळ करून

घरी परत परततात.

गड्यांच्या विधीमागची आधीची भयाची भावना पूर्वीएवढी तीव्र नसली तरी अजूनही गावच्या लोकांच्या मनात एक आदरयुक्त भीती कायम आहे. गड्यांची जी कोण टिंगल-टवाळी करतो, त्यांना त्रास द्यायचा प्रयत्न करतो, त्याला दुसरे वर्ष उजाडायच्या आत भयानक शिक्षा मिळते, अशी भावना गावात आहे. अशी एक-दोन उदाहरणेही गावात दिली जातात, ज्यांनी गड्यांची टिंगल केली आणि त्यांच्या घरावर आपत्ती आली. आपल्या चुकीचे परिमार्जन म्हणून ते लोक आता दरवर्षी गड्यांना काही भेटी पाठवतात, असेही सांगितले जाते.



३.

# कुंभ : मातेच्या उदराचे प्रतीक रुप

लोकसंस्कृतीत 'कुंभ' अथवा 'कलश' या वस्तूंना अतिशय महत्त्व दिलेले दिसते. मातृदेवीचे प्रतीक म्हणून त्यांची कित्येक देव-देवळांत, तसेच व्रत-उत्सवांत पूजा केलेली दिसते. कुंभाचेच उन्नयित रुप असलेला 'गाडगा' अथवा 'मडकी' यांना जन्म-मरणाच्या विधीमध्ये महत्त्व दिलेले दिसते. 'करा' हे कुंभाचे आणखी एक रुप. ज्याला लग्नसंस्कारांत महत्त्व असलेले पाहायला मिळते.

लोकसंस्कृती ही मानवाच्या आदिम अवस्थेतूनच विकास पावलेली संस्कृती. मानवाच्या प्रगती अवस्थेचा तो एक टप्पा, म्हणूनच कित्येक आदिम विचारधारणांचा समावेश या संस्कृतीमध्ये दिसतो. कित्येक आदिम विचारधारा नव रुपांत लोकसंस्कृतीत एकजीव झालेल्या दिसतात.

आदिम अवस्थेत माणसाला जीव-जंतूंच्या आणि प्राणिमात्राच्या जन्माचे रहस्य होते. मादीच्या उदरातून नवा जीव जन्माला येतो, त्याचे त्याला कोडे पडले होते. स्त्री नवा जीव जन्माला घालते, त्यामागचे वैज्ञानिक सत्य त्याला अवगत झालेले नव्हते. नराचा मादीशी होणारा समागम ही त्याची नैसर्गिक गरज अथवा भूक होती, परंतु त्याचे फलित नवजीवाच्या जन्मात होते याची त्याला सुरवातीला यत्किंचितही कल्पना नव्हती. मात्र त्यांच्या जीवनात त्या नव्या जीवाचे अतिशय महत्त्व होते. हा जीव, मादी म्हणजे स्त्री जन्माला घालते, म्हणजे तिच्या अंगात कोणती तरी अचाट शक्ती आहे, अशी त्याची भावना झाली होती.

नवजीवाच्या जन्माचे केंद्र म्हणजे स्त्रीचे 'उदर' (गर्भाशय). या उदरातच ती असामान्य शक्ती आहे, या भावनेने आदिम माणूस या उदराला वचकून राहात होता. पुढे संस्कृतीच्या विकासपथावर विपूल संततीच्या कामनेने त्याने उदर प्रतिके निर्माण केली आणि त्यांची तो पूजा-आवाहन करू लागला.

याच विकासपथावर 'मातृदेवी'ची संकल्पना उदयाला आली. पृथ्वीला मानव मातृदेवीरुप भजू लागला. तिच्या कित्येक रुपांचीही त्याने निर्मिती केली. याच काळी त्याला पृथ्वी आणि स्त्री यांच्या निर्मिती प्रक्रियेत साधर्म्य दिसले. मग स्त्रीला त्याने मातृदेवीची प्रतिनिधी रुप स्वीकारले.

स्त्रीच्या निर्मिती प्रक्रियेचे केंद्र असलेले तिचे उदर, त्याच्या दृष्टीने मातृदेवीचे प्रतीक झाले आणि मग मातृदेवीच्या आवाहनासाठी या प्रतिकाला महत्त्व आले. यातूनच या प्रतिकाच्या प्रतिकृती त्याने निर्माण केल्या. 'कुंभ' ही या प्रतिकृतींमधील सर्वांत महत्त्वाची, कारण तिची निर्मिती मातीपासून झालेली असते. माती म्हणजे पृथ्वीचाच अंश. या अंशापासून तयार केलेल्या कुंभांत तिचा खऱ्या अर्थाने वास असतो, अशी धारणा उदयाला आली. जनन, पोषण आणि रक्षण या तीन क्रिया भोवती सारे जीवन केंद्रित असलेल्या मानवाच्या जीवनात, संतती निर्मिती हे प्रमुख ध्येय होते. त्यामुळे त्याने त्याच्या सिद्धतेसाठी मातृदेवीचे आवाहन केले आणि तिच्या कुंभरुपी प्रतिकाची स्थापना केली.

'कलश' (धातूचा कुंभ) हे कुंभाचे उन्नयित रुप. आर्थिकदृष्ट्या संपन्न झालेल्या समाजात त्याचा वापर अधिक आहे, तरी पण काही ठराविक विधींत अजूनही मातीचा 'कुंभ'च वापरला जातो.

'सारख्यातून सारखे जन्माला येते', हे आदिमांचे यातुतंत्र होते. इच्छित फलप्राप्तीसाठी त्या फलाची नक्कल करून संबंधित शक्तींचे आवाहन केले म्हणजे आपली कामना सिद्ध होते, अशी त्याची धारणा होती. याच धारणेतून कित्येक सुफलीकरण विधींनी कुंभाचा समावेश झालेला आहे. 'हळदीकुंकू' व्रतात 'सुगड' पूजले जाते. म्हणजे नवधान्यानी भरलेल्या मातीच्या कुंभाची पूजा करून सुवासिनी (सवाष्ण स्त्रिया) वाण देतात. यामागेही तीच धारणा आहे. नवरात्रीच्या घटस्थापनेत नवधान्ये रूजत घालून त्यावर घट (कुंभ) स्थापन केला जातो. लग्नसंस्काराचे मूळ उद्दिष्ट संतती वृद्धी म्हणून यात कऱ्याची (कलश) स्थापना हा महत्त्वाचा भाग असतो.



**कुंभरुपी मातृदेवता.**

मातेच्या उदरातून जीव जन्माला येतो. या जगात असे तोपर्यंत त्याचे या उदराशी नाते जुळलेले असते, मात्र या जगातून निघताना त्याचे उदराशी असलेले संबंध संपुष्टात येतात. एक जीव या जगातून जातो म्हणजे मातेच्या एका गर्भाचा अस्त होतो, याच धारणेतून अंत्यविधीत कुंभ फोडला जातो.

भारतात एकेकाळी अस्तित्वात असलेल्या सिंधू संस्कृतीतही ही विचारधारणा होती. या संस्कृतीच्या उत्खननात जे अवशेष मिळाले त्या अवशेषांत अस्थींनी भरलेले मातीचे काही कुंभ सापडले. या कुंभांवर मोराचे चित्र काढलेले होते आणि या मोराच्या पोटात मेलेल्या अवस्थेतील माणूस दाखवलेला होता.

लहान मुलाचा मातेच्या उदराकडील संबंध तर एकदम जवळचा. जन्मतःच अथवा तान्ह्या अवस्थेत बाळ या जगातून गेले तरी मातेच्या उदराचे त्याला संरक्षण असावे, अथवा त्याला स्वरक्षण कवचाची गरज लागते, या हेतूने उदयाला आलेल्या काही प्रथा भारतात प्रचलित होत्या किंवा आहेत. असे तान्हे मूल मेले तर त्याचा देह एका कुंभात ठेवून त्याच्या तोंडावर दुसरा कुंभ ठेवण्याची प्रथा होती. महाराष्ट्रात दामयाबाद, चांडोळी, नेवासे, इनामगाव या भागात केलेल्या उत्खननात घरातच पुरलेले असे कुंभ सापडल्याची माहिती

मिळते.

गोव्यात अशी प्रथा असल्याची माहिती नाही. मात्र लहान मूल मेल्यास त्याला घराच्या पागोळ्यात पुरण्याची प्रथा हल्लीपर्यंत माझ्या बघण्यात आहे. अजूनही काही भागात ती अस्तित्त्वात असावी. मुलाची नाळ मात्र कुंभात (गाडग्यात) घालून घराच्या पागोळ्यात पुरण्याची प्रथा आहे. माझ्या लहानपणी अशा 'नाळीच्या जागा' मी आमच्या घराशेजारी बघितल्या आहेत. त्याशिवाय गावात प्रत्येक घराशेजारी नाळीचे दगड बघितलेले आहेत. (जागा राखून ठेवलेल्या).

'नाळ' हा बाळाच्या मातेशी संबंध जोडणारा अवयव. जोपर्यंत बाळ नाळीला जोडलेले असते तो पर्यंत ते सुरक्षित असते. ही नाळ कापून मुलाला स्वतंत्र व्यक्तिमत्त्व दिले जाते. तरी बाळाच्या रक्षणासाठी या नाळीला परत उदराशी जोडून ठेवणे गरजेचे आहे, या भावनेतून कदाचित तिचे विसर्जन कुंभांत केले जात असावे.



४.

# ऋतुस्रावाचे गूढ

ऋतुमती होणे म्हणजे स्त्री वयात येणे. तिच्यामध्ये प्रजननाची शक्ती निर्माण होणे. आदिमकाळी दर महिन्याला येणाऱ्या स्त्रीच्या ऋतुस्रावाचे मानवाला मोठे गूढ वाटले होते. कोणत्या तरी अदृश्य शक्तीच्या प्रभावामुळे स्त्रीला हा स्राव येतो, अशा समजाने त्याने त्याच्याविषयी एक तऱ्हेची भीती मनात बाळगलेली होती. म्हणूनच टोळीतील एखाद्या स्त्रीला ऋतुस्राव प्राप्त होत होता, त्यावेळी तिच्यापासून इतर दूर राहात होते. टोळीतील फक्त जाणती, वयस्क आणि प्रमुख स्त्री, जिला त्या शक्तीला काबूत ठेवण्याचे तंत्र अवगत होते (अशी समजूत), तीच तेवढी तिच्याशी व्यवहार करायची. काही जमातींमध्ये तर ही भीती एवढी कडक होती की त्या स्त्रीची इतरांवर सावलीसुद्धा पडू देऊ नये म्हणून तिला बंदिस्त झोपडीत अथवा निर्जन स्थळी ठेवले जायचे.

पुढे मानवाला स्त्रीच्या ऋतुस्रावाचे गूढ समजले, हा स्राव प्राप्त झाल्यावरच स्त्रीमध्ये जननशक्ती तयार होते हे सत्य उमजले आणि त्याने या स्राव प्रक्रियेला आपल्या जीवनात महत्त्व दिले. त्याचा आनंद साजरा केला. परंतु या आनंदाच्या सोबतच त्याच्याविषयीची अनाम भीतीही मनात कायम राहिली. ऋतुस्रावाच्या भीतीमुळे रजस्वला स्त्रीपासून दूर राहण्याच्या समजाला कालप्रवाहात वेगळाच अर्थ प्राप्त झाला आणि या काली स्त्री भ्रष्ट होते, अपवित्र होते म्हणून तिला स्पर्श करता कामा नये, धार्मिक विधीत सहभागी होऊ देता कामा नये, पवित्र जागी तिने प्रवेश करता कामा नये, असा समज लोकमानसात रुढ होत गेला. शेकडो वर्षे लोटली तरी आजही हा समज समाजमनावर प्रभाव टाकून आहे.



आसामातील कामाख्या देवीचा रजोत्सव सुप्रसिद्ध आहे.

सुसंस्कृत आणि सुशिक्षित, तंत्रज्ञान-विज्ञानाभिमूख समजल्या जाणाऱ्या एकविसाव्या शतकातही तो समज रुढ आहे.

ऋतुस्रावाचे गूढ आणि महत्त्व आदिमकाली मानवसमूहात होते याची सत्यता सांगणारे कितीतरी उत्सव आणि व्रते आजही प्रचलित आहेत. भारतातल्या कित्येक राज्यांत अशी उदाहरणे सापडतात. मातृदेवी आणि स्त्री या दोन्हींशी ती संबंधित दिसतात. स्त्रीला म्हणजे कन्येला (मुलीला) ज्या वेळी प्रथम ऋतुस्राव प्राप्त होतो त्या वेळी काही खास संस्कार केले जातात (एकेकाळी गोव्यात काही समाजात मुलीला मखरात बसवले जात असल्याची माहिती सापडते), तसेच भूदेवीलाही विशिष्ट मासात वा कालात ऋतुस्राव प्राप्त होतो, असे ठरवून त्या काली काही विशिष्ट व्रते-विधी केले जातात. कित्येकदा हे विधी उत्सवरुप घेताना दिसतात. भूदेवीच्या या रजोत्सवांत स्त्रीला प्रमुख स्थान दिलेले दिसते.

आदिमानवाला पृथ्वीच्या (भूदेवीच्या) सृजनप्रक्रियेतील घटनांमध्ये आणि स्त्रीच्या सृजन प्रक्रियेतील घटनांमध्ये साधर्म्य जाणवले. स्त्रीला जशी रजस्वला झाल्यावरच गर्भधारणेची क्षमता प्राप्त होते. तशीच भूदेवीलाही तिची सृजनशक्ती प्राप्त होण्यासाठी आधी रजस्वला होणे जरुरी असते, या समजातूनच त्याने पृथ्वीच्या ऋतुचक्रातील काही दिवस तिच्या 'ऋतुकालाचे'

(रजस्वला होण्याचे) म्हणून मानले. या कालात तिच्या प्राप्त शक्तीचा उत्सव त्याने साजरा केला. तिच्या शक्तीच्या आदरार्थ आणि फलित प्राप्तीसाठी काही विधी संपन्न केले. स्त्रीच्या रजोस्रावाचा प्रमुख काळ तीन दिवस असल्याने त्याने भूमातेसाठीही तीन दिवसांचे महत्त्व मानले.

'कृषिपराशरा' या अंदाजे सहाव्या ते आठव्या शतकात रचलेल्या कृषिशास्त्रीय ग्रंथात ज्येष्ठ महिन्याची अखेर आणि आषाढाची सुरवात यामधील साडेतीन दिवसांच्या काळात पृथ्वी रजस्वला होते, असे म्हटले आहे आणि या काळात शेतात नांगरणे, बी पेरणे इत्यादी कृती वर्ज्य मानल्या आहेत. या ग्रंथात पृथ्वीच्या रजस्वला होण्याच्या अवस्थेला 'अंबुवाची' असे म्हटले आहे.

मृग नक्षत्राचा चतुर्थ आणि आर्द्रा नक्षत्राचा प्रथम चरण या मुसळधार पडणाऱ्या पावसाच्या दिवसांत आसामातील कामरुप जिल्ह्यातील प्रसिद्ध कामख्या देवीचा रजोत्सव साजरा केला जातो. या उत्सवाला 'अमती' असे म्हणतात आणि पहिले तीन दिवस मंदिराच्या दरवाजे-खिडक्या बंद करून भक्तांना दर्शन वर्ज्य केले जाते. चौथ्या दिवशी दरवाजे-खिडक्या उघडून देवीला विधियुक्त स्नान घातले जाते. नंतर पूजा-उपचार इत्यादी करून लाल रंगाच्या पाण्यात भिजवलेले वस्त्रांचे तुकडे, देवीच्या रजोत्सवाचा वस्त्रप्रसाद म्हणून भाविकांना वाटण्यात येतो. या वस्त्रप्रसादाचा लाभ झाल्यास इच्छित फलप्राप्ती होते, समृद्धी मिळते, असा समज आहे.

आसामातील पूर्व जिल्ह्यातील काही भागात 'सात' नावाचा अशाच तऱ्हेचा उत्सव साजरा केला जातो. आषाढ शुक्ल सप्तमीपासून तो सुरू होतो.

काश्मिरातही 'राज्ञीस्थापना' या नावाने देवीचा रजोत्सव साजरा होत असल्याची माहिती आहे. राज्ञीस्थापना याचा अर्थ 'राणीचे स्नान'. सूर्यपत्नी पृथ्वी चैत्र शुद्ध पंचमीपासून सप्तमीपर्यंत रजोवस्थेत असते आणि अष्टमीच्या दिवशी ती शुद्ध होते, अशी धारणा या प्रदेशात आहे.

केरळातील त्रावणकोर येथे 'त्रिप्पखरट्टु' या नावाने उत्सव साजरा केला जात असल्याची माहिती मिळते. येथे या विधीत देवीला लाल रंगात भिजवलेले वस्त्र नेसवतात आणि भाविक नंतर ते प्रसादरूप स्वीकारतात. 'उछारल' या नावानेही केरळात काही भागांत भगवती देवीचा रजोत्सव होत असल्याचे संदर्भ मिळतात. 'मकरम्' (साधारण जानेवारीच्या अखेरला) महिन्यात येथे हा उत्सव होतो. येथे तीन दिवस देऊळ बंद ठेवले जाते, धान्य कोठारेही बंद

ठेवली जातात. चौथ्या दिवशी देवीचे शुद्धीकरण होते. यावेळी टोकरीभर पाने शेतात नेऊन टाकली जातात.

ओडिसातही भूदेवीचा रजोत्सव होतो. येथेही तीन दिवसांचे महत्त्व मानले जाते. या तीन दिवसांत शेतात नांगर घालणे, फावड्याने जमीन खणणे, बी पेरणे, एवढेच नव्हे तर कोठारातील धान्य काढणेही वर्ज्य असते.

माझ्या मते गोव्यातील शिगम्याचा उत्सव हा सुद्धा भूमातेच्या रजोत्सवाचाच उत्सव आहे. आदिम वसाहतकारांचा शिगमा हा तीन दिवसांचा असतो, ही गोष्ट मुद्दाम लक्षात घेण्याजोगी आहे. तसेच शिगम्यातील 'धुळवट' (गुलालोत्सव) आणि 'हळडुणे' या प्रथा रजोरुप अथवा सर्जकद्रव्यरुप प्रतीत करणाऱ्या आहेत.

गोव्यातील केपे-काणकोण येथील कुणबी-वेळीप समाजात 'घडशी उमास' म्हणजे ज्येष्ठ अमावास्येचे महत्त्व मानतात. या दिवशी रात्रभर कथागायन केले जाते. ज्येष्ठ अमावास्या ते आषाढ पौर्णिमा (आषाढी) हा पंधरवडा शेतात उतरणे वर्ज्य मानले जाते. पौर्णिमेची पूर्ण रात्र कथागायनाने जागवली जाते. नंतर पहाटे शेतात जाऊन जमिनीवर फावडा मारला जातो. खणण्याचा मुहूर्त केला जातो. मुसळधार पावसाचे हे दिवस. या दिवसांत नदी-नाले लाल पाण्याने दुथडी भरून वाहतात, ही गोष्ट सुद्धा विषयाच्या संदर्भाने नोंद करण्याजोगी आहे.

समाजा-समाजाच्या फरकाप्रमाणे रजोत्सव व्रतांच्या वेळा-काळात आणि आचार-परंपरांत फरक असतो. मात्र त्यामधील मूळ गाभ्यात साधर्म्य असते.

हजारो वर्षापूर्वी भूमातेच्या रजोत्सवासंबंधी उदयाला आलेली धारणा मूळ तत्व जतन करीत, त्याच बरोबर परिवर्तन स्वीकारीत आजही समाजात रूढ आहेत. मात्र याच भूदेवीची प्रतिनिधी मानल्या गेलेल्या मानवी स्त्रीच्या रजोस्रावाकडे बघण्याची समाजाची दूषीत दृष्टीही अजून नष्ट झालेली नाही.

एका बाजूने भूदेवीचा रजोत्सव साजरा करायचा आणि दुसऱ्या बाजूने स्त्रीच्या रजोस्रावाला अपवित्र समजायचे, हा विरोधाभास भारतीय समाजात अजुनही आहे. विज्ञानाने स्त्रीच्या रजोस्रावाचे गूढ खूप वर्षांआधी उकलेले आहेच तरी अजूनही केरळातील शबरीमल देवस्थानात आणि शनी शिंगणापुरच्या शनीदेवाच्या चौथऱ्यावर स्त्रीला प्रवेश बंदी घालण्याच्या घटना घडतात आणि मग स्त्रीला बंड करावे लागते.



५.

# मातृदेवीच्या क्षेत्रात पुरुषाचा स्त्री बनून प्रवेश

हजारो वर्षांपूर्वी उदयाला आलेल्या प्रथा-परंपरा जेव्हा कालप्रवाहीत होत होत वर्तमानापर्यंत पोहोचतात त्यावेळी त्यांना वेगळेच स्वरुप प्राप्त होत असते. खूपदा त्याच्या विषयीची मूळ धारणा हरवते, तर कधी त्याच्या निर्मितीमागचे मूळ प्रयोजन बाजूला पडून त्याला वेगळाच अर्थ प्राप्त झालेला असतो. मात्र या प्रथांमधील काही आदिबंध एवढे प्रभावी असतात की ते शेकडो वर्षांच्या प्रवाहातही टिकून राहतात. त्यामुळे त्याच्या मूळ स्वरुपाचा शोध घेणे शक्य होते.

आज लोकसंस्कृतीत सापडणाऱ्या कित्येक प्रथांमधील एक महत्त्वाची अशी प्रथा म्हणजे पुरुषाने स्त्रीवेष धारण करून धार्मिक कार्यात सहभाग घेणे. हे धारण करणे कधी कायम असते तर कधी तात्पुरते एखाद्या विधी-आचारापुरतेच सीमित असते. 'साधक आणि भजक' अशा दोन्ही रुपात पुरुषाने स्त्रीवेष धारण केलेला किंवा 'स्त्रीरुप' घेतलेले दिसते.

या प्रथेचे मूळ मानवाला स्त्रीशक्तीविषयी असलेले गूढ आणि भीती या दोन घटकांशी जोडलेले आहे आणि त्याचा उगम मातृप्रधान संस्कृतीच्या अस्त कालात झालेला आहे.

प्राचिन काली जिथे जिथे जगात मातृसत्ताक संस्कृती नांदत होती तिथे तिथे ही प्रथा अस्तित्त्वात होती. मातृप्रधान संस्कृतीवर जेव्हा पुरुषप्रधान संस्कृतीने कडी केली, त्या परिवर्तनाच्या अवस्थेत या प्रथेचा जन्म झला. आज ही प्रथा अवशेष रूपाने सापडते.

पुरुषाने स्त्रीवेष धारण करून स्त्रीरुप घेण्याच्या प्रथेआधी त्याने प्रत्यक्षात आपल्या पौरुषाचा त्याग करून म्हणजे आपल्या जननेंद्रियाचे विच्छेदन करून स्त्री बनण्याची प्रथा उदयाला आली होती. बराच काळ प्रवाहात राहून पुढे त्या प्रथेत थोडा सैलपणा आला आणि प्रत्यक्ष पौरुषाचे खच्चीकरण न करता, नुसता स्त्रीवेष धारण करून स्त्री बनण्याची प्रथा रुढ झाली.

या दोन्हीही प्रथांमागची धारणा म्हणजे पुरुषाला संस्कृती विकासाच्या सुरवातीच्या कालखंडात स्त्रीदेवीच्या क्षेत्रात शिरायला असलेला मज्जाव. या काळात पुरुषाची समाजातील भूमिका एक 'begetter म्हणजे 'संतती जन्माला घालण्याचे एक निमित्त' एवढीच होती आणि मातृदेवी, जिच्या प्रभावाखाली पूर्ण समाज नांदत होता, तिचे पौरोहित्य करण्याचा अधिकार फक्त स्त्रीलाच होता.



**इंत्रूज उत्सवात स्त्रीवेष धारण केलेला क्रिस्ती कुळंबी समाजातील पुरुष. (असोल्डे–केपे, १९९१)**

पुरुषप्रधान संस्कृतीच्या आगमनाबरोबर पुरुषाचे समाजात महत्त्व प्रस्थापित होत गेले आणि त्याने मातृदेवीच्या दरबारात पाऊल ठेवले, परंतु सुरवातीला त्याला स्त्री बनूनच या क्षेत्रात प्रवेश करता आला. हे स्त्री बनणे त्याने सुरवातीला प्रत्यक्ष आपल्या पौरुषाचा त्याग करून केले, नंतर हळुहळू समाजात त्याचे स्थान बळकट होता होता त्याने पौरुषाचा त्याग करण्याऐवजी नुसता स्त्रीवेषच परिधान करण्याचा पर्याय स्वीकारला. पुढे ज्या वेळी पूर्णपणे त्याने आपले स्थान बळकावले त्या वेळी तो पुरुष रुपातच तिच्या क्षेत्रात वावरू लागला. मातृप्रधान ते पितृप्रधान या स्थित्यंतर कालात ही प्रथा अस्तित्त्वात आली, हे कित्येक प्रथांवरून सिद्ध होते.

पितृप्रधान संस्कृतीत पुरुषदेवाचे महत्त्व प्रस्थापित झाले, परंतु समाजातील मातृदेवीचे स्थान एवढे बळकट होते की पुरुष देवांच्या उदोउदोतही मातृदेवीचे महत्त्व दुर्लक्षीत करता आले नाही, म्हणूनच आजही भारत आणि भारता बाहेरील कित्येक देशात मातृदेवींची आराधना केलेली दिसते. तिचे उत्सव-व्रते पाळलेली दिसतात. तसेच पुरुषाने स्त्रीवेष धारण करून तिची उपासना करण्याची प्रथा अवशेषरुपे का असेना, परंतु आजही समाजात प्रचलित आहे.

या प्रथेची दोन महत्त्वाची उदाहरणे म्हणजे, महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र प्रदेश इत्यादी राज्यांमध्ये मरिअम्मेचा गाडा घेऊन फिरणारा 'पोतराज' (महाराष्ट्रात त्याला या नावाने ओळखतात) आणि कर्नाटक-महाराष्ट्रातील यल्लमा देवीचा भक्त 'जोगत्या'. मरिअम्मेचा पोतराज स्त्रीसारखा वेष करतो, कुंकवाचा मळवट भरतो, चुडा घालतो, केस वाढवून, त्यांचा बुचडा बांधतो. मात्र तो सद्य कालात तरी आपल्या पौरुषाचे विच्छेदन करीत नाही. त्याला संसार असतो, बायको-पोरे असतात. याच्या उलट जोगते. ते सक्तीने अथवा जन्मजात नपुंसक अथवा तृतीयपंथी असावे लागतात. ते स्त्रीवेष धारण करून यल्लमा देवीची टोकरी डोक्यावर घेऊन जोगवा मागत फिरतात.

'पवय्या' नावाचा असाच एक संप्रदाय आहे जे 'बहन्नचरा' देवीचे उपासक असतात. या संप्रदायात नपुंसक असल्याशिवाय पुरुषाला प्रवेश मिळत नाही.

जगात ज्यांना प्राचिन संस्कृतीची केंद्रे म्हणून ओळखतात त्या बाबिलोनिया, असिसिया, इजिप्त येथेही अशा प्रथा अस्तित्वात असल्याची माहिती मिळते. एशिया मायनर येथील 'सिबिल' देवीचे पुजारी ज्यांना 'गेलोई' म्हणून ओळखतात, त्यांना आपले पौरुष त्यागून स्त्रीवेष धारण केल्याशिवाय देवीचे पौरोहित्य करता येत नव्हते, असे संदर्भ सापडतात.

या प्रथेचे काही अवशेष गोव्यातही सापडतात. गोव्यात सत्तरी तालुक्यात प्रचलित असलेल्या 'करोल्यो' परंपरेत ही धारणा दिसते. यात एक किंवा एकाहून जास्त मुलगे स्त्रीवेष धारण करून डोक्यावर कलश (करो) घेऊन शिगम्याच्या मेळात संबंधित जाग्यांनी किंवा गावात फिरतात. काही वर्षांमागे घुडो-अवेडे येथील सातेरी (शांतादुर्गा) देवस्थानात नवरात्र उत्सवात दर रात्री देवीचा भगत स्त्रीवेष धारण करून हातात खंजीर घेऊन 'वावुडत' (अंगात संचार होणे) असल्याची माहिती आहे. कित्येक ठिकाणी जत्रेच्या दिवशी देवीचा

8338

'मोड' अथवा 'भगत' कलश डोक्यावर घेऊन अग्निदिव्य करत असल्याची माहिती आहे. त्यांचा वेष बारकाईने निरखून पाहिल्यास तो स्त्रीवेषच आहे हे स्पष्ट होते.

गोव्यात प्रसिद्ध असलेल्या जागोर, रणमाले, दशावतार या लोकनाट्यात पुरुषच स्त्रीभूमिका करतात. माझ्या मते या मागेही मुळात तीच धारणा होती.

हिंदूंच्या शिगमा आणि ख्रिस्तींच्या इंत्रुज या लोकोत्सवात रोमट नावाचा, वरवर बघणाऱ्यांना मनोरंजनाचा प्रकार वाटावा असा एक प्रकार सादर होतो. या प्रकारात कित्येक पुरुष स्त्रीवेष परिधान करून स्त्री आवेषात नाचतात अथवा अंगविक्षेप करतात. या प्रकारामागचे गौम्यही स्त्रीक्षेत्रात पुरुषाने स्त्रीबनून प्रवेश करणे हेच आहे.

शिगमा या उत्सवासंबंधी सर्वसामान्यपणे तो पुरुषांचा उत्सव अशीच भावना आहे, परंतु माझ्या मते हा भूदेवीचा उत्सव आहे. या विधानाला पूरक असे एक वक्तव्य १९९२ साली क्षेत्रकामासाठी गेले असता काजूर-केपे येथील श्री. म्हाळगो वेळीप या लोकसंस्कृतीच्या एका वयस्क उपासकाने केले होते जे मी येथे मुद्दाम नमुद करते. तो म्हणाला, ''शिगमा हा मूळ बहिणींचा होता, नंतर तो भावांकडे गेला!'' इथे बहीण म्हणताना स्त्रिया आणि भाऊ म्हणताना पुरुष असा अर्थ त्याला अभिप्रेत होता.

त्याच्या या वक्तव्याचा गंभीरपणे विचार केल्यास आणि त्याचा संबंध सांस्कृतिक संदर्भाशी पडताळून बघितल्यास एक सत्य समोर येते, ते म्हणजे शिगमा हा भूदेवीचा उत्सव आणि स्त्री अथवा स्त्रीतत्त्व हे त्यांतील केंद्रबिंदू.

●●●



६.

# संस्कृतीच्या उन्नयनाबरोबर मातृदेवीचेही उन्नयन

मातृदेवी ही मूळची उग्ररुपी. आदिम अवस्थेतील मानवाने ज्या वेळी तिची संकल्पना उदयाला आणली त्या वेळी त्याने तिला उग्ररुपच दिले. पुढे संस्कृतीच्या उन्नयनाबरोबर तिचेही उन्नयन होऊन तिला 'शांत' रुप प्राप्त झाले.

मातृदेवीला उग्ररुप देण्यामागे त्या काळची मानवाची मनोधारणा कारण होती. अप्रगत अवस्थेतला हा मानव, जीवनात येणाऱ्या दर दिवशीच्या भयानक आपत्तींनी आणि संकटांनी भेदरला होता. स्त्रीची जनन क्षमता आणि पृथ्वीची निर्मिती शक्ती बघून चक्रावलेला होता. या दोन्ही मागचे सत्य त्याला ज्ञात नव्हते. पृथ्वीवरील जीवन हे मातृदेवीच्या अचाट शक्तीचे वरदान आणि येणाऱ्या आपत्ती, आप्तांचे मरण हे तिच्या क्रोधाचे कारण, अशी त्याची मनोधारणा झाली होती. या त्याच्या मनोधारणेतून त्याने कल्पिलेले तिचे रुप उग्ररुपात दर्शित झाले. शिवाय त्याची जीवनअवस्थाही अप्रगत होती. वन्य अवस्थेतून तो नुकताच बाहेर पडला होता. त्यामुळे त्यांच्या कल्पनाशक्तीलाही मर्यादा होत्या. नाजूकपणा, नजाकत, सौम्यपणा या गोष्टीपासून तो शेकडो मैल दूर होता. जसे उग्र, ओबड-धोबड, राकट त्याचे जीवन तशीच त्यांची अनुभूती होती. या अनुभूतीतून अभिव्यक्त झालेली त्याची कलात्मक अभिव्यक्ती पण उग्र, ओबड-धोबड, राकटच जन्माला आली.

मातृदेवीचे उग्र आणि खंकाळ रुप आजही बघायला मिळते. भारतात उत्तरेला 'चंडी', 'काली', 'भैरवी' अशा नावाने पुजल्या जाणाऱ्या देवींच्या मूर्ती उग्ररुपी आहेत. या तिच्या रुपाचा तांत्रिक संस्कृतीशी निकटचा संबंध

आहे. तांत्रिक संस्कृती तिच्या याच रुपांना केंद्रस्थानी ठेवून निर्माण झाली म्हटल्यास ते वावगे ठरणार नाही.

दक्षिणेत 'मरिम्मा' (मरिअम्मा, मारम्मा, मरिगम्मा), यल्लम्मा, रेणुका अशा नावाने तिची उग्ररुपे प्रसिद्ध आहेत. तिथे तिचे स्थान 'ग्रामदेवी' असे असून काही विशिष्ट संप्रदायाशी तिचा संबंध सापडतो. काही ठिकाणी ती सात नावाने ओळखली जाते आणि तीची सात रुपे म्हणजे 'सात बहिणी' अशी लोकमानसाची धारणा दिसते. तामिळनाडूत या सात बहिणींना 'पोलेरम्मा', 'अंकम्मा', 'मरिगम्मा' 'हुलगम्मा', 'गुरम्मा', 'यल्लम्मा' आणि 'मंथम्मा' अशी नावे आहेत. या सात बहिणींना 'पोट्टराजू' नावाचा एक भाऊही आहे. कर्नाटक-आंध्र प्रदेश या राज्यातही सात बहिणींची संकल्पना अस्तित्त्वात असून त्यांची नावे थोड्याफार फरकाने अशीच आहेत.



**उग्रदेवी मरिम्माचा पेटारास्थित मुखवटा घेऊन फिरणारा पोतराज.**
(१९९८)

'सृजन' आणि 'रक्षण' ही मातृदेवीची प्रमुख कार्ये. उग्ररुपातही तिने ही दोन्हीही कार्ये केलेली दिसतात. पुढे संस्कृतीच्या उन्नयनाबरोबर तिची वेग-वेगळी दोन रुपे कल्पून तिच्या कार्याची विभागणी झाली आणि तिचे शांतरुप हे सृजनरुप आणि उग्ररुप हे रक्षणकर्ते रुप ठरले. उदाहरणार्थ, गोमंतकात, मातृदेवीची भूमिका, सातेरी ही रुपे शांतरुपे आणि या सृजनाच्या देवी म्हणून लोकप्रिय झालेल्या आहेत. याच्या उलट चंडी, काली, दुर्गा या उग्ररुपी आणि दुष्टांच्या संहारक म्हणून ओळखल्या जातात, तसेच मरीअम्मा सारखी देवी ही रोगपीडेपासून, तऱ्हेकवार साथीच्या रोगांपासून रक्षण करणारी देवी म्हणून प्रसिद्ध आहे.

स्त्रीदेवींची सृजनदेवी आणि रक्षणकर्ती देवी अशी मानवी मनाने विभागणी केली असली तरी उग्ररुपातही सृजनाचे कार्य आणि शांतरुपातही रक्षणाचे कार्य

ती करतेच (अशी धारणा) आणि हे तिचे दुहेरी कार्य, तिचे मूळ रुप एकच यांचे प्रमाण देणारे ठरते. उग्ररुपी देवी रक्षण कार्याबरोबरच सृजनकार्यासाठीही बांधील आहे. याचे एक उदाहरण म्हणजे मरीअम्मेला उपवर मुलां-मुलींचे लग्न ठरण्यासाठी तसेच संतती प्राप्तीसाठी केला जाणारा नवस. खेडी-पाडी आजही जिथे मरीअम्मेची फेरी असते तिथे असे नवस बोलले जातात आणि फेडले जातात. माझ्या आमोणे गावात हल्लीपर्यंत गावकऱ्यांच्या बाया अशा नवस बोलताना आणि फेडताना मी बघितलेले आहे.

तसेच सृजनाची आणि शांत स्वरुपाची देवी म्हणून गोमंतकात (कोकणात) प्रसिद्ध असलेल्या आणि कमरेला नागकडे आणि हातात कमलपुष्प घेतलेल्या सातेरीला पीकपाण्यासाठी, समृद्धीसाठी नवस बोलले जातातच, त्याच बरोबर तिला गाव-घराच्या रक्षणासाठीही आवाहन केले जाते. कांजिण्या, गोवर आदी रोगांची साथ आली अथवा लागण झाली तर त्यातून तारण्यासाठी तिला साकडे घातले जाते. सात रंगांच्या फुलांच्या माळा घालण्याचे नवस केले जातात.

मातृदेवीला आधी अदृश्य रुपात पुजले जायचे. अशा रुपात तिचा अदृश्य वास एकाद्या निर्जन जंगलात, एखाद्या झाडाखाली, नदी अथवा पाणवठ्याजवळ असल्याची धारणा रुजली. यातूनच पुढे तिचे दृश्य रुप पूजले गेले. वारुळ रुपातही तिला पूजण्यात आले. त्यानंतर लाकडी मुखवटा आला. नंतर फक्त धातूचे डोळेच (नयनकृती) पूजण्यात आले. त्यानंतर पितळीचा, धातूचा मुखवटा आला, त्यातून पाषाण मूर्ती अथवा धातूची पूर्ण मूर्ती निर्मिली गेली. सर्वसाधारणपणे आर्थिकदृष्ट्या मागासलेल्या संप्रदायाशी संलग्न मातृदेवता मुखवट्याच्याच रुपात पूजताना दिसतात. या रुपात तिची उग्रता जपलेली दिसते. काष्ठ शिल्प असेल तर लाल, काळा, पिवळा अशा भडक रंगात तिचे रुप रंगवलेले असते.

ज्या तऱ्हेने दक्षिणेत मातृदेवीचे उग्र आणि आदिम रुप दिसते, तसे ते गोमंतकात सध्या तरी सापडत नाही. इथे तिचे उग्ररुप म्हणून 'दूर्गा' रुप दाखवले जाते, परंतु दक्षिणेतील उग्र मातृदेवी आणि ही दूर्गा यांच्या दोघांच्या रुपात खूपच भिन्नता आहे. दक्षिणेतील मातृदेवी ही अ-उन्नयीत, तर दूर्गा वैदिक संस्कृतीच्या प्रभावातून उदयाला आलेली उन्नयीत देवी. मात्र एकेकाळी गोव्यातही मातृदेवतेच्या उग्ररुपाची संकल्पना अस्तित्त्वात होती याची पुष्टी

येथील सात बहिणींची परंपरा देते. गोव्यातील वेगवेगळ्या गावच्या ग्रामदेवता असलेल्या लईराई, मोरजाई, केळबाई, महामाया, मिराबाई, महालसा आणि अजादीपा या सात बहिणी म्हणून त्यांचे महात्म्य सांगितले जाते.

त्यांना खेतला वा खेतोबा नावाचा एक भाऊ आहे आणि काही ठराविक उत्सवप्रसंगी त्यांची भेटही घडवली जाते. या देवी आज बऱ्याच प्रमाणात उन्नयीत स्वरुपात दिसतात. त्यांना भजणारा समाजही आज सामाजिक आणि आर्थिकदृष्ट्या पुढारलेला आहे, परंतु संस्कृती विकासाच्या शेकडो वर्षाआधी शेजारच्या आंध्र, तामीळनाडू, कर्नाटक या राज्यातील सात बहिणी सारखेच त्यांचेही रुप आदिम, अविकसित असावे. आजही या देवीच्या कोपक्रौधाच्या कथा ऐकायला मिळतात.



७.

# म्हालजल्मी :
# मृत्यूपासून रक्षण करण्यासाठी रचलेले तंत्र

'मृत्यू हे जीवनाचे अटळ सत्य आहे. मानवाने कितीही शोध लावले. कितीही वैज्ञानिक आणि तांत्रिक प्रगती साधली तरी त्याला हे सत्य टाळता आले नाही. मृत्यू हे जसे काल सत्य होते, तसेच ते आजही आहे. त्याच्या या शाश्वत अस्तित्वामुळे मानवजात त्याला घाबरून आहे. त्याच्या विषयीची भीती समजायला लागल्यापासून ते जीवनाच्या अंतापर्यंत मानवाच्या मनात असते. आदिमकाली तर त्याच्याविषयी आजच्या पेक्षा कितीतरी पटीने जास्त भीती मानवाच्या मनात होती. हा मृत्यू येतो कसा? कोण आहे हा मृत्यू? ही कोणती शक्ती? आपल्या अंगातील प्राण हा मृत्यू नेतो कुठे? काय होते त्याचे?... असे कित्येक गूढ प्रश्न त्याला पडले होते आणि आपल्यापरीने त्याने या प्रश्नांना उत्तरेही शोधली होती. मृत्यूपासून आपले रक्षण करण्यासाठी त्याने कित्येक गूढ उपाय केले होते. त्याने कधीकाळी रचलेली ही यंत्र-तंत्रे आणि केलेले उपाय आज मानव समूहाचे सांस्कृतिक संचित म्हणून पुढे आलेले आहे.

मृत्यू येण्याची कारणे आजार, भूक, नैसर्गिक आपत्ती, जनावरांचा हल्ला... अशी काहीही असली तरी हे सारे एखाद्या दुष्ट आणि भयानक शक्तीच्या बाधेमुळे अथवा प्रकोपामुळे होते, असा आदिमकाली मानवाचा दृढ समज होता. या शक्तीला त्याने 'काळ' असे नावही दिले होते. ही शक्ती अदृश्य रूपात जगात वावरते आणि एखाद्या बेसावध क्षणी ती मानवावर झडप घालून त्याचा प्राण घेऊन जाते, असा समज होता. रात्री-अपरात्री, दुपार-मध्यान्य प्रहरी, अमावास्येच्या दिवशी, स्मशान स्थळ, अशा वेळात अथवा जागेवर कालशक्तीचा (कालपुरुषाचा) प्रभाव जास्त असतो, असाही समज होता.



**आमोणे–केपे येथील पाषाण रुपातील जल्मी. (१९९०)**

आदिमकाली मानवाच्या विचार-धारणेतून उदयाला आलेल्या कित्येक प्रथांमधील एक महत्त्वपूर्ण आणि जिच्यावर विज्ञानाच्या जगात आत्तापर्यंत खूपच मर्यादीत चर्चा झाली आहे; ती प्रथा म्हणजे घरात अथवा निवासाच्या जागी मृतदेह पुरण्याची प्रथा.

कुटुंबातील (टोळीतील) एखादा माणूस मेला तर त्याचा मृतदेह स्वतःच्या घरातच पुरण्याची प्रथा इ. स. पूर्व सातव्या अथवा आठव्या शतकापूर्वी दक्षिण भारतात होती, ज्यात महाराष्ट्राचाही समावेश होता, असे संदर्भ सापडतात. हा मृतदेह पुरण्याचे काम कुटुंबीतील व्यक्तीच करायच्या. मृतदेह पुरण्याआधी काही काळ तो उघड्यावर ठेवला जायचा. फ्रान्स, जर्मनी, इराक येथील गुंफांत, जिथे मानवी वास्तव्य होते त्या जागांवरही असे मृतदेह पुरले जात असल्याचे संदर्भ सापडतात.

महाराष्ट्रातील कातकरी, वारली वगैरे जमातीत तर एकेकाळी मेलेल्या माणसाला राहत्या घरातच पुरून पुढे ते घर सोडण्याची प्रथा हल्लीच्या काळापर्यंत होती. इजिप्तमधील 'ममी' ही प्रथा सुद्धा वरील प्रथेचेच एक रूप म्हणण्यास हरकत नाही.

गोव्यात वसाहत केलेल्या सुमेरियन लोकांमध्ये एके काळी मृतदेह आपल्या देवघरात पुरण्याची प्रथा असल्याची माहिती 'गोमन्तकाची प्रतिमा' या पुस्तकात समाविष्ट आपल्या लेखात सुप्रसिद्ध इतिहासकार अनंत रामकृष्ण धुमे देतात. अशा तऱ्हेने देवघरात मृतदेह पुरल्यानंतर खूप काळाने जेव्हा तेथील जागा भरत असे त्या वेळी ते मृतदेह उकरून काढून त्यातील अवशेष जाळले जात आणि पुढच्यांसाठी ती जागा मोकळी केली जात असे.

धुमे यांनी दिलेल्या माहितीप्रमाणे गोव्यात सुमेरांची वसाहत होती आणि त्यांच्याकडे स्वतःच्या देवघरातच मृतदेह पुरण्याची प्रथा होती असे जरी असले तरी आज गोव्यात स्थायिक जाती-जमातींमधील सुमेरवंशीय कोण आहेत हे

अजून स्पष्ट होत नाही. मात्र माझ्या स्वतःच्या निरीक्षणात देवघरात मृतदेह पुरण्याची प्रथा गोव्यात अस्तित्वात होती याला पुष्टी देणारे पुरावे आलेले आहेत.

गोव्यात बऱ्याच ठिकाणी 'जल्मी'चे (जन्मी) मठ मिळतात. हा जल्मी गावचा मूळपुरुष असून त्यांनी त्या गावची स्थापना केलेली अथवा त्या जागी वसाहत केलेली असते. या जल्मीसंबंधी आख्यायिका आणि इतर संदर्भ बघितल्यास त्या जल्मीमठात आज त्याची पाषाणे अथवा मूर्ती मिळतात तेच त्याचे मूळ स्थान आहे आणि त्याचे देहावसान झाल्यावर त्याचे देहदफन त्याच मठात केलेले आहे, असे स्पष्ट होते.

यासंदर्भात माझ्या आमोणे गावचा 'जल्मी' खूप महत्त्वाचा आहे. हा जल्मी मूळ नार्वे (तिसवाडी) गावचा. कोणे एके काळी तो आपल्या संस्कृतीच्या रक्षणासाठी तेथून बाहेर पडला आणि फिरत फिरत कुशावती तीरी (केपे) पोहोचला. नदी ओलांडून तो आता जिथे गाव आहे तिथे आला. ती घनदाट जंगल असलेली जागा आपल्यासाठी सुरक्षित समजून त्याने तेथे 'खुंटी मारून मठी जोडली' (प्रथे प्रमाणे देवाच्या नावाने एक खुंट पुरून, त्याने आपला निवास उभा करण्यासाठी तेथील अदृश्य शक्तींची मान्यता मागितली आणि तद्नंतर आपल्या निवासासाठी खुंटी पुरली आणि जागा वसवली.) देवाच्या नावाने स्थापन केलेली खुंटी पुढे गावची ग्रामदेवता खुंटीमाया झाली. पुढे त्याच्या कुलाचा विस्तार झाला. वर्षे उलटल्यावर जेव्हा त्याने या जगातील आपले कार्य संपवले तेव्हा त्याच्या वारसांनी त्याची स्थापना, त्याच मठीत केली. पुढे त्याला देवत्व प्राप्त होऊन तो गावचा ग्रामपुरुष झाला, अशी आख्यायिका किंवा मौखिक इतिहास सांगितला जातो.

या जल्मी देवाच्या मठाचे बारकाईने निरीक्षण केल्यास तसेच इतर संदर्भ पडताळून पाहिल्यास हा मठ हे या जल्मीचे मूळ निवासस्थान हे स्पष्ट होते. त्याच्या देहावसानानंतर त्याचा मृतदेह तिथेच पुरला आणि त्या जागी एक पाषाण स्थापून ती जागा राखून ठेवण्यात आली. पुढे एक तर त्याच्या वंशजांनी ते घर त्वरित सोडून जवळच दुसरे घर बांधले अथवा काही काळ तिथेच राहून नंतर दुसरे घर बांधले असावे. जल्मीच्या बाजूला आणखी दोन-तीन पाषाण आहेत. त्यांनाही जल्मीच म्हटले जाते. मुख्य पाषाणाला 'म्हाल जल्मी' असे उल्लेखले जाते.

या संदर्भाने पुढील गोष्ट सांगायला हवी : म्हैसूर विद्यापीठातून

लोकसाहित्याचा अभ्यासक्रम पूर्ण करून मी गोवा कोकणी अकादमीत लोकवेद संशोधिका म्हणून रुजू झाले. मला पहिलेच काम दिले गेले ते 'आमोणे' गावावर लोकसांस्कृतिक दृष्टिकोनातून एक ग्रंथ लिहायचे. त्या वेळी गावच्या संपन्न अशा सांस्कृतिक वारशाचे मी बारकाईने निरीक्षण केले. हे करताना जल्मी स्थापनेची ही गोष्ट माझ्या लक्षात आली. मी माझ्या लेखनात त्यासंबंधी माझा निष्कर्ष लिहिला, परंतु पुष्टी देण्यासाठी माझ्याजवळ इतर ठिकाणची उदाहरणे नव्हती. डॉ. मनोहरराय सरदेसाई त्यावेळी अकादमीचे लोकवेद विभाग प्रमुख होते. त्यांनी त्या विधानावरून माझी थट्टा केली. 'छान कल्पना आहे, एखादी कादंबरी लिही याच्यावर, पण ग्रंथात हे नको' असे ते म्हणाले. मग मी तो भाग वगळला, परंतु तो विचार माझ्या मनात धुमसत होता. एके दिवशी मी तो पांडुरंग भांगी यांना सांगितला. ऐकताच त्यानी माझे कौतुक केले. म्हणाले, 'तुझी निरीक्षण शक्ती छान आहे. अशीच जप' आणि त्यांनी मला या प्रथेसंबंधी पुष्टी देणारी माहिती दिली. एवढेच नव्हे तर लगेच त्यांनी 'Aspects of Indian History & Archeology' by H. D. Sankalia या पुस्तकातील 'Survival of observances of a prehistoric Customs' या लेखाची एक झेरॉक्स प्रतही आणून दिली. ज्याच्यात या तऱ्हेच्या प्रथेची माहिती होती. नंतर मी माझ्या 'लोकबिंब' या पुस्तकात त्या विषयी एक स्वतंत्र लेखच लिहिला.

घरात मृतदेह पुरण्यामागे मेलेल्या व्यक्तीच्या सान्निध्यात राहणे, अशी मानवी भावना होती असे काही विद्वानांचे मत आहे. माझ्या मते, या प्रथेआधी जिथे मृत्यू होत होता त्या जागी मृतदेहाची विल्हेवाट लावून ते घर सोडण्याची प्रथा अस्तित्वात होती आणि या मागचे कारण म्हणजे 'मृत्यू' विषयीची भीती. ज्या जागेत मृत्यूचा संचार आहे, त्या जागेपासून दूर राहून स्वतःचे रक्षण करण्याची सुरवातीची धारणा पुढे थोडी सैल झाली आणि पूर्ण घर सोडून न जाता, एखादा भाग अथवा खोलीच राखून ठेवण्याची प्रथा सुरू झाली.

या प्रथेचे अवशेष रूप अजूनही सापडते. अजूनही मरणाच्या वेळी वाईट 'चरण' (नक्षत्र) लागले म्हणून राहते घर तीन, पाच, सहा, बारा महिने असे सोडण्याची प्रथा रूढ आहे. यावर पर्याय म्हणून पूर्ण घर सोडून न जाता ज्या भागात मृतात्म्याचा अधिक प्रभाव आहे तीच खोली अथवा घराचा भाग बंद करून बाकीचा भाग वापरलेला दिसतो.



८.

# बनवड ः आत्म्याच्या मुक्तीसाठी धर्मयागांची निर्मिती

मृत्यूनंतर जिवाचे काय होते? याचे गूढ आदिमकाळी मानवाला पडले होते. सजीवाचा प्राण जातो कुठे? हा प्राण अथवा आत्मा नश्वर आहे की अमर? मानवाला पुनर्जन्म आहे का? आहे, तर मग कधी? एका मानवी जन्मातून मृत्यू पावल्यानंतर त्याला लगेचच परत मानवाचा जन्म मिळतो का? मानवाचा पुनर्जन्म मिळण्यासाठी अथवा आधीच्या जन्मातून पूर्णपणे मुक्ती मिळण्यासाठी त्याला अथवा त्याच्या आप्तजनांना काय करावे लागते? की ही मुक्ती सहज असते? अशा असंख्य प्रश्नांच्या चकव्यात तो अडकला होता.

हळुहळू आपल्या मानसिक प्रगतीबरोबर त्याने आपल्यापरीने या प्रश्नांची उत्तरे शोधली. त्या गुढांतून बाहेर पडण्याचे मार्ग काढले. आज उपलब्ध असलेल्या कितीतरी लोकसांस्कृतिक विधी आणि धारणांतून त्यांचा मागोवा घेता येतो.

मृत्यूनंतर माणसाला पुनर्जन्म आहे, परंतु हा पुनर्जन्म मिळण्यासाठी अनेक दुष्ट आत्म्यांच्या अथवा शक्तींच्या मेळ्यातून त्याची आधी सुटका होणे गरजेचे आहे. त्याच्या या मुक्तीसाठी त्याच्या पुत्राने (वारसाने) काही याग-विधी करणे जरुरी आहे. या विधींच्या सिद्धतेनंतर (श्राद्ध विधी) त्याला मुक्ती मिळते आणि त्याला स्वर्ग प्रवेश मिळतो. मग परमेश्वर त्याला मानवाचा पुनर्जन्म देतो. जर त्याने आपल्या आधीच्या जीवनात छोटीशी मुंगी सुद्धा मारण्याचे पाप केलेले असेल तर त्याचा स्वर्ग प्रवेश खोळंबतो. त्या पापासाठी काही काळ त्याला नरकवास भोगावा लागतो. तिथे प्रायश्चित घेतल्यानंतर त्याला

पुनर्जन्म मिळतो. एकाद्याची पापकर्मे खूप आणि भयंकर असतील तर त्याला कुत्रा, मांजर, डुक्कर, बैल, उंदिर, किडा अशा कित्येक जन्मांत फिरून, एकाद्या वेळी चौसष्ट हजार योनीत जन्म घेऊन त्यांच्या पापांचे पूर्ण परिमार्जन झाल्यावरच मानव जन्म मिळतो. याच्या उलट पुण्यवान माणसाला लगेचच परत मानव जन्म मिळतो आणि त्याला परत आपल्या मूळच्या कुटुंबातच जन्माला येता येते... असे समज आजही लोकमानसात प्रचलित आहेत आणि त्या समजांच्या पूर्तीसाठी विधीकार्येही केलेली दिसतात. गोव्यात आज ग्रामीण तसेच शहरी समाजात ही कार्ये वैदिक आणि अवैदिक अशा दोन पद्धतीने सिद्ध केली जातात. ब्राह्मण आणि तत्सम संस्कृतीत जगणारा समाज प्रामुख्याने ही कार्ये वैदिक पद्धतीने करतो. तर कुळंबी, गावडी आणि इतर संबंधित समाज अवैदिक पद्धतीने ही कार्ये चालवतो. या समाजातील आचारांमध्ये आदिम विचारधारणा आणि पद्धती आजही प्रभावीपणे सापडतात.

अवैदिक समाजाची जन्म-मृत्यू-पुनर्जन्म यासंबंधी आपली अशी वेगळी धारणा आहे, जी वैदिकांच्या विचार धारणेशी कधी कधी साम्य सांगते.

आदिम संस्कृतीत जगणाऱ्या माणसाकडेही प्रज्ञा होती आणि आपल्या परीने त्याने या विश्वाची उत्पत्ती-विभागणी करून त्याच्याशी सांस्कृतिक व्यवहाराचे तंत्र जुळवलेले होते असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. या संदर्भाने एक महत्त्वाचे उदाहरण देता येते. ते म्हणजे, केपे-काणकोण येथील कुळंबी (हिंदू) समाजामध्ये मृतखंड, पाताळखंड आणि कैलासखंड अशा तीन 'लोकां' विषयी अस्तित्वात असलेली संकल्पना. या जगाची मृतखंड, पाताळखंड आणि कैलासखंड या तीन खंडांत रचना झालेली आहे. यातील मृतखंड हे माणसांसाठी, पाताळखंड हे शेष-नागांसाठी, आणि कैलासखंड हे देव, गंधर्व, अप्सरा, किन्नर यांच्यासाठी आहे. या तिन्ही खंडाचे व्यवहार बघण्यासाठी विश्वनिर्मात्याने 'जाणभास' येणारे अथवा 'सायमत' किंवा 'गूढभाषा' जाणणारे तीन 'जाण' म्हणजे विद्वान निर्माण करून तेथील जबाबदारी त्यांच्यावर दिलेली आहे. पहिला जाण हा 'शिळवटी जाण', माणसाचे स्वर्ग लोकाकडील (कैलास खंडाकडचे) व्यवहार बघतो. दुसरा, 'धवळो जाण' हा पाताळ खंडाकडचे व्यवहार सांभाळतो. तर तिसरा 'सायजाण' अथवा 'घाडी' हा मृत पावलेल्या पितरांकडील व्यवहार सांभाळतो. ही पितरे यमखंडांत,



**बनवड गायन चालू असताना (पिर्ला–केपे, १९९२)**

जे स्वर्गलोकातच आहे तिथे राहतात. 'यम' हा यमखंडाचा धनी. तो तिथे नऊ 'बंदखणी' (कैद) बांधून त्या बंदखणीत मेलेल्या सर्व पितरांना, त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणे ठेवतो. मानवी जन्मात त्यांनी केलेल्या पापासाठी त्यांना ही कैद लाभलेली असते. तेथील शिक्षा पूर्ण झाल्यावरच त्यांना मुक्ती मिळते आणि पुढील जन्म मिळतो.

ही धारणा नव्या पिढीला कदाचित अनभिज्ञ असेल, परंतु वडील–जाणत्यांच्या मनात ती अजूनही वसलेली आहे. या धारणेतून जन्माला आलेली मृतांसंबंधीची एक लोकपरंपरा म्हणजे 'बनवड' अथवा 'बनवड गायन', 'बंदोड' अथवा 'बोनोड' असाही त्यांचा उच्चार प्रचलित आहे.

बनवड हा एक दीर्घ गायनाचा प्रकार. एकाद्या कुळंबी 'घरवयेंत' (कुटुंबात) मृत्यू झाला तर त्याच्या बाराव्या दिवशी, रात्रीच्या वेळी हे गायन करतात. तिन्हीसांजा झाल्यावर ठराविक विधी करून वडीलधारी मंडळी या गायनाला सुरवात करते. गायनाच्या ठराविक भागात पोहोचल्यावर, मध्यरात्री मेलेले पितर तिथे बसलेल्या कुटुंबातील एकाद्या व्यक्तीच्या अंगात अवतरते (संचारते) आणि आपण बंदखणीतून म्हणजे 'बनवडीतून' सुटून मुक्त झाल्याची ग्वाही देते. त्या नंतर गायन थांबवले जाते. वर्षश्राद्ध, अनसुटी श्राद्ध इत्यादी

दिवशीही बनवड गायिली जाते आणि पितरे मुक्त असल्याची खात्री करून त्यांना 'मायेला' (आपल्या सान्निध्यात) बोलावले जाते.

बनवड मध्ये 'सारख्यातून सारखे निर्माण होते' या यात्विक तत्वाचा वापर कुळंबी लोकमानसाने केलेला दिसतो. या गायनात महाभारतातील कथा गायली जाते, किंबहुना तिचा उपयोग केला जातो. ग्रांथिक महाभारतापेक्षा बनवडीतील महाभारत कथा वेगळी, परंतु पात्रे आणि काही घटनांमध्ये साम्य दिसते. यांत आपल्या मादीबरोबर शृंगारत असलेल्या मृगाचा वध केल्यामुळे पांडुराजाला त्यांचा शाप भोगतो आणि तो आपली पत्नी माद्रीशी रतीभोग घेण्याच्या प्रयत्नात असताना मृत्यू पावतो. इथपर्यंतच्या ग्रांथीक महाभारतातील कथानकांत आणि बनवडीतील कथानकांत साम्य आहे. मात्र पुढील भागात फरक आढळतो. तो असा : पांडूच्या मृत्यूनंतर त्याचे पुत्र पांडव त्याचे दहन करून हस्तिनापुरात येतात आणि तिथे गुरुच्या (आचार्य) सांगण्यावरून 'याग' (यज्ञ) मांडतात. याग सिद्धतेने पांडूचा आत्मा परत न आलेला बघून तो आणण्यासाठी गुरूच्या सल्ल्यावरून मग धर्म आणि इतर भाऊ स्वर्गात जातात. तिथे यमाच्या आठ बंदखणी फोडल्या तरी त्यांना पितरे सापडत नाहीत. मग ते यमाला विनंती करतात की आपल्या वडिलांचा आत्मा परत दे. तशी त्यांची दया येऊन यम त्यांना घेऊन वनात जातो. तिथे मृगाच्या शिंगावर पांडूचा प्राण असतो. यम त्याला धर्माच्या स्वाधीन करतो. नंतर धर्म आणि इतर पांडव तो घेऊन पृथ्वीलोकात यायला निघतात. एवढे काम करून यम परत यमखंडात जातो, परंतु त्याला चैन पडत नाही. तो तसाच परत येऊन पांडवांना वाटेत अडवतो आणि त्यांना शहाणपणाच्या चार गोष्टी सांगतो. म्हणतो, 'आज तुमची पितरे तुम्ही घेऊन गेलात तर उद्या दुसरे लोक येऊन त्यांच्याही पितरांच्या आत्म्याची मागणी करतील. मग मला त्यांनाही ती द्यावी लागतील. असं घडलं तर या विश्वाचे गणित चुकेल. सगळीकडे गोंधळ माजेल. तेव्हा तुमचे पितर परत द्या अन् हस्तिनापूरला परत जाऊन श्राद्ध करा. कावळ्याला 'काकावळ' घाला. कावळ्याच्या रुपे तुमची पितरे येऊन, अन्नाचा स्वीकार करतील आणि तुमच्या मायेला पाठीशी राहतील. मग पांडव त्याप्रमाणे करतात.

'बनवड' गायनाच्या यागातून मृत्युनंतरचे आत्म्याचे व्यवहार कुळंबी समाजाने चित्रांकित केलेले आहे. ●●●

९.

# भूतांचा नाथ भूतनाथ : आदिम संस्कृतीत भूतांनाही महत्त्व

'भूत ही संकल्पना खूप जुनी. अतिशय आदिम, माणसाच्या अप्रगत अवस्थेतली. ज्या काळी त्याला मृत्यूचे गूढ पडले होते, त्या काळात ती जन्माला आलेली. माणसाचा मृत्यू फक्त कोणा एकाच कारणातून अथवा घटनेतून होत नाही, तर त्याला तऱ्हेकवार कारणे आणि घटना जबाबदार असतात. अशा विविध कारणांतून किंवा घटनांतून आलेल्या मृत्यूचे परिणाम काय असतात? अशा प्रश्नातून ही संकल्पना उदयाला आलेली.

जन्माला आलेल्या जीवाच्या जीवनाच्या बाल्य, पौगंड, प्रौढ आणि वार्धक्य अशा चार अवस्था असतात. या चारही अवस्था पूर्ण केल्यावर, जीवनाचा पुरेपूर भोग घेतल्यावर ज्या माणसाला नैसर्गिक रितीने मृत्यू येतो तो मुक्तीला पावतो, परंतु या अवस्था पूर्ण करण्याआधी अनैसर्गिकपणे जो मृत्यू पावतो, त्याच्या आत्म्याला मुक्ती मिळत नाही. तो भूत योनीत समाविष्ट होतो, अशी धारणा त्या काळी माणसाची होती. ज्या तऱ्हेने मृत्यू येतो, त्या प्रकारावरून मग भूताला नावे देण्यात येत होती.

भूताची ही संकल्पना वैश्विक आहे. जगात लहान-मोठ्या, आदिम-प्राचिन अशा साऱ्या संस्कर्तीमध्ये ती सापडते. आदिम काळी ती जास्त प्रभावी होती. भूत ही अदृश्य संकल्पना. म्हणजे भूत (भूते) असते किंवा आहे असे लोक मानतात. परंतु त्याचे रुप-रंग, आकार यासंबंधी कुणीच निश्चित असे सांगू शकत नाही. मात्र काही ठराविक भूते ज्यावेळी दृष्टीस पडतात, त्या वेळी ती अमूकच रुपात दिसतात, असा लोकविश्वास आहे. तसेच घडणाऱ्या

काही विचित्र-गूढ घटनांमुळे त्यांचे अस्तित्त्व जाणवते असेही मानले जाते.

आदिम संस्कृतीमध्ये जसे देव-दैवतांचे आणि इतर अतिमानवी शक्तींचे महत्त्व होते, तसेच भूतांनाही स्थान होते, असे म्हटल्यास ते चुकीचे ठरणार नाही. कारण कित्येक लोकधर्मीय विधी-परंपरांनी भूतांचा 'मान' केला जातो. एवढेच नव्हे, तर लोकनाट्यांमध्ये त्यांचे सोंग नाचवले जाते. गोव्यात सांगे तालुक्यातील 'कुमारी' गावी कार्तिक पौर्णिमेला सादर होणाऱ्या 'रणमाले' या लोकनाट्यात सुरवातीला 'भूत' येते, म्हणजे त्याचे सोंग येऊन आपली भूमिका वठवून जाते.

"भूत आयले बाबा भूत
काऱ्या मुळांत गेलेले..!"

असे म्हणत हे सोंग प्रांगणात येते आणि काही वेळ नाचत परत जाते. ('कारो' या झाडावर भुते राहतात, असा समज लोकमानसात रुढ आहे.)

या लोकधर्मीय विधी-आचारात भूतांचा मान-पान करणे अथवा त्यांची सोंगे नाचवणे, या मागे या जगात अदृश्य रुपात वावरणाऱ्या भूतांनी मानवसमूहाला पिडापीड करू नये म्हणून त्यांना शांत करण्याचा तसेच स्थिर ठेवण्याचे प्रयोजन दिसते.

भूतांच्या अदृश्यतेविषयी इथे एक गोष्ट मुद्दाम नोंद करायला हवी, ज्या वेळी लोकनाट्य अथवा लोकनृत्यांमध्ये त्यांची सोंगे नाचवली किंवा वठवली जातात, त्यावेळी ती अशा तऱ्हेने रंगवलेली अथवा न्हेसवलेली असतात की ती अदृश्यच दिसावी. यांतून लोकमानसाला त्यांची अदृश्यता अभिप्रेत आहे, हे स्पष्ट होते. उदा. सांगेच्या रणमाल्यात भूताचे सोंग पूर्ण काळे कपडे परिधान करते. तोंड-डोकेसुद्धा काळ्या कपड्याने झाकले जाते. मात्र सोंगाचे नाक-डोळे-तोंड पांढऱ्या रंगाने रेखांकित केले जाते.

भूताविषयी खूप समज आजही समाजात रुढ आहेत. ग्रामीण भागात ते जास्त प्रभावी दिसतात, तरी शहरी, उच्चभ्रू तसेच 'आधुनिक' म्हणवणाऱ्या लोकांमध्येही ते प्रचलित आहेत. याचे एक महत्त्वपूर्ण प्रमाण म्हणजे टीव्ही चॅनल्सवर चालणाऱ्या आणि लोकप्रिय झालेल्या भूतांच्या मालिका.

भूतांविषयीचे काही समज पुढीलप्रमाणे आहेत : भूत अथवा 'भूतावळ' (भूत समूह) आपल्या माणसांच्या 'मायेला' येते, परंतु त्याचा मानपान

चुकल्यास अथवा त्याचा अपमान झाल्यास ते घरच्यांना ही पिडापीड करते. त्याच्या बाधेमुळे कुणाला वेड लागते, घराची दैना होते, कुणी आजारी पडतो, एखाद्या वेळेस मृत्यू सुद्धा होतो. भूत थोड्या शांत प्रवृत्तीचे असेल तर ते मोठी हानी न करता लहान लहान घटनांतून आपले अस्तित्त्व किंवा रोष दाखवते.



**भूतांचा नाथ भूतनाथ**
**(चंद्रनाथ पर्वत, पारोडा – केपे, १९९०)**

भूताला क्षेत्रमर्यादा असते. काही भूतांची शक्ती एखाद्या घरापुरतीच मर्यादित असते, तर काहींचे क्षेत्र ठराविक परिसर अथवा गावाच्या सीमेपर्यंत असते. त्याच्या क्षेत्राबाहेर त्याची शक्ती चालत नाही. गावच्या सामूहिक कारणामुळे एखाद्याचा अवेळी मृत्यू होऊन अथवा घराबाहेर त्याचा मृत्यू होऊन भूत बनले असेल तर त्याचे बाधाक्षेत्र मोठे असते.

भूत जसे माणसाला झपाटते तसेच ते वास्तुलाही झपाटते, अशी धारणा आहे. खूप काळ एखादी वास्तू बंद असेल, त्या वास्तूत कुणाचा खून-हत्या होऊन किंवा अपघाती मृत्यू होऊन ती काही काळ बंद ठेवली असेल तर मग तिथे त्या माणसाचे भूत वास्तव्य करते, असा समज आहे.

भूताने झपाटलेला माणूस विचित्र वागतो. एक तर जेवत-खात नाही अथवा खाल्लं तर बकाबका खातो. मोठ-मोठ्याने ओरडतो, विचित्र आवाज काढतो. तो देवाजवळ जात नाही. देव-देवतांच्या मूर्ती वा फोटोला स्पर्श करत नाही. खंगून खंगून जातो. कधी कधी तो बोलतही नाही, मूक राहतो.

वास्तूला भूतबाधा झाली असेल तर त्या वास्तूत राहणाऱ्या लोकांना त्रास होतो. त्यांची दुर्दशा होते. भूताने गावाला झपाटल्यास गावाचीही दुर्दशा होते. गावावर संकटे येतात.

भूताला समजावण्याचे, त्याच्याशी वार्तालाप करून त्याला पळवून लावण्याचे काम लोकसमुहाने समाजातील विशिष्ट व्यक्तींकडे सोपवलेले आहे.

यातील एक व्यक्ती म्हणजे 'घाडी'. घाडी खास 'घुडे' रचून, 'घाडपण' करून भूतांना पळवून लावतो. कधी कधी त्याला बाटलीत भरून समुद्रात ही फेकतो. घाडीपणाची परंपरा वारसाने येते.

याशिवाय 'बंठ', 'भगत' आदीही भूतांना काबूत आणण्याचे काम करतात. बंठपण हे वैयक्तिक पातळीवरचे असते. एखाद्या पुरुष वा स्त्रीला देवाचा दृष्टांत होऊन अंगात दैवी शक्ती येते, मग तो असली कार्ये करतो.

भगत देव-देवतांना कौल लावून भूतांना पिटाळून लावतो किंवा त्यांचा बंदोबस्त करतो. हल्ली ब्राह्मण पुजारीही हे काम करताना दिसतात. काही गावांत म्हारींगण देवाचा उपासक 'महार' आणि गावचा प्रमुख 'गावकार', 'दृष्ट काढण्याचे' तंत्र वापरून भूतबाधा काढतो. सिद्ध पंथीयही भूते काढण्याचे कार्य करीत असल्याची माहिती मिळते. देव-दैवतांमध्ये 'भूतनाथ' या देवाला भूते घाबरतात असा समज आहे. भूतनाथाला 'भूतांचा नाथ' असे मानले जाते. इथे 'नाथ' म्हणजे ज्यांच्या काबूत भुते असतात, तो प्रमुख असा अर्थ अभिप्रेत आहे. भूतनाथ देवाला भूते घाबरतात, या गोव्यातील लोकमानसात असलेल्या धारणेला धरून पेडणे येथे दसऱ्याच्या उत्सवात आश्विन पौर्णिमेला भूतनाथ देवाच्या अंवसराकडून भूते काढण्याचे कार्य होते. एके काळी गोव्यातील विविध भागांतून भूताने झपाटल्याचा संशय असलेल्या व्यक्तींना भाराकडे (अवसराकडे) आणले जायचे. भार आपल्या तरंग आणि बेतकांठीच्या साहाय्याने भूतांना पिटाळून लावायचा.

केपे-पारोडे येथील दसऱ्यातही भूतनाथाकडून हे कार्य होते. येथे चंद्रनाथ पर्वतावर दरवर्षी 'मालिनी' अमावास्येला 'भूतांची जत्रा' भरते असा समज असून, त्या एकाच पूर्ण रात्री वर्षातून एकदाच भूतनाथाचे मंदिर उघडे ठेवले जाते.

मरणाच्या प्रकारातून भूतांना लोकमानसाने 'समंध', 'खेत्री', 'निमो' अथवा 'दिणो', 'मुंजो', 'सटी', 'वारगत', 'आलवांतीण', 'निपुत्रिक', 'बाळसटी', 'ब्रह्मराक्षस' अशी नावे दिलेली आहेत. माणसांना छळण्याच्या त्यांच्या पद्धती त्यांच्या मरण्याच्या प्रकारावर अवलंबून असतात.



१०.

# कुलचिन्ह : पूर्वज आराधनेचे एक रूप

मानवाच्या रानटी अवस्थेत उदयाला आलेली आणि मानवी उत्क्रांतीचे अनेक पर्वत ओलांडूनही आजही समाजात आपले अस्तित्व टिकवून असलेली एक परंपरा म्हणजे 'कुलचिन्ह' अथवा 'कुलप्रतीक' (देवक) परंपरा. या कुलचिन्हावरूनच एकाच तऱ्हेच्या वांशिक गटाच्या मानवसमूहाला 'कुल' असे संबोधण्यात आलेले आहे.

कुलपरंपरेचे महत्त्व आजही समाजात आहे. आजही पारंपारिक पद्धतीने लग्न-संबंध जोडताना वधू-वराचे कुल बघण्यात येते. तसेच आपण अमुक कुलातील, म्हणून आपली ओळख सांगण्यात अजूनही कित्येक उच्चभ्रू लोक तसेच उच्च विद्याविभूषितही आपण अमुक कुलाचे म्हणून मिरवण्यात भूषण मानताना दिसतात.

वैदिक संस्कृती मानणाऱ्या आर्यांमधे कुलचिन्ह परंपरा होती, असे मत हॉपकिन्स, कीर्थ या पंडितांनी मांडलेले आहे. आर्यसुद्धा वन्य अवस्थेतूनच सुधारलेले आहेत, ही गोष्ट इथं लक्षात घ्यावी लागेल.

माझ्या मते कुलचिन्हाची परंपरा, मानवाला मानवजन्माच्या पडलेल्या रहस्यातून जन्माला आलेली आहे. स्त्रीच्या कुशीत नवजीवाची प्रतिष्ठापना कशी होते, या विषयी आदिम मानवाला वाटलेल्या गुढातून या परंपरेची उत्पत्ती झाली. या काली मानव पशू, पक्षी, झाडे, वेली, जीव-जंतू अशा कित्येक सजीव तसेच कित्येक निर्जीव वस्तूंच्या सान्निध्यात होता. या साऱ्यांचा प्रभाव स्त्रीच्या कुशीवर होऊन अदृश्य रुपे तिच तिच्या उदरातून जन्म घेतात अशी

त्यांची धारणा झाली असावी. मानवी बालक मातेच्या उदरातून जन्माला आले तरी मूळ जीव त्यांचा, या धारणेतून त्यांनी पशू, पक्षी, झाडे इत्यादींना आपले पूर्वज मानले. पुढे त्या वस्तू संबंधित समूहाच्या कुलचिन्ह बनल्या.

सर जेम्स फ्रेझर या विद्वानाने कुलचिन्हाच्या उत्पत्तीचे चार सिद्धांत मांडलेले आहेत. त्यांच्या पहिल्या सिद्धांताप्रमाणे, या प्रथेचे मूळ 'आर्थिक विभागणी' या सामाजिक नियोजनात आहे. आदिम काळी मानवाच्या आर्थिक व्यवहाराचे स्वरूप सामूहिक होते. जनावरांची शिकार करणे, फळे-कंदमुळे गोळा करणे या सारख्या गोष्टी त्याच्या उदरनिर्वाहाची साधने होती. अशा वेळी कोणत्या समूहाने कोणत्या जनावराची शिकार करावी, कोणती फळे खावी याची विभागणी केली गेली. यातूनच ज्या समूहाच्या वाट्याला जी फळे, झाडे, जनावरे, पक्षी इत्यादी आले ती त्यांनी मारण्यावर निर्बंध घातले. पुढे तीच त्यांच्या समूहाची कुलचिन्हे बनली.

फ्रेझरच्या दुसऱ्या सिद्धांताप्रमाणे आदिम माणसाला स्त्रीमध्ये गर्भधारणा कशी होते याचे अज्ञान होते. यातून जवळपासची जनावरे, पक्षी, झाडे, वनस्पती, वस्तू यांच्या निकटच्या सहवासातून तिला गर्भधारणा होते, असा त्याचा समज झाला. पुढे त्यांनाच आपले पूर्वज मानून त्यांनी त्यांची पूजा-अर्चा सुरू केली आणि आपल्या कुलाचे चिन्ह म्हणून मानले.

त्यांच्या तिसऱ्या सिद्धांताप्रमाणे निसर्गातील सजीव प्राणी-वनस्पती इत्यादी तसेच नैसर्गिक घटना यांच्याकडे मानवाचे जवळचे आणि भरभक्कम असे भावनिक संबंध असावेत या कल्पनेतून कुलचिन्हाचा जन्म झालेला आहे.

फ्रेझरच्या चौथ्या सिद्धांताप्रमाणे कुलचिन्ह अथवा कुलप्रतिकाच्या उत्पत्तीचे कारण 'धर्म' आहे. निसर्गाच्या सान्निध्यात जीवन जगणाऱ्या आणि निसर्गधर्म मानणाऱ्या माणसाला या काळी कित्येक नैसर्गिक आपत्तींना तोंड द्यावे लागत असे. अशा वेळी निसर्गातील सजीव तशाच निर्जीव घटकांची पूजा करून, आपत्तीच्या निवारणाची त्यांनी कामना केली. यातूनच कुलचिन्हांची उत्पत्ती झाली.

रानटी अवस्थेत उत्पत्ती झालेली कुलचिन्ह परंपरा आजही आपले वैशिष्ट्य टिकवून आहे. त्याकाळी एका टोळीत कित्येक कुलांचे लोक राहत होते. त्याचेच बदलते रूप म्हणून आज एका जातीत अथवा जमातीत कित्येक कुले



झाड हे आदिमांचे एक प्रमुख कुलचिन्ह.

आणि त्यांची कुलचिन्हे प्रचलित असलेली दिसतात. एका कुलातील लग्नसंबंध कोणत्या कुलाकडे जोडले जावेत हेही परंपरेने ठरलेले असते. एका कुलाची, एकापेक्षा जास्त कुलचिन्हे असू शकतात.

ज्या कुलचिन्हांपासून आपल्या कुलाची उत्पत्ती झाली असे मानण्यात येते त्या सजीव अथवा निर्जीव वस्तूंकडे त्या कुलाचे लोक अतिशय श्रद्धेने, आदराने पाहतात. त्याची पूजा-अर्चा करतात. संकटसमयी मदतीसाठी त्याचा धावा करतात. शुभकार्याची सुरवात त्याच्या आवाहनाने होते. गोवा-महाराष्ट्र भागात लग्नकार्याची सुरवात 'देवक' पूजनाने होते. ही देवकपूजा म्हणजेच कुलचिन्ह पूजा. या पूजेत बहुतेक जागी शर्वरी, उंबर, आंबा, वड, पिंपळ, कलम असे जे कोणते झाड कुलचिन्ह म्हणून मानले जाते, त्याची फांदी आणून तिची पूजा-सन्मान केला जातो. (फांदीऐवजी प्रत्यक्ष झाडाचीही पूजा केली जाते.)

कुलचिन्ह असलेले झाड त्या कुलातील लोक स्वतः कापत नाहीत. पक्षी-प्राणी यांची शिकार करीत नाहीत. त्याचे मांस खात नाहीत. त्या झाडाची फुले स्त्रिया डोक्यात माळत नाहीत. कुलचिन्ह असलेल्या झाडाखाली बसणेही काही वेळा त्या कुलातील लोकांना वर्ज्य असते. एखाद्या प्रसंगी अनिवार्य होऊन कुलप्रतीक असलेले झाड कापावे लागलेच अथवा जनावर मारावे लागलेच

तर आधी त्याला साकडे घालून क्षमा मागूनच ते करतात. तसेच आपले कुलप्रतिक असलेले जनावर, पक्षी मेलेले आढळले तर त्यांची मृत शरीरे विधियुक्त पुरण्याचे बंधन असते. प्राथमिक अवस्थेत माणूस त्याचे 'सुतक' पाळत असे. निलगिरी प्रदेशात वास्तव्य करणारी 'तोड' ही आदिवासी जमात अशाप्रकारे आजही सुतक पाळत असल्याची माहिती मिळते.

एखादे धान्य अथवा खाद्यप्रकार कुलप्रतिक असेल, परंतु प्राप्त परिस्थितीत त्याचे सेवन अनिवार्य असेल तर मग त्यावर पर्याय शोधलेला दिसतो. यासंबंधी दोन मजेशीर उदाहरणे मला स्वतःला शोधयात्रेत सापडली. यातील एक म्हणजे केपे तसेच अवेडे येथील ख्रिस्ती कुळंबी जमातीचे लोक (हे इतर जागीही असण्याची शक्यता आहे.) 'पेज' जेवतात, परंतु पेजेवरची साय खात नाहीत. पेजेवर नुसती साय आलेली दिसली तर सुद्धा ती पेज ते जेवत नाहीत. या जमातीचे कुलप्रतीक 'भात' असे सांगितले जाते.

दुसरे उदाहरण म्हणजे, 'माकडखायरे' (माकडमारे) टोळीचे लोक ज्यांचे एकेकाळी मुख्य अन्न माकडाचे मांस होते. ते सगळ्या जातीच्या माकडांचे मांस खातात, परंतु लाल तोंडाचे माकड खात नाहीत अशी माहिती मिळालेली आहे. 1992 साली 'लोकमत'चे विद्यमान संपादक राजू नायक जे दै. सुनापरांत'चे तेव्हाचे संपादक होते, त्यांच्या सांगण्यावरून मी रविवार पुरवणीसाठी धडे-सावर्डे येथील रानात वस्ती करून राहणाऱ्या माकडमाऱ्या टोळीवर एक माहितीपर लेख तयार केला होता. त्यासाठी त्यांच्या वस्तीवर गेले असता त्यांच्या कुटुंब प्रमुखाने ही माहिती मला दिली होती. असे का? म्हणून त्यांना विचारले असता ते म्हणाले, ''आमच्या कुलाचे ते पूर्वज आहेत. त्यांनीच आम्हाला इतर प्रकारचे माकड खाण्याची परवानगी दिली आहे. तुम्ही लोक जसे डाळ-भाजी खाता, तसे आम्ही माकड खातो.'' हे लोक मूळ 'कातकरी' समाजाचे, त्यांच्या माकड खाण्यामुळे त्यांना 'माकडखायरे' हे नाव पडले, अशीही माहिती त्यांनी मला दिलेली. मिळालेल्या माहितीप्रमाणे या माकडमाऱ्यांची वस्ती आज तिथे नाही. परंतु गोव्यात फोंडे तालुक्यांत माकडमारे आहेत, ज्यांना वानरमारे म्हणुनही संबोधले जाते.

एखाद्या प्राण्यापासून कुलाची उत्पत्ती झाली अशा समजूतीतून जसे कुलचिन्ह स्वीकारले जाते, तसेच एखाद्या झाडा वा वेलीमुळे, जनावर,

पक्षामुळे, कुलातील कोणाची संकटातून सुटका झाली असेल तर पुढे तो माणूस तसेच त्याची वंशावळ त्या पक्ष्यालाही आपले कुलप्रतीक मानताना दिसते. निर्जीव वस्तूलाही अपवादाने कुलचिन्ह मानल्याची माहिती सापडलेली आहे. केपे तालुक्यातील एका घराण्याचे लोक 'कांकण-चुड्याला' आपले कुलप्रतीक मानतात. त्यांच्या देवघरात कांकण-चुड्याची माळ पूजेला लावलेली आहे. त्यांचा पूर्वज म्हणे खूप वर्षाआधी आपला जीव वाचवण्यासाठी वळाराचा (कांसाराचा) वेष घेऊन आपल्या मूळ गाव नार्वेहून पळून केपे येथे येऊन स्थायिक झाला. कांकण-चुड्याच्या माळीमुळे आपला जीव वाचला आणि वंश तरला, या भावनेतून ती माळ आज त्यांचे कुलप्रतीक बनलेली आहे.

काही गावांची नावे प्राण्यांवरून - वनस्पतीवरून पडलेली असतात आणि त्या गावचे लोक त्या वस्तू निषिद्ध मानताना दिसतात. उदा. गोव्यातील मोरजी गावचे लोक म्हणे 'मोरी' हा मासा खात नाहीत. (मूळवासी - मोरजकर), कर्ला (केपे) गांवचे लोक 'कर्ली' हा मासा खात नाहीत, (मूळवासी-कर्लकार) मुळगावचे लोक मुळा ही भाजी खात नाहीत, (मूळवासी - मुळगावकर) या मागे कुलचिन्हा प्रतीची श्रद्धा कारण आहे.



# ११.

# देवचार : लोकसमूहाच्या रक्षणार्थ निर्मिलेली शक्ती

या पृथ्वीतलावर, या चराचरात दर दिवशी, दर क्षणी कित्येक घटना-घटिते घडतात त्यांचा कर्ता-करविता कोण? ...जगण्यासाठी तऱ्हेकवार संघर्ष करणाऱ्या आदिमांना हे गूढ पडले होते. यातूनच त्याने एका असामान्य आणि अचाट अशा शक्तीची कल्पना केली. हीच शक्ती आपले जीवन नियंत्रित करते. तिची कृपादृष्टी असेल तरच जगात आपले तरणे शक्य आहे, अशी त्यांची धारणा झाली आणि त्याने या शक्तीचेच संकटसमयी आवाहन केले. तिचा धावा केला. वेळोवेळी तिला मानपान करून, भेटी देऊन 'जागृत' केले.

प्रांत, प्रदेश, लोकसमूह यांच्या फरकाप्रमाणे या शक्तीला वेगवेगळी नावे दिली गेली. गोव्यात अथवा कोकणपट्टीत या शक्तीला 'देवचार' या नावाने संबोधित केले गेले.

देवचाराची उत्पत्ती 'देव' संकल्पनेच्या पूर्वीची. खरे तर देवचाराचे कार्य बघता 'देव' हे देवचार संकल्पनेचेच सुसंस्कृत रुप म्हटले तर ते चुकीचे होणार नाही. मानव समूहाला तारणे हे जसे देवाचे कार्य तसेच ते देवचाराचेही. दोघेही आराधनेने प्रसन्न होतात आणि वेळोवेळी (ठरावीक वेळी) मान-सन्मान झाला नाही तर कोपतातही. देवचार या शब्दांतही 'देव' आहे. देवचार शब्दातील 'चार' हा शब्द मूळ 'चर' म्हणजे प्राणी असा असून सुरवातीला अंगात 'दैवी' म्हणजे असाधारण शक्ती असलेला प्राणी अथवा माणूस या अर्थाने 'देवचार' शब्द घडला असावा. पुढे 'देव' कल्पना उदयाला येताना ही शक्ती, प्राणी अथवा माणूस याही पलीकडची आगळी, अशी धारणा उदयाला येऊन त्यांतील

‘चर’ शब्द गळून ‘देव’ हाच शब्द बाकी राहिला असावा.

लोकमानस देवचाराकडे देवरुप शक्ती म्हणूनच बघते. मात्र, काही शब्दकोश अथवा पुस्तकांत देवचार शब्दाचा अर्थ डेव्हिल, डेमन, राक्षस असा या विषयाच्या अज्ञानामुळे दिला गेला असल्याने देवचार ही दुष्ट शक्ती, असा समज पुस्तकी अभ्यासकांमध्ये प्रचलित आहे. तसेच वैदिक संस्कृतीचे प्राबल्य असलेल्या समाजातही अवैदिकांच्या परंपरांकडे बघण्याच्या संकुचित दृष्टिकोनातूनही देवचार म्हणजे रानटी, दुष्ट शक्ती, असा समजही रूढ असलेला दिसतो. यातूनच ‘देव दिता, देवचार नाडटा!’ म्हणजे ‘देव देतो आणि देवचार लुबाडतो’ यासारख्या कोकणी म्हणी जन्माला आलेल्याही दिसतात.



देवचाराची स्थळे गोव्यात गावोगावी सापडतात.

शेकडो वर्षांआधी जन्माला आलेल्या देवचार संकल्पनेने एके काळी गोव्यातील लोकमानसावर खूप मोठा प्रभाव घातला होता, याचे प्रमाण म्हणजे आज गोव्यातील गावोगावी सापडणारी देवचाराची स्थळे. गोव्यात एकही गाव सापडणार नाही जेथे देवचाराचे स्थळ नाही. गोव्यात सर्वांत मोठा लोकोत्सव म्हणून प्रसिद्ध असलेल्या शिगम्यात देवचाराच्या आवाहनाचा भाग मोठा दिसतो. मूळ मांडावर, ‘म्हणजे निसर्गाच्या छायेत उघड्यावर होणाऱ्या या उत्सवातील कित्येक आचार देवचाराकडेच संबंधित असतात. गावच्या ‘सीमा बांधणे’ ही शिगम्यातील एक प्रमुख ‘भोगावळ’. या भोगावळीत देवचाराला त्याचा ‘मान’ देऊन एका वर्षांसाठी गावचे रक्षण करण्याचा जणू त्याच्याकडे करारच केला जातो. देवचाराच्या शिगम्याच्या उत्सवातील या भूमिकेसाठी ‘शिगमा (आणि ख्रिस्तींचा इंत्रुजही) हा देवचाराचा उत्सव, अशी लोकोक्तीही सापडते.

देवचार ही शक्ती या चराचरात सर्वत्र वावरत असते, अशी धारणा असली तरी या शक्तीला आवाहन करणे सोयीस्कर व्हावे या हेतूने आदिम

समाजाने त्याच्या अधिकार क्षेत्राची मर्यादा आखून त्यांना त्या त्या प्रमाणे नावे दिलेली दिसतात. ही पृथ्वी तीन प्रमुख भागांत विभागलेली आहे, असा समज लोकसंस्कृतीत दिसतो. हा समज देवचाराचे अधिकार क्षेत्र ठरवतानाही पुढे ठेवलेला आहे. डोंगर, पाणी आणि सपाट भूतल असे भूमीचे तीन भाग बनतात. याला धरूनच तीन प्रमुख देवचार ठरलेले आहेत. डोंगरावर ज्याचे अस्तित्त्व असते तो 'रोंदिरो', पाण्याजवळ ज्याचे अस्तित्व असते तो 'वझर्यो'. सपाट भूतलावर ज्याचे अस्तित्व असते त्याला 'देवचार' अशी नावे दिली गेली. इथे देवचाराला परत कार्याप्रमाणे वेगळी नावे प्रदान केली आहेत. शेत-मळ्यासंबंधित तो 'म्हारू', स्मशानासंबंधित 'हापशी' आणि रानासंबंधित खास करून जिथे वाघ असतात तो 'वाघरो'. परत स्थळावरून, तेथील एखाद्या खुणेवरून, 'चिंचे देंवचार', 'नास', 'गड्या देवचार' अशीही वेगवेगळी नावे दिली आहेत.

देवचार ही मूळची अमूर्त (हल्ली त्याच्या मूर्ती स्थापलेल्या दिसतात ही गोष्ट वेगळी), अदृश्यरुपी शक्ती. त्याचे वास्तव्य परिसरातल्या जुन्यातल्या जुन्या झाडावर असते, असा समज. हे झाड मुख्यतः आंबा, चिंच, घोटींग, कारो, खष्टीवृक्ष हे असते. देवचाराचा मान करायचा असल्यास तो या झाडाखालीच केला जातो.

देवचार ही खऱ्या अर्थाने कोकण भूमीतील मूळ दैवी शक्ती, ती येथील भूमिपुत्रांच्या कल्पकतेतून जन्माला आलेली, म्हणूनच ती त्यांना देवापेक्षाही जास्त जवळची. याचे प्रमाण म्हणजे देवचाराचे दृश्य रुप आणि त्याला अर्पण करतात त्या वस्तू. देवचार जेव्हा कधी कुणाला दिसतो असे मानतात, तेव्हा तो एखाद्या गावकऱ्यांच्याच (शेतकऱ्यांच्या) रुपा-वेषातच दिसतो. कधी तो नुसती काष्टी (लंगोटीचाच एक प्रकार) नेसून दिसतो, तर कधी कासाट्याने धोतर नेसलेला. कधी डोक्याला 'खोळ' (घोंगडीची पायघोळ टोपी) घातलेला, कधी डोक्यावर मुंडासा बांधलेला, खांद्यावर कांबळ (घोंगडी) आणि हातात 'सोटा' घेतलेल्या वेषात दिसतो. त्याला गावकऱ्याच्याच पेया-अन्नाचा भोग अर्पण केला जातो. म्हणजे 'रोंट', (पाचोळ्यात भाजलेली तांदळ्याच्या अथवा नाचण्याच्या पिठाची भाकरी), सूर (ताडी) अथवा दारू, सुकी मासळी या वस्तू दिल्या जातात. यांत कधी कधी कोंबडाही असतो.

देवचाराचे प्रमुख कार्य म्हणजे ‘राखण’ (रक्षण) करणे. यासाठी त्याला ‘राखणदार’ असेही संबोधले जाते. गावागावांतील गुरे-वासरे, शेती-पिके यांचीही राखण देवचार करतो, अशी धारणा. आजही लोकसंस्कृतीतल्या धारणांना पकडून असलेल्या समाजात देवचाराला गावच्या राखणीसाठी दरवर्षी आवाहन केले जाते आणि त्याचा सूर-रोंट देऊन मान केला जातो.

देवचार हा भल्याला भला, पण रागाला एकदम वाईट, असा समज आहे. या समजातूनच देवचाराचा मान-पान चुकला अथवा त्याला उद्देशून कुणी शिवीगाळ केली, अपशब्द वापरला तर त्याला तो शिक्षा करतो अशी लोकमानसात धारणा आहे. दुपारी-मध्यरात्री एकटे बाहेर फिरण्यात देवचाराने निर्बंध घातलेले असतात, तसेच शिगम्याच्या दिवसांत अथवा अमावस्येच्या रात्रीही एकटे फिरण्यास त्याची मान्यता नसते. एखाद्या विशिष्ट जागी अथवा ठराविक पाणवठ्यावर जाण्यास बंदी असते. जर कुणी हे निर्बंध तोडले तर देवचार त्याला शिक्षा करतो, लपवून ठेवतो. सहसा देवचार कुणाला जिवंत मारण्याची शिक्षा देत नाही, परंतु एकाद्याचा गुन्हा भयंकरच असेल तर अपवादानेच तो तशी शिक्षा देतो (हा समज).

देवचाराला ‘वाठारो’ म्हणजे वाठाराचा (परिसराचा) राखणदार, असेही संबोधले जाते. तो मध्यरात्री आपल्या क्षेत्रात फिरून पहारा देतो, अशी लोकमानसात एकेकाळी दृढ भावना होती. जाणती-वयस्क माणसे अशा गोष्टी सांगताना गावोगावी सापडतात. माझी खुद्द पणजी लहानपणी आम्हाला अशा गोष्टी सांगायची. रात्री आम्ही मुलं जास्त जागत राहिलो तर ‘देवचाराची फेरी यायची वेळ झाली, आवाज नको, आता झोपा!’ असा दम द्यायची. देवचाराच्या गावात अमूक तमूक जागा आहेत, फेरीच्या वेळी तिथल्या झाडावर तो आपला सोटा मारतो आणि सगळे व्यवस्थित असल्याचा निर्वाळा देतो असेही ती सांगायची. कित्येदा ‘रात्री आपण देवचाराच्या सोट्याच्या घुंगरांचा आवाज ऐकला’, असेही ती सांगायची. देवचाराच्या फेरीच्या वाटा म्हणून अजूनही गावात काही जागे कुंपण-कंपाऊंड न घालता मोकळे ठेवलेले आहेत. या मागचे खरे कारण वेगळे असले तरी लोकमानसात मात्र देवचाराची वाट बंद केली, तर आपल्याला अपाय होईल, अशी भावना आहे.

संकटसमयी हाक मारली तर देवचार पावतो, तसेच एखाद्या वेळी रात्री

एकट्याने जाताना भीती वाटली तरी देवचार गावच्या ग्रामस्थांच्या रुपात येऊन सोबत करतो, असा समज आजही गोव्यातील गावात रूढ आहे. यासंबंधी आमचे वडीलसुद्धा आपला खास एक अनुभव सांगायचे. त्यांना म्हणे एके रात्री खूप गिऱ्हाईक असल्याने दुकान बंद करून केपेहून गावात यायला खूप उशिर झाला. त्या काळी निर्जन रस्ता, वीज नव्हती, सायकलीच्या डायनम्याच्या उजेडात एकटेच अडीच किलोमीटरचे अंतर कापता कापता त्यांना अकस्मात खूप भीती वाटली. तसे त्यांनी 'देवचारा पाव रे बाबा' म्हटले आणि काय सांगावे? जरा पुढे जाताच एक वयस्क, खांद्यावर घोंगडी घेतलेला माणूस त्यांना दिसला. तोच म्हणाला म्हणे, 'घाबरू नको मी आहे सोबतीला.' मग ते दोघेही चालत आमच्या घरापर्यंत पोहोचले. तेव्हा 'जा तू आता घरात, मी पुढे निघतो', असे तो म्हणाला. माझे वडील अंगणात पोहोचले आणि त्यांनी मागे वळून पाहिले. दूरवरपर्यंत रस्त्यावर त्यांच्या दृष्टिला एक चिटपाखरूही पडलं नाही. तसं त्यांना समजलं, देवचारानेच आपल्याला सोबत केली.

देवचारा संबंधित या प्रचलित कथा, मिथक असतील मात्र एक गोष्ट खरी, आदिम लोकमानसाने देवचारावर समाज रक्षणाची खूप मोठी जबाबदारी सोपवलेली होती.



# १२.
# नरबळी : एक आदिम यातुविधी

असंख्य संकटांना तोंड देत राना-वनात, डोंगर-कपारीत अतिशय कष्टाचे जीवन जगणाऱ्या आदिम मानवाच्या जीवनात यातुविद्येला अनन्यसाधारण महत्त्व होते. त्याच्या जीवन व्यवहाराचा तो जणू स्थायिभावच होता. या जगातील प्रत्येक गोष्टीत, प्रत्येक व्यवहारात एक अचाट आणि अनाकलनीय अशी यात्विक शक्ती वावरते, जी आपल्या जीवनावर सतत प्रभाव घालीत राहते, या शक्तीमुळे कधी आपले हित होते तर कधी अहित. या शक्तीला वश करून, आपण काबूत ठेवले तर आपली इच्छित फलप्राप्ती साधता येते. आपले जीवन संकटमुक्त करता येते या धारणेने त्याने काही तंत्रे रचली, जी 'जादूतंत्रे' अथवा 'यातुतंत्रे' म्हणून ओखळली गेली.

'सारख्यातून सारखे निर्माण होते' अथवा 'अपेक्षित गोष्टीची नक्कल केली तर इच्छित फल प्राप्त होते,' हे यातुतंत्राचे मुख्य सूत्र. या सुत्राला धरूनच आदिमकाली माणसाने कित्येक प्रथा-परंपरा जन्माला घातल्या, ज्या आजही आपल्या सुधारीत रूपात जगात प्रचलित असलेल्या दिसतात.

'बलिप्रथा' ही अशीच एक आदिमकाली जन्माला आलेली आणि आजही समाजात जिवंत असलेली प्रथा. 'नरबळी' हे बलिप्रथेचे मूळ स्वरूप. जगातील सगळ्या आदिम संस्कृतींत ही प्रथा अस्तित्वात होती. अनार्य संस्कृतीत जशा या प्रथेच्या खुणा सापडतात, तशाच आर्यांच्या वैदिक संस्कृतीतही ती प्रचलित होती, याचे संदर्भ मिळतात.

'बलिप्रथा' अथवा 'नरबळी'चे दोन प्रमुख उद्देश दिसतात. एक 'सुफलीकरण' आणि दुसरे 'समूहाचे रक्षण'. सुफलीकरण अथवा सृजन हे पृथ्वी

तसेच स्त्री दोघांचेही अपेक्षिलेले दिसते. समूहाचे रक्षण यामागे या चराचरात वावरणाऱ्या दुष्ट शक्तींपासून आपल्या माणसांचे रक्षण असेच अपेक्षिलेले दिसते.

नरबळी हा ठरावीक काळी आणि स्थळी देण्यात येत असे. सुरुवातीच्या काळात आपल्या टोळीच्या रक्षणार्थ टोळीप्रमुखच स्वतः बळी जात होता, अशी माहिती सापडते. आपल्या जीवनाच्या बदल्यात अख्ख्या टोळीचे जीवन सुखकर व्हावे ही कामना या प्रथेमागे होती. पुढे या प्रथेत थोडा बदल होऊन, टोळीतील इतर लोक अथवा अमुकच घटक बळी दिला जाऊ लागला. याही पुढे आपल्या टोळीच्या अथवा समूहाच्या भल्यासाठी इतर टोळीतील माणसाना पकडून बळी देण्यात येऊ लागले. 'जीवनाच्या बदल्यात जीवन' हे तत्व इथे स्वीकारलेले दिसते.

प्राथमिक अवस्थेत नरबळी अथवा बळी देताना त्या माणसाचे शीर कापून त्याचे रक्त अर्पण केले जात असे. रक्त म्हणजे लाल द्रव्य. स्त्रीच्या रजस्त्रावाचा आणि त्याचा रंग एकच. जसे काही त्याचे प्रतिरूपच. ते अर्पण करून भूमीच्या तसेच स्त्रीच्या सुफलीकरणाची आणि समृद्धीची कामना आदिम माणसाने केलेली दिसते.

नरबळी प्रथेत जेव्हा सुफलीकरणाचा उद्देश प्रमुख होता त्या वेळी फक्त पुरुषाचा बळी न देता, 'होंवर' (दाम्पत्य) बळी देण्याची प्रथा अस्तित्वात असल्याचे संदर्भ सापडतात. हे होंवर, म्हणजे स्त्री–पुरुष दोघेही निर्मिती करण्यास सुयोग्य असणे जरुरीचे होते. एका अर्थाने वहोंवर म्हणजे स्त्री–पुरुषांच्या मिथुन अवस्थेचे प्रतीक रूप आणि सुफलीकरणाच्या क्रियेत मैथुनाला अटळ महत्त्व म्हणूनच आदिम माणसाने होवर बळीची प्रथा रचली.

गोव्यात कित्येक गावांत 'होंवर' बळी दिल्याच्या अथवा गेल्याच्या आख्यायिका सापडतात. कधी यामागे दोन समूहांचे वितंड कारण असल्याचे सांगितले जाते, कधी नैसर्गिक आपत्ती, म्हणजे पूर अथवा एखाद्या हिंस्त्र श्वापदाचा हल्ला इत्यादि कारण असते तर कधी गावाच्या भल्यासाठी त्याना खास बळी दिलेला असल्याची कथा मिळते.

अशा होंवरांची ठरावीक दिवशी, ठरावीक उत्सव–विधीत आठवण करून त्याना मान–पान दिला जातो. काही गावांत सामूहिक अन्नसंतर्पण आयोजित करून 'होंवर' जेववले (वाढले) जाते. माझ्या आमोणे गावात यासंबंधी एक खास प्रथा दिसते. नव्या पंचमीच्या दिवशी (श्रावण वद्य पंचमी) गावचा



**'शिरां' ही नरबळीचे प्रमाण देणारी पाषाण शिल्पे. (पेडणे, १९९३)**

'गावकार' होंवर पुजतो. म्हणजे माडाची 'पोंय' काढून त्यात पिठाचे दोन मोठे गोळे करून ठेवतो. एका गोळ्याला लाल रंग दिला जातो. यातील पांढरा तो पुरुष आणि लाल ती स्त्री असे समजतात. या स्त्री-पुरुषाला म्हणजे होंवराला, फूल-कुंकू अर्पण करून त्यांना 'गाराणे-सांगणे' करून ती पोंय नदीच्या भरल्या पाण्यात (या दिवसांत कुशावती नदी दुथडी भरून वाहते) सोडली जाते.

कोणे एकेकाळी या पूर आलेल्या नदीत नवदांपत्याला घेऊन जाणारी होडी बुडून त्यांचा मृत्यू झाला. हा मृत्यू अपघाती झाल्याने मरणोपरांत त्यांनी गावच्यांना पिडापीड करू नये म्हणून त्यांचा अशा प्रकारे मानपान केला जातो, अशी माहिती गावची वडीलधारी मंडळी देतात. पण माझ्या मते यामागे वेगळेच सत्य असावे. कधी काळी गावच्या मूळ समूहात नवदांपत्य बळी देण्याची प्रथा असावी, पुढे त्याचे स्वरूप बदलून प्रतीकात्मक रुपे होवर बळी देण्यास सुरू झाले असावे. तसेच प्रत्यक्ष होवराचे शीर न वधता नदीच्या भरल्या पाण्यात त्याना होडीत बसवून सोडण्यात आले असावे. पुढे ते होंवर नदी पार करताना बुडाले आणि नंतर त्याला ही आख्यायिका जुळवली असावी. हा विधी नव्या पंचमीच्या दिवशी म्हणजे नवधान्य (लोंब्या) पुजण्याच्या (देवाला अर्पण करण्याच्या) दिवशी केला जातो ही गोष्ट इथे महत्त्वाची आहे. हा विधी केला नाही तर गावातील नवदांपत्य जीवन धोक्यात येते असा समज आहे, ही पण

गोष्ट विचार करण्याजोगी आहे.

गोव्यात पेडणे गावात रवळनाथाच्या देवळाजवळ 'शिरां' म्हणजे माणसाच्या पाषाणी शिराकृती मिळतात. या शिरांना गावच्या धार्मिक आचारांत महत्त्व आहे. ही शिरे एकोडी त्याचबरोबर स्त्री-पुरुष दांपत्यरूपीही आहेत. पेडणे गावात एकेकाळी नरबळी प्रथा अस्तित्वात होती याचे प्रमाण या शिरांकृती देताहेत.

पैंगीण - काणकोण येथील 'गड्यांच्या जत्रे'संबंधीही अशीच माहिती मिळते. एकेकाळी या जत्रेत गड्यांना मोठ्या खांब्यावर बांधलेल्या रहाटाला बांधून फिरवले जायचे आणि नंतर तो रहाट सोडून खाली असलेल्या विशाल कातळावर फेकला जायचा. मग रहाटाला बांधलेल्या गड्यांचा कातळावर आपटून जीव जायचा. आज या प्रथेत बदल केलेला असून रहाट फिरवल्यावर गड्यांना सोडवून त्या जागी कोंबडे बांधले जातात.

मानव आज विज्ञान युगात पोहोचला आहे. तरी अजूनही त्याच्या मनावरचा आदिम विचारसरणीचा प्रभाव शाबूत आहे. नरबळीची प्रथा आजही आपल्या सुधारीत रूपाने का होईना, समाजात जिवंत आहे. 'नर' ऐवजी जनावर (श्वापद), पक्षी आणि ठरावीक फळ कापण्याची प्रथा सुरू झालेली आहे. काही जागी तर पिठाचे (कणकेचे) गोळे मानवरुप म्हणून कापले जातात. श्वापदांमध्ये घोडा, गवा, बैल, रेडा, रानडुक्कर, बकरा, मेंढा, कासव इत्यादींचा बळी दिला जातो. पक्ष्यांमध्ये बगळा, मोर, कोंबडा दिला जातो. मासा आणि खेकडाही बळी देतात. फळांमध्ये भोपळा व कोहळा कापला जातो. प्रत्यक्ष शीर कापायच्या बदला या प्राणी - पक्ष्यांना फूल-कुंकू वाहून मोकळे सोडलेही जाते. मात्र त्याना परत स्वीकारले जात नाही.

नरबळी प्रथेचा एकंदर अभ्यास करता या प्रथेत सुरुवातीला 'नर'च म्हणजे पुरुषच बळी दिला जात असावा असे दिसते. स्त्रीला बळी दिल्याची माहिती नाही अथवा अपवादानेच सापडू शकते. (दांपत्य बळीमध्ये स्त्री असते हा वेगळा भाग आहे.) प्रजननातील स्त्रीचे महत्त्व जाणून, एका स्त्रीला बळी देणे म्हणजे कित्येक नवे जन्म मारणे हे उमगूनही आदिम माणसाने पुरुषालाच बळी दिला असावा आणि पुरुषबळीवरूनच या प्रथेला 'नरबळी' हे नावही पडले असावे.



# १३.
# शिगमा : भूमातेच्या सृजन जागृतीचा उत्सव

या जगातील गूढ शक्तींना आवाहन करणारा आणि कित्येक गूढ विधींचा समावेश असलेला गोव्यातील एक उत्सव म्हणजे शिगमा. फाल्गुन पौर्णिमा ते अमावास्येपर्यंत वातावरणातील गूढ शक्ती प्रभावित (सक्रिय) होतात, असा येथील लोकमानसात समज आहे. काही गावात तर शिवरात्रीपासूनच या शक्ती जागृत झालेल्या असतात, असे मानतात आणि रात्री-अपरात्री घरातून बाहेर पडण्यावर, दुपारच्या प्रहरी एकटे-दुकटे फिरण्यावर निर्बंध घातले जातात. सुधारणेच्या प्रभावा खाली असलेल्या गावात, या समजाची तीव्रता कमी झालेली असली तरी आजही 'शिगम्याचे दिवस हे, सांभाळून राहा!' अशी भाषा जाणत्या - बुजुर्गांच्या तोंडी ऐकू येते.

गडे-भार यासारख्या अचाट आणि अदृश्य शक्तींचे आवाहन प्रामुख्याने याच उत्सवात केले जाते. कोंबड्या-बकऱ्यांचा बळी देऊन वार्षिक 'जोगवणी' याच दिवसात केल्या जातात. कोंबड्या-बकऱ्यांच्या रक्ताने (अपवादानेच मानवी रक्ताने) कालवलेला 'चरु' (भात) शिंपडून गावच्या 'सीमा-सरहद्दी' याच उत्सवात बांधल्या जातात.

शिगम्याचा उत्सव हा गोव्याच्या भूमीतील प्रमुख उत्सव. कुळंबी, गावडी, नायक, गवळी यांसारख्या या भूमीतील आदिवासी जाती-जमातींमध्ये या उत्सवाचे प्रस्थ मोठे असले तरी संपूर्ण गोवा या उत्सवात सहभागी झालेला दिसतो. खेडोपाडी, आदिम वसाहतीच्या गावांत या उत्सवाचे खूप मोठे महत्त्व मानलेले दिसते. या दिवसांत आपला गाव सोडून दुसरीकडे जाण्यावर

बंदी असते. हा उत्सव मूळ अनार्यांचा. आर्य जमातींचा सहभाग या उत्सवात नंतर आला, याचे प्रमाण येथील कित्येक विधी-प्रथा देतात. गोव्यात आज शिगमा 'धाकटा शिगमा' आणि 'मोठा शिगमा' असा दोन भागांत विभागलेला दिसतो.



होळीरुप सृजनप्रतिकाच्या संपर्काने भूमातेची निर्मिती शक्ती जागृत केली जाते. (आमोणे-केपे, १९९०)

धाकटा शिगमा हा येथील आदिम जाती-जमातींचा. तो 'मांड' संस्कृतिशी संबंधित असतो. निसर्ग देवतांना या उत्सवात आवाहन केले जाते. यांत परंपरांना जास्त महत्त्व असते. सजावट-देखावा, सुबत्तेचे प्रदर्शन हे इथे नसते, याच्या उलट मोठा शिगमा. आर्थिक दृष्टीने संपन्न असलेल्या आर्य वंशी समाजाच्या हातात या शिगम्याचे पुढारीपण. यांत मोठा डामडौल असतो. लालखी-पालखी, रथ असतात. या उत्सवाला जत्रेचे रुप प्राप्त झालेले दिसते.

आदिमांच्या धाकट्या शिगम्याला 'धाकटा' म्हणून संबोधलेले असले तरी तो या भूमीतील खऱ्या अर्थाने 'मोठा शिगमा', मूळ शिगमा. लोकमानसावर शेकडो वर्षांपासून प्रभाव घालून असलेला शिगमा. या शिगम्याच्या संपन्नतेने येथील भूमी फुलते-फळते अशी दृढ धारणा लोकमानसात रुजलेली आहे. हा शिगमा झाल्यावरच 'मोठा शिगमा' करण्यास देव-देवतांची मान्यता असते, असाही समज.

शिगम्याला आज 'उत्सव' (शिगमोत्सव) असे म्हटले जात असले तरी ती मूळची 'परब' म्हणजे सण. ग्रामीण भागात आजही 'शिगमो परब' असाच उल्लेख केला जातो. या परबेत विधी-प्रथांना खूप महत्त्व. या परबेचे मूळ 'मागे परब' नावाच्या छोटा नागपूर येथील परबेत असल्याचे मत काही

संशोधकांनी मांडलेले आहे. या भूमीवर आदिमकाळी वसाहत केलेली 'कोल' जमात ही मूळची छोटा नागपूरची (म.प्र.). कोल जमातींमध्ये शिगम्याशी साम्य दाखवणाऱ्या प्रथा आहेत, ज्यातील एक म्हणजे येथील 'होळी'. ज्या तऱ्हेने गोव्यात होळीत वारुळावर (सातेरीला) विधियुक्त झाडाची डहाळी ठेवली (अर्पण) जाते (होळी), त्याच तऱ्हेने तेथेही वारुळावर विधियुक्त डहाळी ठेवतात, अशी माहिती मिळते. कोलाकडून शिगमो परब येथील भूमीत पोहचली असे मत आहे.

शिगम्याशी निगडित प्रथा-परंपरांचा अभ्यास केल्यास, शिगमा म्हणजे भूमातेच्या सुफलीकरणाचा विधी-उत्सव हे स्पष्ट होते. शिगम्याच्या उत्सवात अथवा परबेत तीन 'भोगावळी' (विधी) महत्त्वाच्या असतात. एक 'मेळ', दुसरी 'होळी' आणि तिसरी 'धुळवड'. मेळ नाचण्यास फाल्गुन शुद्ध नवमीपासून सुरवात होऊन पौर्णिमेला समाप्ती होते. काही गावांत पोर्णिमेलाच होळी असते, तर काहींकडे प्रतिपदेला. काहींकडे पौर्णिमेला होळी, म्हणजे झाड कापतात आणि प्रतिपदेचे नक्षत्र लागल्यावर अग्नी देतात. होळीनंतर धुळवड होते. काहीकडे होळीच्याच दिवसी 'धुळवड' असते तर काहींकडे दुसऱ्या दिवशी. खास करून आदिम वसाहतींच्या गावांत, जिथे 'गडे' येतात, तिथे 'गडे पडल्यावर' (अवतरल्यावर) ते धुळवड खेळतात. काही गावांत 'हळदुणे' म्हणजे हळदीच्या पाण्याने भरलेला कलश नाचवण्याची आणि एकमेकाच्या अंगावर हळदीपाणी उधळण्याची भोगावळ होते. गावा-गावाप्रमाणे आणि जाती-जमातीप्रमाणे विधींमध्ये थोडा फार फरक असला तरी मेळ-होळी-धुळवड असाच या भोगावळींचा क्रम असतो, ही गोष्ट मुद्दाम लक्षात घेण्याजोगी आहे.

'मेळ' म्हणजे पुरुषांची टोळी. ही टोळी एखाद्या दैवी कार्यास सज्ज असल्याच्या अविर्भावात वावरते. या मेळात बारा वर्षांवरील सगळ्याच पुरुषांनी (अंथरूणाला खिळलेले सोडून) सहभागी व्हायलाच हवे, गावात मेळ खेळताना, कोणत्याच पुरुषाने घरात राहू नये, असा नियम. परंपरेने हा मेळ नवमीला आपल्या मांडावर 'नमन' घालून इतर मांड खेळायला जातो. पौर्णिमेला तो आपल्या गावात परततो. आपला गाव खेळून, काही पारंपरिक विधी करून, नदी-पाणवठ्यावर विधियुक्त स्नान करून घरात प्रवेश करतो.

या विधिमध्ये मांडावर 'शेंसर मारणे' ही एक महत्त्वाची विधी असते.

मेळाला गेलेल्या पुरुषांना 'वीर' म्हणतात. ते डोक्यावर फुलाचे मुकूट घालतात. हातात-गळ्यात फुलांच्या माळा घालतात. ही फुले अबोलीची असावीत हा नियम. हे वीर 'हळदी अंगाचे', म्हणजे 'नवरे' असतात असा समज ग्रामीण भागात अजूनही प्रचलित असून, त्यांचे ते रुप घरच्या बाई माणसांनी आवर्जून निरखायला हवे' अशी धारणा आहे. मेळाला निघताना ते आशीर्वाद घेऊन जातात. तसेच मेळाहून परत आल्यावर घरची वडील अहेव स्त्री त्यांना 'आरत-बगूळ' दाखवून घरात घेते. ते एक मोठे कार्य संपन्न करून आल्याची त्यामागे भावना असते.

ढोल-ताशे वाजवत, आधी मांडावर आणि नंतर प्रत्येक गावकऱ्याच्या अंगणात जाऊन वर्तुळाकार उभे राहून मेळातील खेळे नाचतात. या वेळी जल्लोषात पारंपरिक गीते गायली जातात. प्रत्येक नाचाच्या शेवटी 'आरती' नाचवली जाते. खेळगड्यांच्या वर्तुळाच्या आत, एक गडी हातात प्रज्वलित दीप घेऊन नाचतो. मेळात खेळगडी आवेशाने नाचतात. त्यांच्या कंठातून बाहेर पडणाऱ्या गीतांच्या सुरात आणि वाद्यांच्या आवाजात सगळा आसमंत भरून जातो. एकदा मेळात सहभाग झालेल्या गड्याला मध्येच घरी परतता येत नाही. परंपरेने त्याला तशी मान्यता नसते.

'होळी' हे मुळापासून कापलेले झाड, अथवा झाडाची डहाळी असते. आंबा (आंबली) आणि पोफळी ही दोन झाडे प्रामुख्याने होळीसाठी कापतात. लोकधारणेप्रमाणे हे झाड 'आंकवार' (कुमारी) असावे लागते. आंकवार म्हणजे, जे झाड फुलायला आले आहे; परंतु ज्याला अजून फूल फुलले नाही असे. हे झाड विधियुक्त कापून, पारंपरिक पद्धतीने नाचवतात. ठराविक वेळ नाचवून झाल्यावर होळी पुरतात. म्हणजे जमिनीत खड्डा खणून ती त्यात उभी करतात. नंतर तिला विधियुक्त अग्नी दिला जातो. सर्वसामान्यपणे एका गावी अथवा वाड्यावर एकच होळी दिसली तरी प्रमुख होळी नाचवण्या बरोबरच डहाळ्यारुप लहान लहान होळ्या गावात देव-देवतांसमोर ठेवतात. कोलांच्या मागे परबेतील होळीचा वर उल्लेख झालेला आहेच, त्या कोल परंपरेशी साम्य सांगणारी प्रथा माझ्या आमोणे गावातही रूढ आहेत. आमच्या गावात पाच होळ्या. यातील एक मोठी, तर चार लहान डहाळ्या रुप. या होळीतील

प्रथम (लहान) होळी सातेरीला अर्पण करतात. ही सातेरी वारुळरुप नैसर्गिक स्थितीत आहे.

'धुळवड' या विधीत जमिनीवरची धूळ उधळतात. सर्वप्रथम ही धूळ देव- दैवतांवर उधळली जाते, नंतर खेळगडे अथवा गावची पुरुष मंडळी एकमेकांच्या अंगाला ती माखून जल्लोष करतात.

शिगम्याशी जुळलेल्या या प्रमुख प्रथा. या प्रथांशिवाय दिवज पेटवणे, हळदुणे नाचवणे, सृजनेंद्रियांचा उल्लेख करणे, सृजनक्रिया रुप शब्दांचे उच्चारण करणे, सृजनक्रिया रूप अंगविक्षेप करणे, वगैरे शिगम्या संबंधीत प्रथा आदिमांनी कल्पिलेले या परबेचे सृजनरुप स्पष्ट करतात.

स्त्री आणि भूमाता यांच्या सृजनक्रियेत साधर्म्य उमजून, मानवाने आदिमकाली, स्त्रीच्या जीवनातील निर्मिती पथावरील प्रत्येक अवस्था भूमातेसाठीही प्रतिकरूप निर्मिली. शेकडो वर्षे उलटून गेली तरी त्यांचे महत्त्व अजूनही लोकमानसात अबाधित आहे.

सृजनासाठी भूमातेच्या अंगी सृजनशक्ती तयार होणे जरुरी असते. पौष महिन्यात तिला वैधव्य प्राप्त होते म्हणजे तिच्या ऋतुचक्रातील हा वैराण महिना. (सून महिना). फाल्गुनात तिला सृजनासाठी उत्तेजित केले जाते. तिच्या सृजनेद्रिंयांना 'जागृत' होण्याचे आवाहन केले जाते. मेळामार्फत हे कार्य होते. धरतीवरचे पुरुष शृंगारस्वरुप नृत्ये करून, गीते गाऊन, अंगविक्षेप करून तिला उत्तेजीत करतात. यावेळी गायिली जाणारी गीते ही सुफलीकरणाचे जणू गूढमंत्रच असतात. होळीरुप सृजनप्रतिकांच्या संपर्काने तिची सृजनशक्ती चेतवली जाते. होळीत केले जाणारे शृंगाररूप अंगविक्षेप, उच्चारण वगैरे (सर्व सामान्यांच्या भाषेत अश्लील) याच धारणेचे द्योतक आहेत. काही गावांत तर दैवतांच्या सृजनेंद्रियाला हाका मारल्या जातात आणि त्यांनी हाकेला प्रतिसाद दिला हे प्रतीत करण्यासाठी 'कुऽऽय!' असे उद्गारले जाते.

होळीनंतरची धुळवड, जी आज रंगोत्सवाचे रुप घेऊन आहे. ती म्हणजे तिच्या सृजनेंद्रियाच्या जागृतीसाठी केले गेलेले प्रयत्न सुफल होऊन तिला ऋतुप्राप्ती झाल्याचा आदिमांनी कल्पिलेला आनंद सोहळा.



१४.

# फूल :
# भूमातेच्या अचाट शक्तीचे प्रतीक

फुलामध्ये यात्विक शक्ती असते. फूल म्हणजे भूमातेच्या अचाट शक्तीचे प्रतीक, अशी धारणा आदिम लोकमानसात होती. यातूनच यात्विक विधींनी फुले अर्पण करण्याची प्रथा उदयाला आली, जी हजारो वर्षांच्या कालप्रवाहात अजूनही टिकून आहे. विधींचे मूळचे यात्विक कार्यरुप बदलले, देवीचे उन्नयन झाले, तरी फुलांचे महत्त्व उणावलेले नाही, मात्र ते अधिकच द्विगुणित झालेले आहे.

आदिम मानवाने भूमातेची आराधना दोन स्वरुपात केली होती. एक सृजनाच्या उद्देशाने तर दुसरी दुष्ट शक्तीपासून समूहाच्या रक्षणासाठी. या दोन्हीही प्रकारच्या आराधनेत आदिम माणसाने फुलांचा वापर केलेला आहे. याचे प्रमाण आज प्रचलित असलेल्या कित्येक प्रथा-परंपरांतून आणि लोककथा-लोकगीतांतून मिळते.

फुलातून फळ जन्माला येते, झाड अथवा वेल फुलल्याशिवाय फळत नाही. जशी स्त्रीला रजप्राप्ती झाल्याशिवाय, तिच्यामध्ये गर्भ धारण करण्याची क्षमता येत नाही. याच सत्यातून आदिम माणसाने फुलाला पृथ्वीचे, म्हणजेच भूमातेचे 'रज' मानून यात्विक विधी कार्यात त्याचा उपयोग केला आणि त्याच्या संपर्कातून आपले सृजनकार्य सिद्ध केले. त्याचबरोबर अनिष्टापासून आपल्या समूहाचे रक्षण करण्याचा प्रयत्न केला. रजामध्ये जशी सृजनशक्ती असते तशीच दुष्टशक्तीला दूर करण्याची यात्विक शक्तीही असते, अशी त्याची धारणा होती.

स्त्रीला मातृदेवीची भूतलावरील प्रतिनिधी मानल्याने आणि तिच्या व मातृदेवीच्या सृजन प्रक्रियेत साधर्म्य असल्याने, ही फुले भूदेवीला अर्पण करण्याचा आणि ती अंगावर (डोक्यात वगैरे) धारण करण्याचा अधिकार मुख्यतः स्त्रीलाच मिळाला. फुले धारण करण्यामागे स्त्रीच्या अंगी ही अचाट शक्ती वावरते, हे सुद्धा प्रतीत करण्याचा उद्देश होता.

फुलांमध्ये लाल रंगाच्या फुलांना आदिम संस्कृतीत जास्त महत्त्व दिसते. आज ज्या आदिम संस्कृतीशी संबंधित प्रथा–विधी–उत्सव प्रचलित आहेत, त्या उत्सवात लाल रंगाच्या फुलांना आणि तेही रानटी अथवा प्रादेशिक फुलांना महत्त्व दिसते. या फुलांचा लाल रंग भूदेवीचा रजस्राव प्रतीत करणारा आहे.

'पिटकोळी' (पटकोळी), जास्वंदी आणि अबोली या तीन फुलांना आदिम यातूविधींनी जास्त महत्त्व दिलेले दिसते. या तिन्हीही फुलांत एक अदृश्य शक्ती समावलेली असून या फुलांच्या अर्पणाने इच्छित कार्य सफल होते, अशी धारणा लोकमानसात आहे. या तिन्हीही फुलांचा यात्विक उद्देशाने वापर प्रामुख्याने अवैदिक कार्यांनी झालेला दिसतो, ही गोष्ट मुद्दाम नमूद करण्यासारखी आहे.

पिटकोळी या फुलाविषयी आजही एक गूढ भीती खेडोपाडीच्या लोकांमध्ये दिसते. ही फुले कर्याव्यतिरिक्त घरात आणायची नसतात, असा समज आहे. ही फुले सातेरी, मरीअम्मा अथवा तत्सम देवीच धारण करू शकतात, सामान्य स्त्रीला ही फुले धारण करण्याची बंदी आहे. या फुलावरच देव–दैवतांना कौल लावला जातो. या कौलाचे फूल, म्हणजे 'कळी' मात्र घरात आणायची परवानगी असते. उगाच कुणी पिटकोळीचे फूल घरात आणता कामा नये, तसे केले तर त्यातील शक्तीचा अनादर होतो, असा समज लोकमानसात आहे.

कौल लावण्याव्यतिरिक्त गंभीर स्वरुपाचा विधी करण्यासाठी, खास करून दृष्टबाधा वगैरे निवारण करण्यासाठी हे फूल वापरलेले दिसते. अशा वेळी हे कार्य करणारा इतर साहित्याबरोबर हे फूल घेऊन घराच्या पागोळ्याबाहेरच हे कार्य करतो. एरवी पिटकोळीचे फूल चार पाकळ्यांचे असते, परंतु एखाद्याला जर पाच पाकल्यांचे फूल सापडले तर मात्र ते शुभ लक्षण मानून घरात आणतात आणि दैवी शक्तीची कृपा झाली असे मानतात.

लाल गावठी जास्वंदी हे सातेरीचे फूल मानतात आणि तिला अर्पण करतात. ज्या वेळी सातेरीला आवाहन करायचे असते, त्या वेळी इतर



**लाल रंगाचे फूल भूमातेला जास्त प्रिय असे मानतात.**

सामुग्रीबरोबर लाल जास्वंदी हमखास लागते. दृष्टबाधा काढण्यासाठी अथवा अनिष्ट निवारण्यासाठी लाल जास्वंदीचा वापर केला जातो. लाल जास्वंदी सामान्य स्त्रीने डोक्यात धारण करण्यावर बंदी असते.

लाल अबोली कित्येक शुभकार्यात वापरतात. सजावटीसाठी या फुलांचा वापर करतात, असा सर्वसामान्यपणे समज असला तरी या मागे आदिमांचा वेगळाच उद्देश दिसतो. लग्नात खासपणे, नवऱ्या-नवरीच्या बाशिंगाला अथवा मुंडावळ्यांना अबोल्याचे गोंड बांधतात. लग्न कोणत्याही ऋतूत होऊ दे, अबोल्याचे गोंड पाहिजेतच असा आजही लोकमानसात अलिखीत नियम आहे. अबोलीशिवाय लग्न पूर्ण होत नाही, असा समजच जणू लोकमानसात रुढ आहे. यामागे दोन उद्देश दिसतात. एक लग्नाचा विधी हा सृजनाचा विधी, दुसरा सगळ्या दुष्ट आणि अनिष्ट शक्तींपासून नवरा-नवरीचे रक्षण व्हावे हा.

शिगम्याच्या उत्सवातही अबोली फुलाला खूप महत्त्व. खेळगडे, ज्यांना नवरे असेही उल्लेखले जाते, ते अंगावर, डोक्यावर अबोल्यांचे 'झेले' (हार) धारण करतात, यामागेसुद्धा मूळ हे दोन्हीही उद्देश आहेत.

शिगम्याचे दिवस हे अबोल्यांच्या ऐन बहराचे, तसेच शिगम्यातील गीतांमध्ये, काही खास गीते अबोल्यांवर रचलेली आहेत हे इथे खास नमूद

करायला हवे.

लाल फुलांमध्ये, खास करून अबोली फुलांमध्ये एक यात्विक शक्ती आहे अशी समजूत असल्याने काही विशिष्ट 'धामी'च्या (साथीच्या) आजारात रोग्याच्या अंगावर अबोली पाण्याचा शिडकाव केला जातो.

देवी, गोवर, कांजिण्या, सर्पीणी अशा तऱ्हेचे साथीचे रोग झाल्यास, रोग्याला सात दिवसांची आंघोळ घालून सात अबोलींचा गोंड बनवून, तो पाण्यात बुडवून त्याच्या अंगावर सात वेळा पाण्याचा शिडकाव केला जातो. हे रोग दुष्ट शक्तींच्या प्रभावाने होतात आणि अबोल्यांच्या पाण्याच्या शिडकावाने त्या शक्ती परत त्याला बाधा करू शकत नाहीत, असा या मागचा समज आहे.

गोव्यात ग्रामीण भागात ही प्रथा अजूनही रुढ दिसते. लहानपणी मी स्वतः अशा शिडकाव्याचा अनुभव घेतलेला आहे. इतिहासकालात गोव्याहून केरळमध्ये स्थलांतर झालेल्या कोकणी समाजातही ही प्रथा प्रचलित आहे.

साथीचा रोग निवारण झाल्यानंतर कृतज्ञता म्हणून सातेरी, मरीअअम्मा अथवा ग्रामीण स्त्रीदेवींना जास्वंदीच्या, पिटकोळीच्या अथवा अबोलीच्या फुलांच्या माळा अर्पण करण्याची प्रथा आहे. कधी कधी त्यांना सात फुलांच्या माळा वाहण्याचे साकडे घातले जाते, ज्यात वरील तिन्ही फुले आवर्जून लागतात.



१५.

# फूल आणि स्त्रीचे अलौकिक नाते

आदिम मानवाने फुलाचा मानवी स्त्रीशी दृढ संबंध जोडलेला दिसतो. फूल हे भूमातेच्या सृजन शक्तीचे प्रतीक रुप. अशी सृजनशक्ती स्त्रीच्याही अंगी असते. भूमातेच्या अंगावर जशी फुले येतात, तसाच स्त्रीलाही ऋतुस्राव प्राप्त होतो. यातुनच पुढे त्यांच्यामध्ये फळण्याची क्षमता निर्माण हाते. या अवलोकनातून आदिम मानवाने भूमातेला स्त्रीरुपात आणि स्त्रीला भूमाता रुपात बघितले.

भूमातेची सृजनशक्ती मानवी स्त्रीच्याही अंगी वास करते. अशी आदिम मानवामध्ये धारणा होती. या संबंधी किती तरी लोकगीते, लोककथा आणि लोकपरंपरा मला लोकसंस्कृतीच्या शोधयात्रेत सापडल्या. काही मूर्ती-शिल्पेही सापडली. काही पुस्तक-ग्रंथामधे संदर्भ सापडले. साऱ्यांचा उल्लेख इथे करणे शक्य नाही, तरी काही महत्त्वपूर्ण उदाहरणे मी संदर्भादाखल देते :

मी आजपर्यंत संग्रहित केलेल्या कोंकणी लोककथा भांडारात मला तीन महत्त्वपूर्ण गीतकथा सापडल्या. (त्या गद्य स्वरूपातही सापडतात) एक 'नवरंगी फुलं', दुसरी 'शेणातील कुंवर', तिसरी 'चित्रंगी फूल'. या तिन्ही कथांतील नायिका या असामान्य शक्तीच्या 'कन्या' असून त्यांच्या अंगाला दिव्य, अद्भुत अशी नवरंगी फुले फुलतात. 'ही फुले कधी कोणी पाहिली नाहीत, कधी कोणी बघितली नाहीत, ज्यांच्या रंगगंधाचे वर्णन करायला शब्द अपुरे पडतात, कितीही तोडली तरी संपत नाहीत', असे या फुलांचे वर्णन मिळते. या फुलांमुळेच या कन्या असामान्य शक्तीच्या ठरतात.

'नवरंगी फुल' आणि चित्रंगी फुल' या दोन्हीही कथांच्या कथानकात बरेचसे साम्य आहे. दोन्हीही कथांनी 'म्हातारे पोर' जो या कथांचा नायक

असतो, तो राजाची मर्जी संपादन करण्यासाठी नवरंगी किंवा चित्रंगी फुलाच्या शोधात जातो. गुरूच्या (ऋषी) आधाराने तो स्वर्गलोकातील रंभा असलेल्या सातव्या कन्येला, जिच्या अंगी नवरंगी फुले फुलण्याची शक्ती असते, तिला क्लृप्त्या लढवून प्राप्त करतो. या कन्येला स्वर्गलोकात जायला उशीर झाल्यामुळे तिच्या गडाच्या तटाचे दरवाजे बंद होतात आणि नाइलाजाने तिला म्हातारे पोराचे पतित्व स्वीकारावे लागते. ती नंतर स्वबळावर, अंगावर नवरंगी (चित्रंगी) फुले निर्माण करून घेते आणि त्याला विजयी बनवते.

'शेणांतलो कुंवर' ही कथा वरील दोन्हीही कथांपेक्षा जास्तच अद्भुततेने भरलेली आहे. या कथेतील कन्या ही स्वर्गलोकात देवाच्या दरबारातील नृत्यांगना असते, जी साडेतीनशे दासींचा ताफा असलेल्या आपल्या स्त्रीराज्याची धनीण असते. तिच्या राज्यात पुरुष प्रवेशाला बंदी असते. तिथे राहणाऱ्या सगळ्या स्त्रिया या कुमारी कन्या असून त्यांना पुरुष स्पर्श निषिद्ध असतो. नृत्यांगना असलेल्या 'म्हाल' (मुख्य) कन्येच्या अंगी असामान्य शक्ती असते. ती लावण्यवती असून मध्यरात्री तिच्या सर्व अंगाला नवरंगी फुले फुलत असतात. तिच्या मस्तकी 'म्हाल फूल' फुलत असते. तिच्या मस्तकीच्या या म्हाल फुलाला जर कोणी पुरुषाने स्पर्श केला तर तिचे पावित्र्य भंग होते. 'म्हातारे पोर' स्त्रीचे रूप घेऊन तिच्या महालात प्रवेश करतो आणि मळा – मैदानावर भेटलेल्या म्हातारीची नात म्हणून खोटे सांगून त्या कन्येची दासी म्हणून राहतो. तिच्या अंगाला मालीश करतो आणि एका मध्यरात्री कन्येच्या मस्तकावर फुललेले 'म्हाल नवरंगी फूल' तोडून कन्येचे पावित्र्य भंग करून तिला आपले पतित्व स्वीकारण्यास भाग पाडतो.

तिन्हीही कथांतील कथानकांमध्ये आणखी पुढे विस्तार येतो, जो विषयाच्या दृष्टीने येथे महत्त्वाचा नाही. येथे महत्त्वाची आहे ती कन्येच्या अंगी फुले फुलण्याची घटना. लोकमानसाने या कथांतून हा कल्पनाबंध रचून कन्येची सृजनशक्ती प्रतिकात्मक रीतिने वर्णन केलेली आहे.

फुलासंबंधीची ही धारणा वैश्विक. ती फक्त कोकण प्रदेशातच नाही, तर इतर प्रदेशांतही आहे, याचे पुरावे देणाऱ्या कथा आणि संदर्भ या विषयाच्या अनुषंगाने अभ्यास केल्यास सापडू शकतात. यासंबंधी एक महत्त्वपूर्ण कथा मला ए. के. रामानुजन यांच्या 'फोल्क टेल्स फ्रॉम इंडिया' या संग्रहात सापडली. ही कन्नड प्रदेशातली लोककथा. तिचे मूळचे नाव (माझ्या शोधाप्रमाणे) 'हुवूमरा'. या संग्रहात तिला 'द फ्लावरिंग ट्री' हा इंग्रजी अनुवादीत मथळा दिलेला

आहे. खूप वर्षापूर्वी गिरीश कर्नाड यांनी निर्मिती केलेली 'द फ्लावरिंग ट्री' ही टेलिफिल्म मी टीव्हीवर बघितली होती आणि त्यातील 'चेलुवी' या मुलीच्या अंगावर फुले फुलण्याच्या कल्पनाबंधाने मला विचारचकीत केले होते. पुढे लोककथांच्या अभ्यासाच्या कार्यात मला कोकणी समाजात असे कल्पनाबंध असलेल्या काही कथा सापडल्या आणि त्या अनुषंगाने माझा अभ्यास सुरू झाला. हुवूमरा ही कथा मला ए. के. रामानुजन यांच्या संग्रहात तर सापडलीच शिवाय बंगळुरवासी ज्येष्ठ कोंकणी लेखक एस. एम. कृष्णराव यांनीही ती कथन केली.



**फूल हे स्त्रीच्या निर्मिती शक्तीचे प्रतीक.**
**(कुणबी समाजातील एक वधू, मंगळूर, २००३)**

या कथेचे कथानक वर उल्लेखलेल्या कोकणी कथांपेक्षा थोडेसे वेगळे, परंतु याही कथेत कन्येच्या अंगाला, ज्याचे मूल्य कोणी ठरवू शकत नाही आणि जी कितीही तोडली तरी संपत नाहीत, अशी असामान्य सुंदर फुले फुलतात. या कथेतील राजपुत्र तिला फसवून तिच्याशी लग्न करीत नाही हे खरे परंतु या फुलांमुळेच तिला अडचणीत पकडून तो तिला आपली बायको बनण्यास भाग पाडतो. पुढे तिच्या या शक्तीमुळेच तिच्या जीवनात संकटे येतात. अखेर लोककथेच्या वैशिष्ट्य गुणाला वरून दुष्टांचा नाश होऊन ती या संकटातून मुक्त होते आणि राजपुत्राबरोबर सुखाने संसार करते.

सांस्कृतिक मानववंशशास्त्राच्या अभ्यासाच्या दृष्टीतून कोकणी लोककथा कन्नड लोककथेपेक्षा जास्त महत्त्वाच्या आहेत. त्यांच्या कथनामागे मनोरंजनाचा उद्देश दुय्यम असून धर्मविधीच्या रूपाने त्या प्रामुख्याने शेतीप्रधान आदिम समाजात सादर केल्या जातात. 'नवरंगी फुल', 'चित्रंगी फुल', 'शेणांतील कुंवर' आणि 'हुवूमरा' या चारही लोककथांमध्ये साम्य असलेला कल्पनाबंध (Motif) म्हणजे या चारही कथांनी ज्या स्त्रीच्या अंगी फूल फुलते ती कन्यारूप म्हणजे कौमार्यी (कुमारी) कन्या असते. नुकतीच वयात आलेली, पुरुषस्पर्श

न झालेली, सृजनाची क्षमता प्राप्त झालेली, परंतु कौमार्यी असलेली स्त्री, संतती निर्माण केलेल्या स्त्रीपेक्षा ही जास्त अचाट आणि असामान्य शक्तीची असते, असे वरील कथांतून प्रतीत केलेले आहे. याचे कारणही या कथा देतात. संतती प्राप्तीसाठी स्त्रीला पुरुषसंग करणे आवश्यक असते आणि ज्या क्षणी स्त्री पुरुषसंग करते त्या क्षणी तिच्या स्वयंसिद्धतेला तडा जाऊन तिचे रूपांतर सामान्य स्त्रीमध्ये होते.

स्त्रीच्या अंगी निर्मिती क्षमता येते म्हणजे तिच्या अंगावर फुले फुलतात अशा विचार धारणेबरोबरच स्त्री म्हणजे एक फूलच, निर्मिती हेच तिच्या जीवनाचे उद्दिष्ट, अशी धारणाही लोकसमाजात प्रचलित होती. याचे प्रमाण देणाऱ्या दोन कथा म्हणजे एक 'बेलावंत कन्या' आणि दुसरी 'राया तळें'. या कथांनी कन्येचा फसवून घात केला जातो. तेव्हा तिचे रूपांतर 'साळकांत' (कमळांत) होते. तिचा नंतर उद्धार तिच्या नवऱ्याच्या हातून होतो. 'गावड्याची सातवी सून' या कथेच्या एका स्वरूपातही मला असाच कल्पनाबंध सापडलेला आहे.

स्त्री आणि फूल, खास करून कमलपुष्प याच्याशी कोंकणी लोकसमाजाने जोडलेली सांस्कृतिक वीण मूर्तिकलेतही अधोरेखित झालेली आहे. गोव्यात कित्येक ठिकाणी पुरातन सातेरी मंदिरांत सातेरी देवीची मूर्ति हातात कमलपुष्प ल्यालेली सापडते. लक्ष्मीदेवीची मूर्ति (धान्यलक्ष्मी) एकतर कमळात बसलेली अथवा कमलपुष्प ल्यालेली दिसते. महाराष्ट्र, ओडिसा, मध्य प्रदेश या राज्यांत लज्जागौरीच्या 'कमलशीर्षा' मूर्ति सापडलेल्या आहेत.

फूल आणि स्त्रीसंबंधीच्या या धारणा आणि लोककथा – लोकगीतांतील वरील कल्पनाबंध, आदिम मानवाला स्त्रीच्या निर्मिती प्रक्रियेसंबंधी पडलेल्या गुढातून निर्माण झालेले आहेत. विशिष्ट फुलाचा संबंध स्त्रीशी जोडताना त्याने त्या फुलाचे गुणधर्म आणि स्त्रिच्या वेग-वेगळ्या जीवन अवस्थेतली वैशिष्टे, यांची सागड घातलेली आहे. उदा. नवरंगी फूल हे नव्यानेच यौवनात पदार्पण केलेल्या स्त्रीशी संबंधित केलेले आहे, तर कमळ हे सौभ्याग्य संपन्न, सचरित, प्रजावती स्त्रीशी जोडलेले आहे. नवरंगी फूल कोणाही वाटसरूला (परपुरुषाला) आकर्षित करते, तर कमळ हे फक्त स्त्रीचा पती अथवा भावांचेच लक्ष ओढून घेते.



# १६.
# नग्नता : आदिमांचे एक यातुकर्म

नग्नता किंवा विवस्त्रावस्था ही मानवाची मूळ जीवन अवस्था. गुप्तांगाभोवती संरक्षण म्हणून गुंडाळलेली झाडांची पाने, डहाळ्या, साली यातून सुरुवात होऊन जनावरांचे कातडे, नंतर जाडेभरडे सुती पूर्ण वस्त्र आणि पुढे आजचे शिवलेले तऱ्हेकवार कापडाच्या प्रकाराचे, फॅशनचे कपडे... अशा अंग प्रावरणाच्या कित्येक अवस्था पार केलेल्या मानवाने त्याच्या या प्रावरण प्रगतीपथावर नग्नतेला यात्विक महत्त्व दिलेले दिसते. सुरवातीची त्याची नग्न अवस्था ही त्याची सहज, नैसर्गिक अवस्था होती, परंतु या अवस्थेतून आजच्या सभ्यतेच्या अवस्थेत वाटचाल करताना मार्गपथावर त्याने नग्नतेचा वापर एक, यातुकर्म म्हणून केलेला दिसतो.

एखाद्या व्यक्तीने नग्न होऊन केलेले यातुकर्म जास्त फलयुक्त होते. ज्या अदृश्य शक्तीच्या कृपादृष्टीची कामना केली जाते ती शक्ती नग्न होऊन केलेल्या कर्मांकडे जास्त लवकर आकर्षित होते, वश होते, असा समज आदिम काळी होता. तांत्रिक कर्मकांडांत नग्नतेला खूप मोठे महत्त्व दिलेले दिसते. एकविसाव्या शतकात आजही कुठे कुठे तांत्रिक सिद्धांनी नग्न अथवा अर्धनग्न होऊन केलेल्या कर्मकांडांच्या बातम्या ऐकू येतात. भारतातील सुप्रसिद्ध कुंभमेळे हे या संबंधीचे एक महत्त्वपूर्ण उदाहरण आहे.

आदिम मानवाने सुफलीकरण विधीत नग्नतेला खूप महत्त्व दिलेले दिसते जगभरात जिथे जिथे आदिम काळी शेतीसंस्कृती उदयाला आल्या तिथे तिथे शेतीसंबंधी केलेल्या विधी आरंभाच्या काळी प्रामुख्याने स्त्रीने आणि त्याही

नग्न होऊन केलेल्याची माहिती मिळते. फ्रेझर या विद्वानाने या संबंधी कित्येक उदाहरणे दिलेली आहेत. काहींकडे रोपणी नंतर वस्तीवरील स्त्रिया नग्न होऊन शेतात जातात आणि तिथे रात्रभर नृत्य करतात, ज्यामुळे विपुल पीक येते, तर काहींकडे नांगरणीच्या वेळी नग्न होऊन स्त्रिया नाचतात, ज्यामुळे भरपूर पाऊस पडून पुढे शेतात भरपूर पीक येते.

स्त्रियांनी करण्याच्या विधीमध्ये काही वेळा पुरुषांनाही सहभाग दिलेला असतो. यासंबंधी एक महत्त्वाचे उदाहरण त्यांनी दिलेले आहे. मध्य आफ्रिकेमध्ये बंगाडा जमातीचे लोक शेताच्या सुफलीकरणासाठी एक यावात्मक विधी करतात. या विधीत गावातील बहुप्रसवा स्त्री शेतात अथवा बागेत (फळबाग) नग्नावस्थेत आपल्या मांड्यामध्ये, जननेंद्रियांवर केळीचे फूल धरून उताणी पडते. तिचा पती आपल्या जननेंद्रियाने ते फूल बाजूला पाडतो. अशा प्रकारे ते जोडपे आपल्या मित्रपरिवाराच्या शेतात जाऊन हे यातुकर्म करीत फिरते. या यातुकर्मामुळे शेतात, खास करून केळ्यांचे विपूल पीक येते, अशी या समाजातील लोकांची धारणा आहे. (लोकायत, पृ. ८७)

फ्रेझरच्या मताप्रमाणे शेतीच्या सुफलीकरणासाठी स्त्रीला दिलेली भूमिका म्हणजे आदिम मानवाने केलेला संपर्क यातूचा (कंटेजियस मॅजिक) प्रयोग. स्त्रीमध्ये सुफलीकरणाची अद्‌भूत शक्ती असते. ती मानवाला जन्म देते, नवनिर्मिती करते. तिच्या या यातुशक्तीचा उपयोग त्याने भूमीच्या सुफलीकरणासाठी केला. स्त्रीला गर्भधारणेसाठी विवस्त्र होणे गरजेचे असते. म्हणूनच तिने या अवस्थेत केलेले भूमातेच्या सुफलीकरणाचे यातूकर्म जास्त प्रभावी असते, अशी लोकमानसात प्रचलित असलेली धारणाच या कर्मांतून व्यक्त होते.

सुफलीकरणासंबंधीची ही धारणा भारतातही एकेकाळी प्रचलित होती. आज मूळ रुपात नसली तरी अवशेष रुपात ही प्रथा कुठे कुठे दिसते. पाऊस पडला नाही तर रात्रीच्या वेळी स्त्रियांनी नग्न होऊन ओरडत गावात फिरण्याची आणि त्यांच्यावर घरातल्या पुरुषांनी पाणी ओतण्याची प्रथा हल्लीपर्यंत महाराष्ट्रातील मराठवाड्यामध्ये होती, अशी माहिती मिळते. पाऊस पडण्यासाठी नग्न होऊन अंगाला निंबाची पाने गुंडाळून १८७४ वर्षी आलेल्या दुष्काळात गोरखपूर जिल्ह्यातल्या स्त्रियांनी सामुदायिकरित्या मिरवणूक काढल्याची नोंद



**आदिम मानवाने सुफलीकरण विधीत नग्नतेला महत्त्व दिले.**

सापडते. (लोकायत, पृ. ८८) जे प्रकरण खूपच गाजले ही होते.

आदिम मानवाने यातुकर्म म्हणून नग्नतेचा वापर भूमातेच्या सुफलीकरणासाठी जसा केला तसाच तो स्त्रीच्या गर्भधारणेसाठीही केला. मुळात त्याची सुरवात स्त्रीच्या गर्भधारणेसाठीच होती, असे एकंदर अवलोकनातून दिसते. कारण आपल्या जीवनाच्या प्रारंभ काळी स्त्रीच्या गर्भधारणेचे त्याला कोडे पडले होते आणि या पृथ्वीतलावर वावरणारी, खास करून नदी-तळी अशा पाण्याच्या जागी, निर्जनस्थळी वावरणारी एक अदृश्य शक्तीच तिच्या योनीमार्गे शरीरात प्रवेश करते आणि तिच्या उदरात गर्भाची रचना करते, अशी त्याची धारणा होती, याला अनुसरून त्यांनी स्त्रीचा वांझोटेपणा दूर करण्याचे यातूकर्म म्हणून काही प्रथा-परंपरांची निर्मिती केली. त्यातील एक म्हणजे वांझोट्या स्त्रीला उघड्यावर नग्न करून तिच्या डोक्यावरून पाणी ओतणे, निर्जन जागी जाऊन तिने पावसात नहाणे अथवा एखाद्या विशिष्ट तळीत तिने स्नान करणे वगैरे.

यातील वांझोट्या स्त्रीने तळीत स्नान करण्याची प्रथा अजूनही रुढ आहे. महाराष्ट्र तसेच दक्षिणेतल्या राज्यांत ती आहेच, त्याचबरोबर गोव्यातही ती आहे. फरक एवढाच की आता पूर्ण नग्न होऊन कुणी स्नान करीत नाहीत. एकट्या स्त्रीने असे स्नान करण्याबरोबरच जोडप्याने स्नान करण्याचीही प्रथा आहे. पारोडे येथील चंद्रनाथ पर्वतावर असलेल्या सिद्धाच्या तळीत चैत्रपौर्णिमेच्या (जत्रेच्या) दिवशी मूल नसलेल्या जोडप्याने स्नान केले तर त्यांना येत्या

वर्षीपर्यंत मूल होते, असा समज अजूनही लोकमानसात रुढ आहे.

एखादी परंपरा उदयाला येऊन शेकडो वर्षांचा काळ गेला म्हणजे त्याचे मूळ रुप बदलते, त्या वेगळ्या स्वरुपात दिसतात. मात्र त्यातला गाभा तोच राहतो याची दोन महत्त्वाची उदाहरणे किंवा प्रथा मला माझ्या शोधकार्यादरम्यान सापडल्या. एक – एखाद्या बाईला बरीच वर्षे मूल झाले नाही तर तिने अथवा तिच्या नात्यातील स्त्रीने गणपतीपुढे 'नागडी फुगडी' घालण्याचा केलेला नवस, तर दुसरी – एखाद्या झाडाला बरीच वर्षे फळ लागले नाही, तर घरातील पुरुष मुलाने नग्न होऊन त्या झाडाचे खोड ग्रहणाच्या दिवशी दंडुक्याने धोपटणे.

यातील पहिल्या उदाहरणात, नवस पूर्तीसाठी घातलेली 'नागडी फुगडी' ही बंद दाराच्या आत घालतात. येथे निसर्ग सान्निध्य येत नसले तरी 'नग्नता' हा घटक आहे, शिवाय गणपती ही सृजन देवता. तिच्या पुढे माटोळीच्या रुपाने प्रत्यक्ष निसर्गच उभा असतो.

दुसऱ्या उदाहरणात मानवी स्त्रीची नसली तरी झाडाची गर्भधारणा (सुफलीकरण) अपेक्षित असते. येथे झाड हे स्त्रीप्रतिक आणि दंडुका हे पुरुष इंद्रिय प्रतीक आहे. या उदाहरणात नग्नतेबरोबरच प्रतिकात्मकरित्या पुरुष प्रतिकाचा झाडाकडे संपर्क आणलेला दिसतो.

कालप्रवाहात नग्नतेचा यातूकर्म म्हणून वापर संततीप्राप्ती आणि धान्य समृद्धीबरोबरच इतर इच्छापूर्तीसाठीही लोकमानसाने केला.

हल्लीच एक जुनी बातमी वाचनात आली. २०१२ साली तुमकूर जिल्ह्यांत (कर्नाटक) गोनी मरम्मा देवीच्या देवळात सामूहिकरित्या स्त्रियांनी कमरेला कडुनिंबाची पाने बांधून नग्न नृत्य-विधी केला. हा विधी करण्यावर शासकीय बंदी होती, परंतु त्या स्त्रियांनी तो गुप्तपणे केला. यातील भाग घेणाऱ्या स्त्रियांनी वेगवेगळ्या इच्छापूर्तीसाठी देवीला साकडे घातले होते म्हणे. यात इतर उद्देशांबरोबरच वरील दोन्हीही उद्‌देश समाविष्ट होते.



१७.

# भूमीचे सुफलीकरण आणि स्त्री

आज समाजात प्रचलित असलेल्या विधी-व्रतांचा अभ्यास केल्यास त्यातील बहुसंख्य विधी-व्रते भूमीच्या सुफलीकरणाशी संबंधित सापडतात. या व्रत-विधिंचे वैशिष्ट्य म्हणजे एकतर यातील बहुसंख्य स्त्रियांनीच केलेली अथवा पाळलेले दिसतात, नाही तर त्यांच्या पूर्ततेसाठी स्त्रियांची भूमिका प्रमुख दिसते.

स्त्री आणि भूमी यांच्या निर्मिती प्रक्रियेत साधर्म्य जाणवलेल्या आदिम मानवाने आपल्या जीवन स्थिरतेच्या आरंभीच्या काली भूमीच्या सुफलीकरणासाठी कित्येक यातुकर्मे केली, जी आज व्रत-विधी बनून समाजात प्रचलित आहेत. या साऱ्या व्रत-विधींच्या माध्यमातून त्याने स्त्रीच्या निर्मिती शक्तीचा यावात्मक वापर करून घेतला. स्त्रीच्या, खास करून जुळ्या-तिळ्यांना जन्म देणाऱ्या अथवा बहुप्रसवा स्त्रीच्या हातातून भूमीसंबंधी अथवा शेतीसंबंधी कर्मे केली तर पीक-पाण्याची वृद्धी होते. झाडा-झुडपांना भरपूर फळ-फळावळ लागते असा त्या काळी मानवाचा दृढ समज होता. त्यासाठीच त्याने अशा स्त्रीचा वापर अथवा सहभाग सुफलीकरण विधींनी करून घेतला.

जगभराच्या प्राचीन संस्कृतींत अशा तऱ्हेच्या प्रथा असल्याचे संदर्भ सापडतात. शेतीसंबंधी आचारात बहुप्रसवा स्त्रियांची जशी प्रमुख भूमिका होती, तसेच लग्न-कार्यातही त्यांना प्रथम स्थान होते. झाडाचे पहिले फळ, पहिले फूल अथवा प्रथम पिकाचे दाणे अशा स्त्रीला दिले तर विपूल पीक येते, अशी धारणा सर्वच आदिम जाती-जमातींत होती. आजही सुफलीकरणासंबंधी

जे विधी अथवा व्रते केलेली दिसतात ती ‘अहेव’ स्त्रीनेच केलेली दिसतात. इथे अहेव स्त्री म्हणजे जिचा नवरा जिवंत आहे, अशी सवाष्ण स्त्री असा जरी वर वर अर्थ प्रचलित असला, तरी माझ्या मते अहेव म्हणजे जी आई होऊ शकते, जिच्या अंगी निर्मितीचे सामर्थ्य आहे, अशी स्त्री. कोकणीत अहेव शब्दाला ‘आयाव’ ही संज्ञा प्रचलित आहे. ‘आयाव’ म्हणजे जी आई आहे ती, असाच अर्थ मी स्वीकारते.

‘शेती’ हा मानवाच्या संस्कृती स्थापनेचा पहिला टप्पा. या टप्प्यात भूमीच्या सुफलीकरणाला अत्यंत महत्त्व होते आणि या महत्त्वातून या काळी अहेव स्त्रीला समाजात अत्यंत मान आणि वांझ स्त्रीच्या वाट्याला पराकोटीची अवहेलना होती. समाजात–कुटुंबात तिचे अस्तित्त्व असून नसल्यासारखे होते. वांझ स्त्रीला मेल्यावरही मुक्ती मिळत नाही, तिला कुत्री, मांजर, उंदीर, पाल... अशा तऱ्हेने चौऱ्यांऐशी योनीत जन्म घेऊन त्या त्या योनीतील कष्ट–नरकयातना भोगाव्या लागतात, त्यानंतर ब्रह्मदेव तिला परत मानव योनीत जन्माला घालतो, अशी धारणा लोकमानसात आहे. यासंबंधीची लोकगीतेही प्रचलित आहेत.

शेतीसंबंधित विधींत स्त्रीला असलेल्या प्राधान्यामागे स्त्रीच्या अंगातील निर्मिती शक्तीचा आदिमांनी केलेला यावात्मक उपयोग हे जसे कारण आहे, त्याचबरोबर मुळात शेतीचा उदयच स्त्रीच्या हातून झाला, हेही एक कारण आहे.

आज सर्वसामान्यपणे ज्यावेळी आपण शेती (पारंपरिक) म्हणतो त्या वेळी पुरुषाचे अधिकार अथवा मक्तेदारी असलेले क्षेत्र अशी धारणा असते. ‘शेतकार’ (शेतकरी) म्हणजे ‘शेताचा धनी’ या अर्थाने रुढ असलेला शब्दच याची ग्वाही देतो. ‘शेतकान्न’ (शेतकरीण) हा कधीतरी चुकून शब्द कानावर पडतो, तोही ‘शेतकाराची बायको’ या अर्थाने.

खरे तर मुळात शेतीचा शोध स्त्रीनेच लावला. बर्नेल, गाईल्स, बिफॉ यासारख्या मानववंशशास्त्रज्ञानी विपूल पुराव्यांच्या आधारे, शेतीचा शोध स्त्रीनेच लावला असा सिद्धांत मांडला (लोकायतः पृ. ७२) आहे. प्राथमिक अवस्थेत ज्यावेळी टोळीतील पुरुष शिकार करण्यासाठी हिंडायचे त्या वेळी स्त्रीने मुलांना जन्म देण्यासाठी, त्यांचा सांभाळ करण्यासाठी काही काळ एका जागी स्थिर राहण्यास सुरवात केली. यातून मुलांना सांभाळतानाच नैसर्गिकरित्या उगवणाऱ्या धान्यावरच अवलंबून न राहता, स्वप्रयत्नांनी अधिक धान्य



**शेतीचा शोध स्त्रीनेच लावला.**

उगवण्याची कल्पना स्त्रीच्या मनात रुजली अन् इथेच शेतीचा उगम झाला. सुरवातीच्या काळी ही शेती स्त्रीने स्वतः खणून केली. त्यासाठी तिने टोकाळ काठीचा, 'खननयष्टी'चा उपयोग केला. पुढे हे क्षेत्र विकसित होऊन त्यांत पुरुषाचा प्रवेश झाला. या प्रवेशबरोबर नांगराचा शोध लागला. सुरवातीला लाकडाचा नांगर अन् नंतर लोखंडी नागर आला. नांगर हे पुरुषाचे आयुध झाले. नांगराच्या वापराबरोबर शेताच्या पिकाची विपुलता वाढली आणि या क्षेत्रात पुरुषाची मक्तेदारी आली. स्त्रीचे स्थान दुय्यम झाले.

एकेकाळी गोव्यातही शेतीचे क्षेत्र स्त्रीकडे होते, असे विधान करण्यास पुष्टी देणारे एक आयुध हल्लीच निरीक्षणात आले आहे. 'गोव्याचे आदिवासी' नावाच्या, श्री. देविदास गावकर यांच्या पुस्तकात 'कुडवण' नावाचे एक आयुध दाखवलेले आहे, जे खननयष्टीरुप आहे. त्याचे मूळ रूप याहूनही प्राथमिक किंवा अविकसित असेल यात शंका नाही. हे आयुध शेतीक्षेत्रातील गोमंतकीय स्त्रीच्या पदार्पण काळाची निश्चितच ग्वाही देणारे आहे, असे माझे मत आहे.

शेती क्षेत्रात नांगराचा प्रवेश झाला. जमिनीची जास्त मशागत हे धान्य वृद्धीचे यशतंत्र, हे सत्य जरी इथपर्यंत लोकमानसाने जाणले तरी त्याने स्त्रीच्या यावात्मक शक्तीचे महत्त्व एकदम धुडकावले नाही. काही प्रमाणात त्याचे प्रयोग चालूच राहिले. पुढे समाज सुधारणेबरोबर काही कर्मे हरवून गेली, तर काही आज प्रचलित असलेल्या, हरतालिका, गौरी-गणपती, शाकंबरी, नवरात्री इत्यादी व्रत-विधी-उत्सवांच्या स्वरुपात जिवंत राहिली.

अलीकडेपर्यंत गोव्यात तसेच देशातील इतर भागात शेत-रोपणीच्या, नडणीच्या, कापणीच्या वेळी, शेतात काम करताना स्त्रियांनी गीते गायची पद्धत होती. माझ्या मते श्रमपरिहार अथवा मनोरंजन हे आज त्याला जोडलेले प्रयोजन नंतरचे आहे. खरे तर तो मूळ 'गीते गाऊन अदृश्य शक्तीचे आवाहन करणे आणि धान्याची - पिकांची समृद्धी मागणे' या उद्देशाने केलेला एक लोकधार्मिय याग आहे. इथे मुद्दाम नमूद करायला हवे, नृत्य-गीत सादरीकरण हा आदिमांसाठी एक धर्मविधी होता. इतर प्रयोजने त्याला नंतर जोडली गेली.

नांगराचा शेतीशी संबंध येण्यापूर्वी स्त्रीचा संबंध शेतीशी होता हे स्पष्ट करणारे एक सुफलीकरण व्रत म्हणजे चवथीच्या (गणेश चतुर्थी) आदल्या दिवशी येणारे स्त्रियांचे 'हरतालिका' अथवा 'तये'चे व्रत.

या व्रताच्या दिवशी स्त्रिया नांगराने जमीन नांगरून केलेल्या शेतीतील पिकाचे कोणतेच धान्य अथवा फूल - फळ सेवन करीत नाहीत. प्राथमिक अवस्थेत ज्या तऱ्हेचे अन्न-धान्य खात होत्या, त्याचेच त्या सेवन करतात (परंपरेने). नांगर हे पुरुषलिंग प्रतीक आणि व्रतस्थ अवस्थेत स्त्रीला पुरुष संबंध निषिद्ध असतो, ही सुद्धा धारणा या प्रथेमागे आहे.

शेतीची रोपणी (लावणी), नडणी (निवडणे), लुवणी (कापणी), कांडणे, आसुडणे (पाखडणे) अशी कित्येक कामे स्त्रीच्या अखत्यारित आजही आहेत. मात्र नांगर धरण्यास (नांगरण्यास) परंपरेने बंदी आहे. स्त्रीने नांगर धरणे अशुभ लक्षण मानले जाते. परिस्थितीजन्य कोणा स्त्रीने तो धरला तर तिचे लग्न होणे एकेकाळी समाजात कठीण होत असे. अशा स्त्रीला मूल होत नाही असा समज आहे.

स्त्री ही भूमी, नांगर हे पुरुष प्रतीक (पुरुषत्त्वाचे), नांगरणे ही संभोगात्मक क्रिया. एखाद्या स्त्रीने ते काम करणे हे निसर्गाविरुद्ध असल्याने, अशा नांगरणीतून जमीन नापीक बनते, अशी लोकधारणा आहे.

ही धारणा गोव्यात फक्त हिंदूमध्येच आहे असे नव्हे तर ख्रिस्ती समाजामध्येही ती प्रचलित होती (आहे). पंचवीस वर्षांपूर्वी वडील आजारी असल्याने आणि घरी कोणी दुसरा पुरुषमाणूस नसल्याने 'आपण नांगरीन शेत,काही होत नाही', या हट्टाने माझ्या गावच्या एका ख्रिस्ती मुलीने शेतात नांगरणी केली आणि त्यासाठी गावच्या लोकांनी तिची किती कुचेष्टा केली आणि नंतर तिच्या लग्नात किती अडथळे आले हे मी प्रत्यक्ष बघितलेले आहे.



१८.

# खुंटीमाया :
# आदिम समाजाच्या वसाहतीचे दैवत

ही पृथ्वी अचाट शक्तीचे केंद्र आहे. इथे जगायचे असेल तर पृथ्वीमातेची म्हणजे भूमातेची कृपादृष्टी असणे जरुरी आहे, अशी दृढ धारणा आदिम मानवाची होती. या धारणेतूनच त्याने भूमातेला प्रसन्न करण्यासाठी, तिला वश करण्यासाठी कित्येक यात्विक तंत्रे रचली. जी आज त्याचे सांस्कृतिक संचित बनून समाजमनावर आपला प्रभाव घालून आहेत. या कित्येक सांस्कृतिक संचितातील गोमंत भूमीवरील एक महत्त्वाचे संचित म्हणजे 'खुटी' अथवा 'खुंटी माया'. ना स्त्रीरूप देहधारी, ना पुरूषरूप देहधारी, परंतु एका अखंड पाषाणाच्या रूपात असलेले हे दैवी प्रतीक ज्या ज्या गावी सापडते, तिथे तिथे ते त्या गावचे ग्रामदैवत म्हणून पुजले जाते. त्याचा संबंध गावच्या मूळ वसाहतीशी जोडलेला दिसतो. गावचे मूळ वसाहतकार असलेले गावडी-कुळंबी आणि नाईक जमातीचे लोक मुख्यतः या ग्रामदेवतेचे भजक आणि पूजक असलेले दिसतात. अतिशय आदिम पद्धतीने त्याची आराधना केलेली दिसते. 'पत्र्यांत' म्हणजे पाला-पाचोळ्यात तिचे मूळचे स्थान. कित्येक जागी 'काऱ्याच्या' वृक्षाखाली तिची स्थापना केलेली दिसते.

आपल्या पारधी अवस्थेत माणूस जंगल-अरण्यांत शिकारीसाठी वणवण भटकत होता. कृषी अवस्थेत तो एका जागी (निदान काही काळ तरी) स्थिर झाला. त्याने वस्ती (पाडे) करून राहण्यास सुरवात केली. मात्र हे करताना, म्हणजे वस्ती-गाव स्थापन करताना, भूमातेची मान्यता घेणे जरुरी आहे, याची त्याला जाणीव झाली. ज्या भूमातेच्या कुशीत आपण बस्तान ठोकतो, तिची मान्यता न घेतली, तिची कृपादृष्टी न राहिली तर कोणत्याही क्षणी आपला

अंत होऊ शकतो. आपली टोळी होत्याची नव्हती होऊ शकते, अशी त्याला भिती होती. यातूनच त्याने आपल्या वसाहतीची स्थापना करताना, आपल्या टोळीसाठी निवाऱ्याची जागा उभी करताना, सर्व प्रथम भूमातेचा मान केला. तिच्या नावे जमिनीवर खुंट पुरला. 'हा निवारा तुझाच, तुझ्याच कृपेने मी आणि माझी टोळी इथे वस्ती करतो आहे, तेव्हा आमचे तू रक्षण कर, तारण कर!' म्हणून तिला साकडे घातले आणि तिची कृपा प्राप्त झाली अथवा आपल्यावर आहे या विश्वासाने आपले स्थिर जीवन सुरू केले.

कोंकणी समाजाच्या जिभेवर आजही एक वाक्प्रचार प्रचलित आहे. तो म्हणजे, 'खुंटी मारून मठी जोडली!' हा वाक्प्रचार म्हणजे नुसता शब्दखेळ नाही. या वाक्यप्रचारामागे गोमंत अथवा कोंकणी भूमीचा सांस्कृतिक इतिहास दडलेला आहे. येथील आदिम वसाहतकाराने, आपल्या वसाहतीचा आरंभ भूमीवर खुंटीची स्थापना करूनच केला, या सत्याचे हा वाक्प्रचार प्रमाण देत आहे. तसेच ज्या जमातीचे 'खुंटी' हे दैवत अथवा सांस्कृतिक वैशिष्ट्य आहे, त्यानीच येथील भूमीवर पहिली वसाहत केली, ग्रामनिर्माण केले, शेती-बागायती तयार केल्या हा सांस्कृतिक इतिहासपण तो उलगडवून दाखवतो आहे.

सांस्कृतिक इतिहासकारांच्या मते खुंटी हे कोल जमातीचे सांस्कृतिक वैशिष्ट्य. या कोलांचे मूळ स्थान मध्य प्रदेशातील छोटा नागपूर येथे होते, जिथून ही जमात कोकण भूमीत पोहचली आणि इथे तिने वसाहत केली. या भूमीवर कृषी परंपरेचा उद्‌गम याच जमातीकडून झाला. या जमातीच्या येथील वसाहतीबरोबरच तिची सांस्कृतिक वैशिष्ट्येही या भूमीत रुजली गेली. जी नंतर आलेल्या काही जमातींनी, त्याच्या आश्रयासवे काही प्रमाणात स्वीकारली. आज गोव्यात वसाहत करणाऱ्या गावडी-कुळंबी या दोन जमाती, ज्यांनाच कोलांचे वंशज मानतात, त्यांच्याच आधिपत्याच्या गावात खुंटी सापडते. खुंटीच्या स्थापने संबंधीच्या ज्या आख्यायिका संबंधित गावात प्रचलित आहेत, त्याही त्याच 'घरवयांशी' (घराण्याशी) संबंधित सापडतात. या घराण्यातल्या मूळ पुरुषानेच खुंटीची स्थापना केली असा मौखिक इतिहास कथन केला जातो. 'खुंटी' या शब्दाचा अर्थ कोकणीत एक वीत अथवा दीड वीत लांबीची दांडी, जिचा खालचा भाग निमुळता अन् टोकाळ असतो, असा अर्थ कोकणीत सापडतो. सर्वसामान्यपणे खुंटी म्हणताना ती लाकडीच असते आणि ग्रामजीवनात दळण्यासाठी जाते ओढताना ते पकडण्यासाठी ती

लावली जाते. जुन्या काळी घराच्या भिंतीवरही वस्तू टांगण्यासाठी ती लावली जात असे.

दैवतरूप आज जी गोव्यातील गावांनी खुंटी सापडते ती एका पाषाणी दगडाच्या रूपात दिसते. हा दगड अखंड दिसतो. तसाच तो जमिनीत पुरलेला असून, वरचा भाग निमुळता असतो. यात अपवादही असू शकतो.



**खुंटी ही पाषाणी दगडाच्या रुपात सापडते. (आमोणे–केपे, १९९०)**

खुटीसंबंधीच्या प्रथा–परंपरा आणि आख्यायिका यांच्या आधारे, 'खुंटी परंपरेची स्थापना नवपाषाण युगात झाली' असे अनुमान काढता येते. या काळातच शेती परंपरेचा आणि मानवाच्या वसाहतींचा आरंभ झाला.

'खुंटी दैवत' म्हणजे संबंधित जमातीने अथवा लोकसमूहाने आपल्या वसाहतीची सुरवात करताना त्या जागेवर आपला हक्क प्रस्थापित करण्यासाठी पुरलेले एक चिन्ह जे पुढे त्या लोकसमूहाने आपले ग्रामदैवत मानले, असा समज सर्वसाधारणपणे लोकमानसात आहे. एके काळी मलाही त्या समाजात तथ्य दिसत होते. मात्र आज या परंपरेच्या सखोल अभ्यासातून माझ्या विचारात थोडा बदल घडलेला आहे. माझ्या मते, खुंटी हे संबंधित जमातीच्या पूर्वजाने, आपल्या लोकसमूहाचा त्या भूमीवर हक्क प्रस्थापित करण्यासाठी नुसते पुरलेले आपले एक चिन्ह नसून आदिमाता पृथ्वीची कृपादृष्टी आपल्या समूहावर असण्यासाठी आणि आपल्या समूहाचे रक्षण मागण्यासाठी आदिमाता पृथ्वीचेच अथवा भूमातेचेच स्थापन केलेले ते प्रतिक रूप आहे.

आपण ज्या भूमीवर राहतो, त्या भूमीवर आपला निवारा उभा करताना, त्या भूमीचा मान–सन्मान करणे, तिचा आशीर्वाद घेणे, तिचे आवाहन करणे आदी प्रथा आजही समाजात दिसतात. भारतातच नाही तर त्या जगभराच्या लोकसमूहात आहेत. वेगवेगळ्या भागात, समाजात त्यांच्या सादरीकरणाचे

रूप वेगवेगळे दिसते. आज शिष्ट समाजात प्रचलित 'भूमीपूजा' हा त्यातलाच एक प्रकार.

खुंटी स्थापना हा आदिम काळचा कोकण भूमीवरील कोल जमातीचा नुसताच भूमीपूजेचा प्रकार नसून प्रत्यक्ष भूमीचीच प्रतिकरुप स्थापना होय. खुंटीचे पाषाणी रूप हे भूमातादर्शक आहे आणि जगातील आदिम संस्कृतीत भूमातेची पाषाणी रुपे प्रसिद्ध आहेत.

खुंटीला 'माया' हा प्रत्यय लावला जातो आणि 'खुंटीमाया' या संज्ञेत तिचा उद्‌घोष केला जातो. तिला जुळलेला 'माया' प्रत्यय तिचे मातृरूप सिद्ध करणारा आहे. माझ्या आमोणे गावात 'खुंटी' दैवत आहे. गाव मूळचा गावडी जमातीने वसवलेला असून अजूनही गावचे सांस्कृतिक मुख्यत्यारपण याच जमातीकडे आहे. गावाशी संबंधित एकंदर पाच खुंटी आहेत, ज्यातील एक 'म्हालखुंटी' आहे. म्हालखुंटीची स्थापना गावच्या 'गांवकार' वाड्यावर असून बाकीच्या चार गावच्या चार सीमांवर आहेत. या शिवाय एक चंद्रनाथ पर्वतावर आहे. या गावचा मूळ पुरुष (जल्मी) अवर्षणकाळी फिरत फिरत या गावी आला आणि त्याने कुशावती तीरी 'खुंटी मारून मठी जोडली', नंतर त्याने वस्तीच्या बाजूला शेती केली आणि आपल्या कुटुंबासमवेत राहू लागला. पुढे इतर जाती-जमाती तिथे आल्या आणि त्याच्या परवानगीने तिथे राहू लागल्या. त्यातून या संबंधीचा गावाची निर्मिती झाली, अशी आख्यायिका गावचे वडील-जाणते सांगतात. माझ्या 'आमोणे - एक लोकजीण' या पुस्तकात हा सविस्तर मौखिक इतिहास नोंद झालेला आहे.

खुंटी आणि मानवी वस्ती (ग्रामवस्ती) यांचा संबंध स्थापित करणारी आणखी एक परंपरा आजही गोव्यात दिसते. आमच्या गावातही ती आहे. ती परंपरा म्हणजे 'म्हातन' किंवा सामूहिक जेवण. वर्षाला एकदाच गावच्या साऱ्या जाती-धर्माच्या लोकांनी एकत्र येऊन खुंटीच्या प्रांगणात सामूहिक जेवण करायची, म्हणजे 'म्हातन घालायची' परंपरा आहे.

या परंपरेतून वस्तीची एकसंघता तर दिसतेच, त्याचबरोबर या वस्तीचा आरंभ खुंटीच्या म्हणजे भूमातेचा आशीर्वाद घेऊन झाला. वर्षाला एकदा तिच्या लेकरांनी तिच्या छत्राखाली येऊन, तिची साभार आठवण करून तो संबंध पूनर्प्रस्थापित करण्याचीही भावना त्यामागे दिसते.



१९.

# वर्तुळाकार : आदिमांना ज्ञात झालेले भूमाता रुप

ही पृथ्वी ‘गोल’ अथवा ‘वर्तुळ’ आकारात आहे, याचे ज्ञान मानवाला आदिम काळीच ज्ञात झाले होते. यातूनच त्याने ज्या वेळी पृथ्वीची म्हणजे भूमातेची प्रतिकरुप आराधना सुरू केली ती गोल अथवा वर्तुळसदृश्य आकारातील सजीव अथवा निर्जीव वस्तूंच्या रुपातच केली. एवढेच नव्हे, तर ज्या वेळी त्याने भूमातेचे चिन्ह अथवा प्रतिक कोरले, तेव्हा ते गोल अथवा वर्तुळाच्या आकारातच कोरले.

याच काळी मानवाला स्त्री आणि भूमातेच्या निर्मिती प्रक्रियेचे साधर्म्य जाणवले होते. स्त्रीच्या निर्मितीचे केंद्रस्थान जे गर्भाशय, तेही गोलाकारच मानून त्याने स्त्री आणि भूमाता दोन्हीच्या सर्जनासंबंधीच्या विधीत अथवा क्रियेत गोलाकार प्रतीके वापरली. यात्विक कृत्यांनीही वर्तुळाकार हालचालींना महत्त्व दिले.

आजही प्रचलित वेगवेगळ्या प्रदेशांच्या आणि समाजाच्या लोकसंस्कृतीत जिथे आदिमकालीन शेतीसंस्कृती आणि त्याला जोडून मातृप्रधान संस्कृती नांदत होती, त्यामध्येही भूमातासदृश्य प्रतीके, चिन्हे आणि वर्तुळाकार हालचालींच्या क्रिया सापडतात.

भूमातेसंबंधीच्या या वर्तुळाकार संकल्पनेचा उगम मानवाच्या आदिम, वन्य अवस्थेपर्यंत जातो, असे विधान करण्यास एक प्रमाण गोव्यात सापडलेले आहे. १९९३ साली सांगे तालुक्यातल्या धानोळे-केवण येथे ज्या जागेला आधी काही विद्वानांनी ‘उसगाळीमळ’ अशी प्रसिद्धी दिली आणि सध्या

गोवा पुरातत्व खात्यात त्याची नोंद ‘पणसाळी मळ’ अशी केलेली आहे, तिथे कुशावती नदीच्या तीरी सुमारे १३० प्रस्तर चित्रे मिळाली, ज्यामध्ये एक सर्पिलाकार वर्तुळ चित्र आहे. हे चित्र म्हणजे मातृदेवीचे-भूदेवीचेच प्रतिक चित्र आहे, असे मत काही संशोधकांनी व्यक्त केलेले आहे. या चित्रातील ‘वेटाळे’ सर्पसदृश्य दिसत असले तरी ते गर्भाशयातील नाळेचे रुप आहे. शिवाय सर्प अथवा सर्पिणीचा मातृदेवीशी प्रतीकात्मक संबंध असतो, अशी पुष्टी या मताला दिली आहे.

हे मत ग्राह्य धरले तर भूमातेच्या प्रतिकृतीचा आपल्या इच्छित कार्यासाठी मानवाने यात्विक उपयोग करायला सुरवात त्याच्या वन्य अवस्थेच्या काळी केली म्हणता येते. या प्रस्तर चित्रांच्या अचूक काळाची अजून निश्चिती झालेली नाही. तरी साधारणपणे हा दहा ते पंधरा हजार वर्षे, असा अंदाज केला जातो.

आपल्या वन्य अवस्थेतून प्रगती करीत करीत मानव नागर (ग्राम) अवस्थेत पोहोचला. या काळात त्याने आपली संस्कृती निर्माण केली. या संस्कृतीतही कालप्रवाहाबरोबर बदल घडत गेला. सुरवातीला त्याच्या संस्कृतीत आदिम जीवनवैशिष्ट्ये प्रभावी होती, हळुहळू ती कमी होत गेली. नव्या विचारसरणींचा, धारणांचा प्रभाव त्याच्या नागर संस्कृतीत दिसू लागला. आता तर आधुनिकतेचा प्रभावही त्याच्या संस्कृतीवर झालेला आहे. मात्र काही विचारधारा, काही संकल्पना, काही समज, जे त्याच्या प्राथमिक अवस्थेशी संबंधित होते, जे एवढे प्रबळ आणि प्रभावी होते की एवढ्या हजारो वर्षांच्या कालप्रवासातही ते टिकून राहिले. उदाहरणार्थ : ‘वर्तुळ’ अथवा ‘गोल’.

जगभर अस्तित्त्व असलेली ही संकल्पना, गोव्यात अथवा कोकण भूमीत, विविध लोकोत्सव, विधी, प्रथापरंपरांतून समोर येते. गोव्यातील स्त्रियांचे तीन प्रमुख लोकोत्सव म्हणजे ‘दिंनलो’, ‘कातयो’ आणि ‘धालो’. यामध्ये तर स्पष्टपणे वर्तुळाची संकल्पना जाणवते आणि या उत्सवांची निर्मिती भूमातेला प्रसन्न करण्यासाठीच केली जाते, हे नकळत ज्ञात होते.

‘दिंनलो’ उत्सवात तर स्त्रिया मातीचा गोळा (गोल) करून पूजेला लावतात आणि त्याच्यासमोर दोन गट करून, वर्तुळाकार फिरत नृत्य करतात. ‘कातयो’ उत्सवातही स्त्रिया वर्तुळाकार राहूनच नृत्य करतात. ‘धालो’त दोन ‘रेगा’



**वर्तुळाची संकल्पना जगभर सापडते. (धानोळे-सांगे, १९९६)**

(ओळी) करून स्त्रिया नाचत असल्या तरी मूळ वर्तुळ विभागूनच त्यातून दोन 'ओळी' (भाग) घडलेल्या आहेत, असे स्पष्ट दिसते.

सर्वात महत्त्वाचे म्हणजे ही तिन्हीही नृत्ये ज्या जागी होतात तो 'मांड', हा वर्तुळाकार आहे. पुरुषाचा महत्त्वाचा लोकोत्सव असलेला आणि भूमातेच्या आराधनेसाठी केला जाणारा शिगमासुद्धा मांडावर होतो आणि त्यासंबंधी सगळी लोकनृत्ये वर्तुळाकार फिरत होतात. या नृत्यांचाच नव्हे, तर गावात जिथे सांस्कृतिक सामूहिक कार्ये होतात तो मांड हा वर्तुळाकार असतो. घराचे 'अंगण' जिथे देवकार्ये होतात, गावचा मेळ येऊन लोकनृत्ये नाचतात, ते अंगणसुद्धा वर्तुळाकार असते, ही गोष्ट मुद्दाम लक्षात घेण्याजोगी आहे.

'कुंभ', 'कलश', 'घट' अथवा 'मडकी' इत्यादी वस्तू जी मातृदेवीची प्रतिके मानतात, ती गोलाकारच आहेत आणि लोकसांस्कृतिक तसेच अभिजात संस्कृतीतही त्यांना अतिशय महत्त्व आहे.

मातृदेवी प्रतिकातील एक महत्त्वाचे प्रतिक म्हणजे 'बांगड्या' अथवा 'चुडा'. गोलाकार असलेले हे चिन्ह अहेवपणाचे लक्षण मानले तरी मूळचे ते भूमातेचे चिन्ह आहे आणि त्याला धरूनच ते सृजनप्रतिक रुप स्त्रिया अंगावर धारण करतात, भूमातेलाही इच्छीत फलप्राप्तीसाठी अर्पण करतात.

सिंधू संस्कृतीतल्या उत्खननात जी धातूची रिंगे सापडली होती, ती मातृदेवीरुप आहेत, असे निष्कर्ष विद्वानांनी काढले आहेत.

अहेव स्त्रिया (हिंदू) पायांच्या बोटांना जी रिंगे (वेडे) घालतात, ती सुद्धा मातृदेवीचे प्रतिक असून मातृदेवीशी असलेले त्यांचे नाते, त्यामधून वृद्धिंगत होते. लोकसमाजाने मातृदेवीच्या वर्तुळ प्रतिकाच्या केलेल्या यावात्मक वापराचे आणखी एक महत्त्वपूर्ण उदाहरण म्हणजे लहान बाळाच्या हाताला घातली जाणारी 'कंकणे'. पांढऱ्या-काळ्या दोन रंगांच्या या बांगड्या बाळाच्या दोन्ही हातात घातल्या जातात. या बांगड्या घातल्या म्हणजे बाळाला दृष्टबाधा होत नाही, असा समज आहे. या बांगड्यांना 'दिश्टीची कांकणां' म्हणून ओळखतात.

फळभाज्यांमध्ये 'भोपळा' आणि 'कोहळा' या दोन भाज्यांना गर्भाशय प्रतिक म्हणजेच भूमाता प्रतिकरुप मानले जाते. शुभकार्यात, त्याचबरोबर यात्विक कार्यात त्यांचा वापर केला जातो.

आदिम समाजात प्रत्येक सामूहिक कार्यात वर्तुळाकाराला महत्त्व दिलेले दिसते. एकेकाळी 'गांवपण' (ग्रामसभा) बसण्याची पद्धतसुद्धा गोलाकार होती.

वरवर बघता या गोष्टी सहज, साध्या वाटतात, परंतु त्या तशा नसून त्यामागे आदिम मानवाची एक मनोधारणा दडलेली आहे. भूमातेला मान, आदर देण्याची भावना वर्तुळाकारात आहे, जी आजही 'लोक' तसेच 'शिष्ट' समाजाने जोपासलेली आहे.



२०.

# लोकरंगांचे गूढ

लोकपरंपरेत काजळ, हळद आणि कुंकू (पिंजर) या तीन वस्तूंना खूप महत्त्व दिलेले दिसते. त्यांच्याशिवाय मातृदेवीची पूजा परिपूर्ण होत नाही, असा लोकमानसात दृढ समज आहे. पुरुषदेवांना यातील कुंकू वाहिले जाते, काजळ आणि हळद (भंडारा) क्वचितच पुरुषदेवांना वाहिले जाते. या तिन्हीही वस्तूंचा मूलतः मातृदेवीच्या आराधनेशी संबंध आहे. मातृदेवीच्या भूतलावरील प्रतिनिधी मानल्या जाणाऱ्या या स्त्रिया भालप्रदेशावर काजळ, कुंकू, हळद वापरतात. यातून त्यांचे मातृरुप प्रतीत होते, असा समज आहे.

काजळ, कुंकू, हळद या तिन्हीही वस्तूंचा एकमेकांशी संबंध असून त्यांच्या वापरात प्रतिकात्मक अर्थ दडलेला आहे. त्यांच्या वापराची सुरवात भूमातेच्या संकल्पनेच्या उदयाबरोबरच झाली म्हटल्यास वावगे ठरणार नाही. या तिन्ही वस्तूंमधील सर्वांत मूळची वस्तू 'काजळ' अथवा काळा बुक्का. 'राख' अथवा 'बिबूत' (विभूती) हे काजळाचे पूर्वरुप. ज्या काळी मानव समाज आपल्या वन्य अवस्थेतून स्थित्यंतर करीत होता आणि ज्या काळी मातृदेवीची संकल्पना त्यांच्या मानसात रुजली, त्याच काळी स्त्री आणि भूदेवीच्या निर्मिती प्रक्रियेचे साम्य उमगून, भूमातेच्या रजस्रावाची कल्पना त्याला सूचली. सभोवताली आपसूकच पेटणारे वणवे... आगी यातून भूमातेच्या अचाट शक्तीचा त्याला दृष्टांत झाला आणि त्यातून निष्पन्न झालेली राख त्याला तिच्या अचाट निर्मितीशक्तीचे प्रतिकरुप भासले, ज्याला त्याने तिचे रज मानून स्वतःच्या अंगावर धारण केले आणि तिच्या कृपादृष्टीची कामना केली.

शिगम्यात होळी दहनात जी राख तयार होते, ही राख देवाचा अथवा देवीचा प्रसाद म्हणून भाळी लावण्याची परंपरा आहे. ही परंपरा आदिम धारणेशी, आजच्या समाजाचे जोडून असलेले नाते सांगणारी आहे.

पारधी अवस्थेतून मानव शेती संस्कृतीत स्थित्यंतरीत झाला. या अवस्थेत त्याच्या जीवनात, राहणीमानात, विचारात बदल घडला. भूमाता–मातृदेवता या संकल्पनाही अधिक विकसित झाल्या. याचकाळी 'हळद' हे मातृदेवीचे सृजनप्रतिक म्हणून त्याने स्वीकारले. सृजनोत्सवात आणि सुफलीकरण विधींनी उदा. लग्नात, हळदपूड अथवा लेपाचा वापर महत्त्वपूर्ण झाला. तरीपण 'राख' अथवा 'काजळ' यांचा वापरही चालूच राहिला. तेलाच्या शोधाबरोबर मुद्दाम 'काजळ' तयार करणे (पाडणे) ही सुरू झाले. 'सटी'सारख्या बाळ–बाळंतीणीच्या देवीला (मातृदेवतेला) हमखास काजळ अर्पण करणे झाले.

चुन्याच्या शोधाबरोबर 'कुंकवा'ची निर्मिती झाली. चुना आणि हळद यांच्या मिश्रणाने लाल रंग तयार झाला. प्रत्यक्ष रजरुप भासत असल्याने, लोकमानसाने काजळ अथवा हळदीपेक्षा तो सर्रास वापरण्यास सुरवात केली. लाल रंग सौंदर्यातही भर घालीत असल्याने तरुणी, स्त्रिया त्यांचा भाळावर टिळा लावण्यासाठी त्याचा वापर जास्त करू लागल्या. यातूनच पुढे 'अहेव' म्हणजे सवाष्ण स्त्रियांनीच कुंकू लावायचे आणि विधवेने कपाळी काळा बुक्का लावायची प्रथा सुरू झाली असावी. खरेतर काजळ, हळद आणि कुंकू या तिन्हीही गोष्टी एकाच लोकधारणेची निष्पत्ती आहे. भूमातेचे रजप्रतिक या अर्थाने त्यांची निर्मिती झालेली आहे, परंतु मानवी अवस्थेच्या उन्नतीबरोबर हळद आणि कुंकू ही सौभाग्यचिन्हे आणि काजळ हे विधवेचे चिन्ह असा समज लोकमानसात रुढ झाला.

या समजाचा प्रत्यय प्रामुख्याने येतो तो मरणाच्या विधीप्रसंगी. ज्या वेळी एखादी सवाष्ण स्त्री मरते तेव्हा तिचे कपाळ लाल कुंकवाने भरलेले दिसते. ज्या गावात ग्रामदेवतांचे प्रस्थ आहे अशा गावात तिला भंडाराही लावला जातो. मात्र ज्या वेळी एखादी विधवा मरते तेव्हा तिला कुंकू लावण्यात येत नाही, तिच्या कपाळी काळा बुक्का लावला जातो.

काजळाशी असलेला मातृदेवीचा संबंध तसा अजूनही पूर्णपणे तुटलेला नाही. अजूनही ग्रामीण भागात सातेरी, सटीदेवी इत्यादी ग्रामदेवींना इतर



**चितार्‍यांनी तयार केलेल्या लाकडी पाटांमध्ये लोकरंगाचे दर्शन होते.**

वस्तूंबरोबर मुख्यतः काजळ अर्पण केले जाते. कुंकू अर्पण केले तरी त्याचे महत्त्व येथे दुय्यम असते. म्हणताना सुद्धा 'काजळ-कुंकू अर्पण करतो' असे म्हटले जाते. येथे काजळ हा शब्द कुंकवाच्या आधी येतो हे मुद्दाम लक्षात घेतले पाहिजे.

काळा बुक्का हे विधवेचे लेणे आणि सवाष्ण अथवा अहेव स्त्रीने ते कपाळी लावणे अवलक्षण आहे असा समज रूढ असला तरी बाळ-बाळंतिणीच्या रक्षणाचे अंजन म्हणून काजळाचा यावात्मक उपयोगही केलेला दिसतो. नवजात बालकाच्या सटीपूजेला आणि बारशाला काजळ वापरतात. सटी-देवीला ते अर्पण करून बाळ-बाळंतीणीच्या डोळ्यात घालायची प्रथा आहे (होती). त्या नंतरही बाळ मोठा होईपर्यंत त्याच्या कपाळाला अथवा गालाला काजळाची तीट (गालबोट) लावली जाते, ज्यामुळे त्याला जिवंत अथवा मृत माणसाची दृष्टबाधा होत नाही, असा समज आहे. या दोन्हीही प्रथा बघितल्या तर काजळाविषयीची मूळ धारणाही लोकमानसात कळत नकळत का होईना, अस्तित्त्वात असलेली दिसते.

ग्रामदेवतांच्या अथवा लोकदेवतांच्या प्राकारात काळ्या, पिवळ्या आणि लाल रंगांचे खूप महत्त्व मानलेले दिसते. देव-देवतांच्या काष्टमुर्ती, मंदिरांच्या भिंती, पेटारे, पाळणे, पालख्या या सार्‍या गोष्टींत या रंगांचा प्राधान्याने वापर

केलेला दिसतो. कधी पांढरा अथवा हिरवा रंगही त्यात समाविष्ट दिसतो. हे रंग सृजनात्मक म्हणून मुख्यतः वापरलेले दिसतात. यावात्मक अथवा रक्षणात्मक उद्देशाने बनवलेल्या वस्तूंत काळा, पिवळा आणि लाल हे तीनच रंग असतात आणि हे रंग काजळ, हळद आणि कुंकू यांच्याच रंगातून कल्पिलेले आहेत. येथे लहान बाळाच्या हातात दिली जाणारी आणि आज अपवादानेच दिसणारी 'मूठ' (लाकडी) याचा मुद्दाम उल्लेख करायला हवा. ही मूठ बाळाचे वाईट शक्तीपासून रक्षण करण्यासाठी असते, असे तिचे मूळ प्रयोजन सांगणारी माहिती हल्लीच मला शब्दकोशकार कै. पांडुरंग भांगी यांच्या एका लिखाणात मिळाली.

या मुठीला सुद्धा लाल, पिवळा आणि काळा हे तीन रंग असतात. एकेकाळी बाळासाठी वापरण्यात येत असलेला लाकडी पाळणा हा सुद्धा अशाच रंगांची संगती सांगणारा आहे.

काळ्या, पिवळ्या आणि लाल रंगामुळे एक उग्रता-गूढता या देवीच्या प्राकारात निर्माण होते आणि मातृदेवीचे मूळचे उग्ररुपही त्यातून प्रतीत होते. अशा रंगांच्या देवी प्रक्षुब्ध असतात, असा समज लोकसमाजात रुढ आहे.

गोव्यात साष्टी तालुक्यातील कुंकळ्ळी गावचे (देमांदी) चितारीकाम प्रसिद्ध आहे. येथील चितारी कारागिरांनी केलेल्या लाकडाच्या वस्तू आणि त्यांचे रंग या दृष्टीने अभ्यासण्याची गरज आहे. यांच्या चितारी कामात लाल, पिवळा, हिरवा, पांढरा आणि काळा हे पाच रंगच वापरलेले असतात. लाकडावर रंगवलेली इतर चित्रे सुद्धा असतात. 'पोपटाची जोडी' हे पाटांवर रंगवले जाणारे त्यांचे एक महत्त्वाचे पारंपारीक चित्र. हे पोपटांचे पाट खूपच लोकप्रिय आहेत. पोपटांचा संबंध सुफलीकरणाशी असतो. हे पोपट रंगारण्यासाठी लाल-पिवळ्या रंगांबरोबर हिरवाही रंग वापरला जातो, ही गोष्ट लक्षात घ्यायला हवी.

माझ्या मते या कलेचा संबंधही मातृदेवी परंपरेशी आहे. मातृदेवीच्या संकल्पनेतून ही सृजनप्रतिके, रंग आणि ही चितारी कला कोणे काळी उदयाला आली असावी.

कुंकळ्ळी गाव हा श्री शांतादुर्गा (सातेरी) देवीच्या अधिपत्याखाली आहे. तिच्या वार्षिक जत्रेत हे चितारीकाम खास विकायला ठेवले जाते, ही सुध्दा गोष्ट इथे नोंद घेण्याजोगी आहे.



२१.

# सजीव-निर्जीव :
# दोन्हीही वस्तूंत प्राण असतो, ही आदिमांची धारणा

एखाद्या राजकन्येचे, राजपुत्राचे, राक्षसाचे, जादुगाराचे वगैरे मरण एखाद्या झाडात, पक्ष्यांत, प्राण्यात, फळात अथवा दागिन्यांत असते, हा जगभरच्या लोककथांतून सापडणारा कल्पनाबंध आहे. या निर्जीव अथवा सजीव वस्तूंना इजा झाली, तर त्यांनाही इजा होते, त्यांना मारून टाकले अथवा त्यांची पूर्णपणे विल्हेवाट लावली, तर ते सुद्धा मरून जातात, या जगातून नाहीसे होतात. या राजकन्या, राजपुत्र, राक्षस, जादुगार वगैरेना नैसर्गिक पद्धतीने मृत्यू नसतो, तर त्यांचे मरण ज्या वस्तूंत आहे, त्या वस्तूंचा नाश केल्यावरच त्यांना मरण येते, असे वर्णन अशा कथांमध्ये असते.

या कल्पनाबंधाच्या रचनेमागे एकंदरच मानवी समाजाची मानसिक जडण-घडण कारणीभूत आहे आणि तिचे मूळ मानवी समाजरचनेच्या खूप खोलात, ज्या काळी मानव वन्य अवस्थेत होता आणि पृथ्वीतलावरील सजीव तसेच निर्जीव घटकांच्या अस्तित्त्वाचे गूढ त्याला पडले होते, त्या काळी या कल्पनाबंधाचे बीज त्याच्या मनात रुजले, पुढे कल्पकतेच्या प्रगतीबरोबर आणि प्रतिभेच्या आविष्काराबरोबर लोककथांनी समाविष्ट झाले.

या पृथ्वीतलावरील अगणित वनस्पती तसेच जीवसृष्टीचे आणि आपले एक विलक्षण असे गूढ नाते आहे. आपण त्यांच्या संपर्कात राहतो, ते सतत आपल्या जीवनावर प्रभाव घालून राहतात. आपले जीवन त्यांच्याशी संलग्न आहे. आपल्यासारखीच ती सुद्धा या भूमातेची लेकरे आहेत. या भूमीवर आपल्या एवढाच त्यांचासुद्धा अधिकार आहे, या धारणेतूनच आदिम मानवाने

या पृथ्वीतलावरील जीवसृष्टी आणि वनस्पती सृष्टीशी आपले व्यवहार नियंत्रित केले, ज्यातील कित्येक अवशेष रुपाने आजही त्याच्या जीवन व्यवहारात जीवंत असलेले दिसतात. लोककथांतील वरील कल्पनाबंध हे त्याचेच एक उदाहरण.

फ्रेझर या विद्वानाच्या मते आदिम मानव 'द लॉ ऑफ कॉण्टॅक्ट ऑर कंटेजिन' हा यातुविद्येतील सिद्धांत मानत होता. या सिद्धांताप्रमाणे एखादा माणूस, एखाद्या निर्जीव अथवा सजीव वस्तूच्या संपर्कात आला, तर त्याच्यापासून दूर गेल्यावरही, त्याच्यावर त्या वस्तूचा प्रभाव राहतो. निर्जीव वस्तूंतही आत्मा वसतो. या आत्म्याच्या वास्तव्यामुळेच या वस्तूंमध्येही बदल घडतो. त्यांचा आकार बदलतो. त्या जर्जर होतात. नष्ट होतात. हा आत्मा अनैसर्गिक असतो आणि बरेचदा अतिमानवी असतो, अशीही आदिम मानवाची धारणा होती.

या आणि अशाच तऱ्हेच्या जीवसृष्टीसंबंधीच्या धारणांतून आदिम माणूस भयभीत जगत होता. आपला प्रत्येक जीवन व्यवहार तो निसर्गातील शक्तींचे आवाहन करूनच करीत होता. झाड-वृक्ष विनाकारण कापायला तो धजत नव्हता, पक्षी-प्राण्याला मारताना तो शंभरदा विचार करीत होता. स्वतःच्या पोटरक्षणासाठी शिकार केली, तरी ती शिकार तो काही विशिष्ट यात्विक कर्मे करून, त्या प्राण्याची माफी मागूनच करत होता. एखादे झाड कापायचे झाले तर त्यासाठी आधी त्या झाडाचीच तो मान्यता घेत होता.

झाडांनाही जीव असतो, त्यांनाही संवेदना असतात, भावना असतात. आपली भाषा-कृती झाडांना समजते, याची जाणिव म्हणा अथवा धारणा म्हणा, परंतु ते आदिम काळीच मानवाला ज्ञात झाले होते. आदिम मानवाने जी जी वस्तू सावली देते, ती ती संवेदनक्षम असते, असे मानले होते, असेही फ्रेझरचे मत आहे.

'झाडांनाही प्राण असतो' या धारणेला पूरक अशी जगातील विविध भागांत प्रचलित असलेल्या कित्येक प्रथांची माहिती फ्रेझरने आपल्या 'द गोल्डन बॉव' या ग्रंथात दिलेली आहे. दोन उदाहरणे अशी : १) येसाव बेटावरचा फिजी माणूस माडाच्या झावळ्यांना (चुडतांना) 'मी तुमचा नारळ खाऊ का?' असे विचारल्याशिवाय कधीच नारळ खाणार नाही. २) डायक्स माणूस जुनी-पुरातन झाडे कापण्याची कधीच हिंमत करीत नाही. त्याच्या मते अशा

झाडांमध्ये आत्मा वास करतो, जो झाड कापणाऱ्या माणसाला कडक शिक्षा करतो. प्रसंगी त्याचे प्राणही घेतो.

याच भावनेने डायक्स लोक कधी एखादे झाड उन्मळून पडलेले दिसले तर ते नुसते सोडत नाही, तर त्या झाडाला रक्त अर्पण करतात आणि तिथे गुढ्या लावतात. ३) काही झाडांमध्ये नुसताच प्राण नसतो तर प्रत्यक्ष त्यांच्यात भूतेच वास करतात आणि अशा झाडांची सावली जेव्हा दिसते तेव्हा ती झाडासारखी दिसत नसून ती एक तर मानवी सावलीसारखी दिसते अथवा बैल किंवा सापाच्या आकारासारखी दिसते, हा चिनी लोकांत असलेला समज.



**आत्मा सजीव-निर्जीव वस्तूंत वास करतो, अशी आदिमांची धारणा.**

'झाडांमध्ये प्राण असतो' ही धारणा जागतिक असून त्या भावनेतूनच काही पुरातन झाडांना अथवा विशिष्ट जातीच्या झाडांना देवत्व प्राप्त झालेले दिसते. गोमंतकीय संस्कृतीत आंबा, उंबर, वड, पिंपळ, कलम (कदंब) कारा, या झाडांचा यासंबंधाने येथे उल्लेख करता येईल. 'आंबा' या झाडाला इतर झाडांपेक्षा जास्तच महत्त्व दिलेले दिसते. कित्येक ठिकाणी देवाचा वास असलेली झाडे म्हणून गावकऱ्यांनी आजही 'व्हडले आंबे' (महावृक्ष) राखून ठेवलेले दिसतात.

एखाद्या वेळेस काही कारणास्तव ही झाडे मारणे अपरिहार्य झाले तर देवाचा कौल घेतला जातो. गावच्या मानकऱ्यांनी एकत्र येऊन 'सांगणे' (प्रार्थना) केले जाते आणि नंतरच त्या झाडांच्या बुंध्यावर कुऱ्हाड-कोयता घातला जातो. सर्वसामान्यपणे झाडावर वास करणाऱ्या दैवी शक्तीला हे सांगणे घातले जाते, असा समज असला तरी खऱ्या अर्थाने प्रत्यक्ष झाडालाच (त्यांच्यातल्या जीवाला) ते उद्देशून असते, हे आदिमांच्या विचारधारणेचा

अभ्यास केल्यास दिसून येते.

खास झाडेच कशाला, एकेकाळी गोव्यात कोणतेही वाढलेले झाड मारायचे झाले तर 'झाडमारे' अथवा 'चिरपी' सर्वप्रथम त्याच्या बुंध्यावर फूल-कुंकू घालून त्याला हात जोडायचे, त्याला कापण्याची त्याच्याकडे मान्यता मागायचे, नंतर त्याच्यावर घाव घालायचे.

कोणतेही झाड विनाकारण मारायचे नाही, कापायचे नाही असा आदिमांचा (हल्लीपर्यंत लोकमानसाचा) जणू अलिखित नियमच होता. गरजेपोटी, घर - इमारतीसाठी ते मारायचे लागले तर पूर्ण वाढ झालेले झाडच कापायची पद्धत होती. तसेच जे झाड कापतो त्यांचा वंश म्हणजे बियाणे शाबूत आहे की नाही, हेसुद्धा बघितले जायचे. जो नियम आदिमांनी झाडांसाठी लावला, तोच प्राणीपक्ष्यांसाठी सुद्धा लावलेला दिसतो.

सजीव तसेच निर्जीव वस्तूंत प्राण असतो, त्यांच्यात आत्मा वास करतो या आदिमांच्या धारणेतूनच एखाद्या माणसाचे (विशिष्ट) मरण त्या वस्तूंच्या विनाशातून होते या कल्पनाबंधाची निर्मिती झाली असे म्हणता येते. येथे फ्रेझरने जो 'द लॉ ऑफ कॉण्टेक्ट ऑर कॉटेजिन' हा सिद्धांत मांडला आहे तोसुद्धा लागू करता येतो. एखादे झाड, प्राणी, पक्षी यांच्या संपर्कात अथवा सान्निध्यात बराच काळ उरल्याने, त्यांच्यात त्या माणसाचा जीव अडकतो किंवा त्यांच्यावर जीव जडतो. यातूनच त्यांच्या विनाशाने त्याला धक्का बसून मृत्यू येतो. या निरीक्षणातून लोकमानसाने, लोककथांच्या निर्मितीत अशा कल्पनाबंधाची रचना केली असावी. निर्जीव वस्तूंतसुद्धा एखाद्याचे मरण असते या कल्पनेमागेसुद्धा हाच भाव आहे.

गोमंतकीय लोककथा भांडारात असे कल्पनांबंध असलेल्या मला दहापेक्षा अधिक कथा सापडल्या. त्यातील एक 'भोज राजा आणि साधू' ही आहे. विषयाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वपूर्ण अशी ही लोककथा माझ्या 'नागशेराचे सूर' या गीतकथा संकलनात समाविष्ट आहे. या कथेतील साधू हा प्रत्यक्ष एक जादूगार असून त्याचे मरण त्याने पाळलेल्या पोपटात असते. कथेचा नायक त्याच्या मरणाचे गूढ जाणून घेऊन त्या पोपटाला मारून टाकतो, तसा तो दुष्ट साधूही मृत्यू पावतो. त्याला मारण्याची जी विशिष्ट तऱ्हा येथे वापरली गेली ती सुद्धा लक्षात घेण्याजोगी आहे. त्याचे वर्णन संक्षिप्तपणे असे : काळवैदास

पुत्र (नायक) पोपटाचा उजवा पाय मोडतो, त्याबरोबर साधूचाही उजवा पाय मोडला जातो. पोपटाचा डावा पाय-साधूचा डावा पाय... पोपटाचा उजवा पंख - साधूचा उजवा हात... अखेर तो पोपटाची मानगुट जोरात पिरगाळतो... त्याबरोबर साधूचीही मान पिरगळली जाऊन तो मरून जातो.

मानसशास्त्रज्ञ सांगतात त्याप्रमाणे काही लोकांना झाडांसबंधी स्वप्ने पडतात. या स्वप्नांचे विशेष म्हणजे त्यांत स्वप्न पाहणाऱ्या माणसावर संकट येते आणि त्याप्रसंगी झाड त्याला आपल्यात सामावून (लपवून) घेऊन त्याचे रक्षण करते. अशा स्वप्नात तो माणूस इतरांना बघू शकतो; परंतु त्याला कोणी बघू शकत नाही. माझ्या मते अशी स्वप्ने पडणे हे हजारो वर्षांपूर्वी मानवी मनात झाडांसंबंधी रुजलेली आप्तसंबंधाची धारणा आजही लोकमानसात जीवंत आहे याचे द्योतक आहे.

माणसाचा प्राण सजीव-निर्जीव वस्तूंत असतो या कल्पनाबंधातून लोकमानसाने, मानव आणि पृथ्वीतलावरील विविध घटक यांचे संबंध प्रस्थापित केलेले आहेत.



२२.

# स्वरक्षणार्थ रुपांतर

काही विशिष्ट माणसांचा आत्मा सजीव अथवा निर्जीव वस्तूंत वास करतो किंवा त्यांचे मरण सजीव अथवा निर्जीव वस्तूंत असते या कल्पनाबंधाबरोबरच मानवाचे रुपांतर सजीव अथवा निर्जीव वस्तूंत होऊ शकते, असे कल्पनाबंधही कित्येक लोककथांत सापडतात. खरे तर समाज मनावर पकड असलेल्या लोकधारणेतूनच त्यांचा समावेश लोककथांनी झालेला आहे. विलक्षण आणि अद्भूत भासणारा हा कल्पनाबंध जागतिक स्तरावर तसाच देशी स्तरावरही सापडतो. संपूर्ण मानवी समाज एकेकाळी, एकाच विचारधारणेत जगत होता याचे हे प्रमाण.

आज सापडणाऱ्या लोककथांची निर्मिती मानवाच्या बऱ्याच प्रमाणात विकसित झालेल्या मानसिक अवस्थेच्या पथावर झालेली आहे हे खरे. मात्र या धारणेचा उगम त्याच्या प्राथमिक अवस्थेत झालेला दिसतो. प्रागइतिहासकाळी पृथ्वीवरील उत्पात आणि आपत्तींनी त्रस्त झालेला आणि सर्व घटनांच्या मागे एक अचाट-अदृश्य शक्तींचा हात आहे अशा समजुतीने जगणाऱ्या मानवाला आपल्यापेक्षा पृथ्वीतलावरील झाडे, प्राणी, पक्षी, पर्वत, नद्या इत्यादींमध्ये या उत्पात-आपत्तीत तगून उरण्याची जास्त क्षमता जाणवली. मग आपल्या संकटप्रसंगी त्यांनी त्या घटकांना आपल्या रक्षणार्थ आवाहन केले आणि त्यांची शक्ती आपल्याला प्रदान करण्याची विनंती केली. नंतर त्या शक्ती आपल्या शरीरात येण्याचे अथवा संचारण्याचे एक यातूतंत्र म्हणून त्यांनी त्यांचेच नकली रुप धारण केले. उदा. ज्या जनावराचे आवाहन केले, त्याचे कातडे पांघरले

किंवा शिंगे डोक्यावर बांधली, त्याच्यासारका आवाज काढला.



चंद्रनाथ पर्वतावरील ओंडो
(पारोडा–केपे, १९९०)

ज्या निर्जीव वस्तूंमध्ये माणसाचे रुपांतर होते, त्यात 'दगड' अथवा 'शिळा' हा कल्पनाबंध प्रमुख दिसतो. आदिम काळी ज्या वेळी लोक एका जागेवरून (खासकरून घनदाट अरण्यातून) दुसऱ्या जागी जायचे त्या वेळी बरोबर दगड घेऊन जायचे, म्हणजे स्वतःचे रुपांतर दगडात कल्पित करून जायचे. इच्छित स्थळी पोहोचल्यावर तो दगड अथवा ते दगड त्या सीमेवर टाकायचे. फ्रेझरनी आपल्या 'द गोल्डन बाव' या पुस्तकात तिमोर बेटावरील उत्तर जिल्ह्यात प्रचलित अशा एका प्रथेचे उदाहरण दिलेले आहे. (The New Golden Bough, pg. 591) येथील स्त्री–पुरुष एका जागेवरून दुसऱ्या जागेवर जाताना स्वतःभोवती लहान लहान दगडांची जाळी गुंडाळतात. आपल्या नियोजित स्थळी सुखरुप पोहोचल्यावर एका जागी, म्हणजे त्यांच्या पूर्वजांनी त्या आधी टाकलेल्या दगडांच्या ढिगावर आपलेही दगड टाकतात आणि पुढे जातात. या लोकांमध्ये दगडाऐवजी झाडाच्या डहाळ्याही बांधायची प्रथा आहे.

बाबर आर्किपिलेगो हे लोक याच भावनेने प्रभावित होऊन अंगाला दगड घासतात आणि बांधतातही. या कृतीमुळे आपल्याला 'दगडत्व' (बळकटपणा) प्राप्त होते, असा त्यांच्यामध्ये समज आहे.

अशी प्रथा एकेकाळी गोमंत भूमीतही प्रचलित होती आणि येथील भूमीवरील लोकही या आदिम विचार धारणेने प्रेरित झाले होते, असा निष्कर्ष काढता येण्याजोगी दोन उदाहरणे मला माझ्याच गावात सापडलेली आहेत. माझा आमोणे गाव आणि शेजारचा शेल्डे गाव यांच्या सीमेवर, जिथे आज

केपेचे सरकारी महाविद्यालय आहे, त्याच्या नजिक आमची शेतजमीन आहे. या शेतीच्या एका भागाला 'रावळागाळ' असे नाव आहे. तिथे मरड शेतीच्या कुणग्यांजवळ असलेल्या एका झाडाखाली आमच्या गावाहून पायी शेल्डेला जाण्याची वाट होती. त्या वाटेवरून जाणारे लोक असेच दगड अथवा झाडाच्या डहाळ्या टाकायचे. त्या झाडाखाली लहान लहान दगडांचा मोठा ढीग झाला होता. या जागेला (ढिगाला) ग्रामस्थ 'ओंडो' अथवा 'आंवड' म्हणायचे. ओंड्याविषयी आदराची भावना लोकांच्या मनात होती. 'ही देवाची जागा, आपल्या गावाहून दुसऱ्या गावी जाणारे आपल्याला सुखरुप गावात परत आणावे म्हणून तिथून जाताना एक दगड किंवा डहाळी देवाला अर्पण करतात, अशी माहिती मला आजोबांनी दिलेली.

साधारणपणे पंचवीस वर्षांआधी सुद्धा हा ओंडा आणि ती प्रथा अस्तित्त्वात होती. आता कदाचित तिथे काहीही नसेल, कारण मी गेली पंचवीस वर्षे तिथे गेलेली नाही. आज तेथील बऱ्याच शेतजमिनी, मरड जमिनी आता वसाहतीत–प्लॉटांत रुपांतरित झालेल्या आहेत. त्यात या ओंड्याचे सुद्धा अस्तित्त्व कदाचित हरवले असण्याची शक्यता आहे.

असाच एक 'ओंडा' चंद्रनाथ पर्वतावर सुद्धा आहे. (अजून आहे की नाही याची मला पक्की माहिती नाही) १९९२–९३ साली 'आमोणे–एक लोक जीण' ग्रंथाच्या निमित्ताने गावचे आणि परिसर देवतांचे सर्वेक्षण करताना तो मला सापडला. त्याचा फोटो मी या पुस्तकात दिलेला आहे. 'स्वतःचे रुपांतर अपेक्षित वस्तूंत करून, त्या वस्तूंच्या माध्यमातून स्वतःचे रक्षण करणे' ही आदिमांची या प्रथेमागची धारणा कालप्रवाहात बाजूला पडून स्वतःचे रक्षण करण्याच्या उद्देशाने अदृश्य अशा दैवी शक्तीला वस्तू वाहण्याची प्रथा इतकाच भाव या ओंड्यांची माहिती माझ्यापर्यंत पोहोचता पोहोचता रुजला गेला असावा.

कोकणी भाषेत अथवा लोककथांत 'सैमा गेलो' असा वाक्प्रचार सापडतो. येथे 'सैमा गेलो' म्हणताना तो माणूस कुणाच्या तरी शापामुळे अथवा जादुमुळे जिथे आहे तिथेच दगडात रुपांतर होतो, असा अर्थ सापडतो. कोकणीत 'सैम' म्हणजे निसर्ग. येथे निसर्गातील एक घटक असलेल्या दगडात शापिताचे रुपांतर होते. आदिम काळी कोकणी माणसाने निसर्गाशी जुळवलेले आपले नाते या

वाक्प्रचारातूनही अधोरेखित केलेले आहे.

आदिमांनी स्वरक्षणार्थ उपयोजिलेले 'रुपांतर' तंत्र लोककथांत कल्पनाबंधांच्या स्वरुपात समाविष्ट होता होता त्याला दोन हेतू प्राप्त झाले. एक सुष्ट आणि दुसरा दुष्ट. सुष्ट हेतूत हे रुपांतर स्वरक्षणार्थ अथवा दुसऱ्याच्या रक्षणार्थ झालेले दिसते, तर दुष्ट हेतूत ते दुसऱ्याच्या वाईटात आणि स्वतःच्या स्वार्थासाठी केलेले दिसते. ही रुपांतरे क्षणिक तसेच कायमस्वरुपी, दोन्हीही प्रकारची दिसतात. क्षणिक रुपांतरात पूर्वरुपात येण्याचा तोडगा असतो. सर्वसामान्यपणे ही रुपांतरे एखादा जादुगार किंवा गूढ व यात्विक शक्ती अवगत असलेला माणूस करतो. कित्येकदा एखादी अतिमानवी शक्ती आपल्या निर्बंधित क्षेत्रात प्रवेश करण्याची शिक्षा म्हणून मानवी स्त्री-पुरुषांचे रुपांतर करते. एखादा मंत्र म्हणून अथवा मंतरलेले पाणी शिंपडून त्यांचे पूर्वरुप प्राप्त होते. कोकणी लोककथा भांडारातील 'सोनेरी झाड, गाणारे पाणी आणि छप्पन भाषा बोलणारा पोपट' हे कथेत आपल्या क्षेत्रात प्रवेश केल्या कारणास्तव स्त्री-पुरुषांचे दगडात रुपांतर केलेल्याचे कथानक सापडते.



२३.

# पावसाचे स्त्रीशी नाते

निसर्गातील अनेक घटनांच्या निर्मिती प्रक्रियेविषयी अनभिज्ञ असलेला माणूस आदिमकाळी पावसाच्या निर्मिती प्रक्रियेविषयी सुद्धा अनभिज्ञ होता. पाऊस ही अचाट-अदृश्य शक्तीची किमया आहे, अशी त्याची धारणा होती. त्याचबरोबर पृथ्वीतलावरील जीवसृष्टीच्या जीवनातील त्याचे महत्त्वही त्याला ज्ञात होते. पाऊस पडला नाही तर पृथ्वीवरील सर्व जीवसृष्टीचा निःपात होईल, त्याच्या सोबत आपले जीवन पण नष्ट होऊन जाईल हे पण सत्य त्याने जाणले होते. म्हणूनच पाऊस वेळेच्या वेळी पडावा यासाठी त्याने त्या अदृश्य शक्तीची करुणा भाकली. अतिवृष्टी होऊन अथवा अल्पवृष्टी होऊन सर्व जीवन उद्ध्वस्त होऊ नये म्हणून त्याला नियंत्रित करण्यासाठी तऱ्हेकवार यंत्रे रचली.

गूढशक्ती आणि यातुविद्या यांच्या प्रभावाखाली असणारा हा मानवी जीवनाचा कालखंड. या काळात मानवाने इतर शक्ती आणि घटनांप्रमाणे पावसाला सुद्धा वश करण्यासाठी, नियंत्रित करण्यासाठी यातुतंत्राचा उपयोग केला. यातील कित्येक यातुतंत्रे आज प्रथा-परंपरांचे रुप घेऊन अवशेष रुपाने जिवंत असलेली दिसतात.

अप्रगत अवस्थेत जीवन जगणाऱ्या मानवाच्या बौद्धिक विकासाबरोबर त्याच्या विचारधारणांतही बदल घडत गेले. पाऊस ही जगातील कोणा अदृश्य शक्तीची निर्मिती, ही शक्ती ज्या वेळी प्रसन्न असते तेव्हा प्रमाणबद्ध स्वरुपात वर्षावृष्टी करते, जेव्हा ती अप्रसन्न-कोपिष्ट असते तेव्हा एक तर अतिवृष्टी करते, वादळ-तुफान आणते किंवा ती अल्पवृष्टी करते अथवा वृष्टी



**स्त्रीच्या गर्भधारणेत पावसाला महत्त्व असते अशी धारणा होती.**

करीतच नाही. या धारणेबरोबरच पाऊस हे 'पुरुषत्व', आकाशाच्या शक्तीचे (देवाचे) ते वीर्य (रेत), अशीही धारणा मानवी मानसात आकाराला आली.

पृथ्वी आणि स्त्री यांच्या निर्मिती प्रक्रियेत ज्या काळी मानवाला साधर्म्य जाणवले, त्याच काळी पाऊस हे पुरुषत्त्व, ते आकाशीच्या शक्तीचे वीर्य ही धारणा उदयाला आली. यातूनच पुढे पावसाला वश करण्यासाठी केलेल्या यातुकर्मांनी स्त्रीला महत्त्वाची भूमिका देण्यात आली. तसेच स्त्रीच्या गर्भधारणेसाठी सुद्धा तिने पावसात भिजायला हवे या समजाचा उगम झाला. स्त्रीच्या शरीरावर पावसाने केलेल्या अथवा झालेल्या जलसिंचनामुळे तिच्या उदरात गर्भ रुजतो असा समज आदिम काळी जगात रुढ होता, याचे संदर्भ सापडतात. उदा : बुशमॅन स्त्रिया आणि मुली पावसाची सर आली म्हणजे धावत जाऊन कुठं तरी आसरा घेतात. कारण धरतीच्या कुशीत गर्भधारणा करणारा पाऊस त्यांच्याही कुशीत गर्भ रुजवेल अशी त्यांना भीती असते. होटेन्टोट स्त्रियांमध्ये असा समज आहे की, पावसात नग्न होऊन एकदा तरी भिजल्याशिवाय त्यांना मूल होणे अशक्यप्राय आहे. (लोकायत स. रा. गाडगीळ, पृ. ८८). पावसाला पुरुषत्त्व मानणाऱ्या आदिम माणसाने त्याला वश करण्यासाठी, म्हणजे पाऊस येण्यासाठी जी यातुतंत्रे केली त्यात मुख्यतः स्त्रीच्या नग्नतेचा वापर केला आणि स्त्रीने जी कर्मे केली ती प्रामुख्याने नग्न होऊनच केली. क्रूक या विद्वानाने आपल्या The Folklore of North India या ग्रंथात या नग्नतेचे स्पष्टीकरण करताना म्हटले आहे की, देवता अशिष्ट कृतींना भितात अथवा जननेंद्रियांना भितात म्हणून ही कृती केली जाते. (लोकसाहित्याचे अंतःप्रवाह- पृ. १६८) माझ्या मते यामागे, पाऊस हा पुरुषत्त्व अथवा पौरुषरुप असल्याची धारणा कारण आहे. या धारणेप्रमाणे स्त्रीचे नग्न शरीर बघून त्याच्या ठायी आसक्ती निर्माण होते आणि तिच्याशी रत होऊन

तिच्या उदरात गर्भधारणा करण्यासाठी तो अधिरतेने धावत येतो.

प्राचीन काळी जगातील विविध भागात अशा प्रथा अस्तित्वात होत्या. उदा. अवर्षण दूर होऊन भरपूर पाऊस पडावा म्हणून अलास्का येथील स्त्रिया आणि मुली विवस्त्र होऊन गावच्या सीमेपर्यंत जातात आणि पाणी शिंपडतात. न्यू गिनीमध्ये स्त्रिया विवस्त्र होऊन पाण्याची चूळ आकाशात फेकत पावसाची नक्कल करतात. सर्व्हियामध्ये एक मुलगी (ग्रामस्थानी ठरवलेली) अशा काळी विवस्त्र होऊन व फुलांचा पोषाख करून गावातील प्रत्येक घरासमोर नृत्य करते व पाणी मागते. मग घरातील स्त्रिया तिच्या अंगावर पाणी टाकून तिला ओली करतात. ह्याटोन लोकही पाऊस पडावा म्हणून नग्न मुलींच्या अंगावर पाणी शिंपडतात. (लोकसाहित्याचे अंतप्रवाह पृ. १६८-१६९). भारतात, महाराष्ट्रातील मराठवाड्यात मुलींनी नग्न होऊन अंगाला निंबाच्या डहाळ्या बांधून नाचण्याची प्रथा आहे. येथे स्त्रियांनी नग्न होऊन रात्रीचा पाऊस मागत रस्त्यावरून कर्कश आवाजात ओरडत फिरण्याचीही प्रथा आहे. ह्या स्त्रियांच्या अंगावर पुरुष लोक पाणी ओततात.

एकोणीसाव्या शतकात सुद्धा अशा प्रथा भारतात प्रचलित होत्या याची नोंद मिळते. १८६३-६४ साली महाराष्ट्रातील गोरखपूर विभागात दुष्काळ पडला होता, तेव्हा पाऊस पडावा म्हणून तेथील स्त्रियांनी रात्रीच्या वेळी नग्न होऊन नांगरणी केल्याची नोंद मिळते. तसेच १८९२ साली मिर्झापूर जिल्ह्यात असाच एक विधी केला. येथे तीन शेतकऱ्यांच्या स्त्रियांनी नागव्याने शेतात बैल बनून आणि शेतकरी बनून नांगरणी केली आहे. (लोकसाहित्याचे अंतः प्रवाह-पृ. १६८).

पावसाकडे स्त्रीच्या नग्नतेचा संबंध जोडण्याच्या प्रथेची समाजमनावर अजूनही पकड आहे, हे स्पष्ट करणारे एक उदाहरण म्हणजे गेल्या वर्षी माझ्या वाचनात आलेली एक बातमी. महाराष्ट्रातील एका गावात एका मुलीची हत्या करून तिचे नग्न प्रेत शेतात पुरले गेले. यामागे, पावसासाठी तिचा शेतात बळी देण्याचे उद्दिष्ट असावे, असा संशय व्यक्त केला होता.

ही बातमी वाचल्यावर एक गोष्ट स्पष्ट होते ती म्हणजे स्त्रीकडून पावसासाठी प्रत्यक्ष कृती जरी येथे करून घेतली नाही तरी स्त्रीचा वापर येथे केलेला आहे.

गोव्यात मात्र आज अशा प्रथा प्रचलित असल्याची माहिती मला तरी

सापडलेली नाही, परंतु पावसाच्या आराधनेत स्त्रीचा सहभाग दाखवणारी एक परंपरा सुमारे ६०-७० वर्षांआधी गोव्यात, तीही ख्रिस्ती समाजामध्ये असल्याची माहिती मिळाली, ती अशी :

सासष्टी-तिसवाडी तालुक्यांत पाऊस येण्यास उशिर झाला तर गावच्या स्त्रिया 'सांत आंतोन' देवाच्या नावे एक दगड दालीत (बांबूची लहान टोकरी) ठेवून, ती दाली डोक्यावर घेऊन (प्रमुख स्त्री घेते) 'ओरेसांव' (प्रार्थना गीत) म्हणत गावच्या रस्त्यावरून फेरी काढतात. या वेळी 'सांत आंतोन पावस घाल, पावस घाल!' म्हणत गीते गायली जातात. (बघा : आमोणें : एक लोकजीण; पृ. १३०-१३१)

या प्रथेत पावसाशी स्त्रीचा संबंध तर दिसतोच, त्याचबरोबर दगडाचा पण दिसतो. जगातील आदिम संस्कृतींनी स्त्रीशिवाय बेडूक, साप, सरडा, कुत्रा, मोर ही जनावरे, तसेच दगडाचा संबंध पावसाशी लावलेला आहे आणि त्यांना पाऊस मागण्याचे साधन मानलेले आहे. पावसाच्या विधींनी दगडाला पाण्यात बुडवून ठेवण्याचीही प्रथा आहे. सांत आंतोनच्या मिरवणुकीच्या प्रथेत दगडाचा सहभाग अभ्यासाच्या दृष्टीने विचार करण्या सारखा आहे.

पाऊस स्त्रीचे पाणीग्रहण करतो ही आदिमाची कल्पना कोकणी लोकमानसातही पोहोचली होती, याचे प्रमाण देणारी एक लोककथा मला गोव्यात सापडलेली आहे. 'पावस घोव' नावाची ही कथा माझ्या 'गांवरान' या लोककथा संग्रहात समाविष्ट आहे. या कथेत पाऊस तऱ्हेकवार क्लृप्त्या करून 'गावड्याच्या' (शेतकऱ्याच्या) मुलीशी लग्न करतो आणि तिचा नवरा बनतो. माझ्या मते या कथेत बरेच मोठे सांस्कृतिक गुपित दडलेले आहे.



२४.

# शुभ-अशुभ संकेतांचे वाहक

निसर्ग धर्म मानणाऱ्या आदिम माणसाचे जीवन व्यवहार, निसर्गातील सजीव-निर्जीव, दोन्हीही घटकांशी जुळलेले होते. या घटकांमध्ये घडणारे बदल आणि परिवर्तन यावर तो आपले दैनंदिन व्यवहार नियंत्रित करीत होता. या घटकांच्या बदलामुळे अथवा वागण्यामुळे त्याला काही गूढ संकेत मिळत होते. तसेच या घटकांच्या मध्ये घडणारे बदल अथवा वागण्याला अनुसरून त्याने काही परिणामांची कल्पना केली होती, यातूनच या घटकांशी निगडित काही धारणांचा जन्म झाला. तसेच काही पशुपक्षी या गूढ संकेतांचे वाहक म्हणून मान्यता पावले. हे संकेत शुभ आणि अशुभ या दोहीही प्रकारचे असले तरी प्रामुख्याने ते एखाद्या संकटाचे, आपत्तीचे किंवा कुटुंबात होणाऱ्या मयताचे संकेत असायचे.

भारतीय लोकमानसाने ज्या पशुपक्ष्यांना शुभ-अशुभाचे संकेत वाहक म्हणून मानलेले आहे त्यामध्ये 'कावळा' हा पक्षी प्रमुख दिसतो. त्याच्या विषयीची ही धारणा अतिप्राचिन असून आर्य आणि अनार्य दोन्हीही संस्कृतीत ती प्रचलित असल्याचे संदर्भ सापडतात.

कावळ्यासंबंधाची ही धारणा आदिम काळीच लोकमानसात रुजलेली आहे. असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. कारण या काळी मानवाने पशुपक्ष्यांशी आपले दृढ नाते मनात रुजवून घेतले होते. 'कावळा हा आपला पूर्वज. तो कावळ्याच्या रुपाने पिंड न्यायला येतो' ही धारणा भारतात सर्वत्र आहे.

भारतीय समाजात आणि पर्यायाने कोकणी समाजात एखादा माणूस मेल्यावर त्याला चौऱ्याऐंशी सहस्र योनीत फिरल्यावर पुन्हा मानव जन्म मिळतो, अशी धारणा आहे. या जन्मातील 'कावळा' हा पहिला जन्म. म्हणजे माणूस मेल्यावर त्याचा आत्मा कावळ्याच्या रुपाने पहिला जन्म घेतो आणि या दृष्टीने कावळा हा त्या माणसाच्या कुटुंबाचा पूर्वज. एका बाजूने ही धारणा आहे, तर दुसऱ्या बाजूने मेलेल्या माणसाच्या वंशजाने (पुत्राने वगैरे) दिलेला पिंड कावळ्याने खाल्ल्यावर त्या माणसाच्या आत्म्याला मुक्ती मिळते (मोक्ष) आणि तो स्वर्गात जातो, अशीही धारणा आहे. या दोन्हीही धारणा प्रचलित असल्या तरी मेलेल्या माणसाच्या नावाने वर्षानुवर्षे पिंडदान केले जात असल्याचेही चित्र समाजात दिसते.



**लोकमानसाने कावळ्याला शुभ–अशुभाच्या संकेताचे वाहक मानलेले आहे.**

कावळा हा शुभ आणि अशुभाचे संकेत देतो, असा समज आहे. कावळा एका विशिष्ट आवाजात रडला तर घरी पाहुणा येण्याचा तो संकेत असे मानले जाते. तो कर्कश आवाजात रडू लागला, तर काही तरी अशुभ घडणार असे मानले जाते.

कावळ्याकडे दुर्लभ असे सामर्थ्य आणि भविष्यकालीन गोष्टीविषयी आगावू सूचना देण्याची पात्रता आहे, ही धारणा फक्त कोकणी लोकमानसातच नव्हे तर सर्वत्र आहे. (भारतीय संस्कृती कोश खंड–२, पृ. ३१५) कावळ्याविषयीच्या या धारणेत किती तथ्य आहे हे सांगता येत नाही, परंतु कावळा विशिष्ट आवाजात रडला तर पाहुणा अथवा आपला प्रिय माणूस येतो याची प्रचिती कित्येकांना आलेली सांगतात. 'कावळ्या कावळ्या माझी अमूक किंवा माझा अमूक येणार असेल तर उडून जा, नाही तर बुडून मर!' अशी लोकोक्ती आजही गावातल्या मुलांच्या तोंडी ऐकू येते. मुलेच कशाला, वयस्क माणसेसुद्धा कावळा रडू लागला की 'आज कोण तरी पाहुणा येणार!' म्हणून नकळत वाट

बघू लागतात आणि मजेची गोष्ट अशी की कित्येकदा त्यांच्याकडे कुणीतरी पाहुणे येतात सुद्धा.

कावळ्याला शुभ आणि अशुभ शकुन म्हणून जसा मानलेला दिसतो तसाच त्याला पवित्र आणि अपवित्रसुद्धा मानलेला दिसतो. 'पूर्वज' म्हणून त्याला पवित्र मानतात, श्राद्ध अथवा शुभकार्यप्रसंगी त्याने पिंडाला अथवा अन्नाला स्पर्श करणे अत्यावश्यक मानले जाते, परंतु त्याचा प्रत्यक्ष स्पर्श मात्र अपवित्र आणि अपशकूनी मानला जातो. घरडुक्कर (माणसाची विष्टा खातो म्हणून) हे एक जनावर सोडून कावळ्याखेरीज कोणत्याही जनावर अथवा पक्ष्याला अपवित्र मानलेले दिसत नाही, त्यांनी शिवल्याने विटाळ होतो असे मानले जात नाही, मग कावळाच का? असा प्रश्न उठतो. माझ्या मते या मागचे कारण म्हणजे, कावळा हा मेलेल्या माणसाचे रुप असा समज असल्याने (मेलेला माणूस कावळ्याच्या रुपाने येतो, असा समज असल्याने) त्याला स्पर्श झाला तर आपणही प्रभावित होऊन, त्याच्या जगात जाऊ किंवा तो आपल्याला ओढून त्या मृत्यू जगात घेऊन जाईल' ही भीती लोकमानसाने कदाचित मनात बाळगलेली असावी.

कावळ्याला अपवित्र मानणारी आणखी एक धारणा समाजमनात रूढ आहे, ती म्हणजे 'स्त्रियांना कावळा शिवणे'. पूर्वीच्या काळी स्त्रिया ऋतुमती झाल्या म्हणजे त्यांना 'कावळा शिवला' म्हणायची पद्धत होती आणि पाच दिवसपर्यंत त्यांचा विटाळ मानला जायचा.

लोकमानसाने कावळ्याशी जोडलेला स्त्रीसंबंध हा काही सहज नाही, त्यामागे काही तरी गूढ रूढ आहे, मात्र तूर्तास त्याची उकल होत नाही. कावळ्यामध्ये दोन जाती सापडतात. लोकभाषेत एकाला 'घरकावळा', तर दुसऱ्याला 'डोंबकावळा' म्हणतात. घरकावळा गावच्या आसपास रेंगाळतो. तो आकाराने लहान, तर डोंबकावळा कधीमधी चुकून गावात दिसतो. तो आकाराने मोठा, त्याचा आवाजही जास्त कर्कश आणि रंग गडद काळा. घर कावळ्यापेक्षा तो जास्त अपशकूनी आणि अपवित्र असतो असे मानतात. त्याचा गावात प्रवेशच अपशकूनी मानला जातो. तो फक्त अपशकूनाचे संकेत देतो, असा समज आहे.

यासंबंधी एक सत्य घटना येथे मुद्दाम सांगाविशी वाटते. २००७ ची गोष्ट.

कसा कोण जाणे एक डोंबकावळा आमच्या गावात प्रकट झाला आणि त्याने एकदम उच्छादच मांडला. तो गावातील घरा-घराच्या 'पाडसावर' (छतावर) जाऊन कर्कश आवाजात ओरडायचा आणि उजेडासाठी घातलेल्या आरशांवर टकटक करीत चोच मारायचा. (गावातील बहुतेक घरे कौलारू होती) त्याने चोची मारून कितीतरी घरांचे आरसे फोडले.

असे पहिल्यांदाच गावात घडले होते. गावचे लोक, हा कसला अपशकून? या विचाराने घाबरून गेले होते. कावळ्याला कितीही पिटाळून लावला तरी तो जात नव्हता. गेला तरी दुसऱ्या दिवशी परत येत होता. जवळ जवळ दोन महिने हे प्रकरण चालले होते. कावळ्याच्या या विचित्र वागण्यामुळे गावची वडील-जाणती माणसे विचारात पडली होती, काही तरी वाईटाचे-संकटाचे हे संकेत म्हणून घाबरली होती. आणि मग गावात त्या दोन महिन्यांत लागोपाठ सात मयते झाली. त्यामुळे कावळ्याचा संकेत खरा होता, असा गावकऱ्यांचा समज दृढ झाला. काही दिवसांनी तो कावळा आपणहून नाहीसा झाला. आजतागायत गावात अशी घटना परत घडली नाही.

माझ्या या माहितीमुळे कुणी मी अंधश्रद्धेला ऊर्जा देते, असा समज करून घेऊ नये. मी फक्त घडलेली घटना येथे नमूद केलेली आहे. गावातील ही मयते हा योगायोगही असेल, परंतु त्या कावळ्याचे विचित्र वागणे हे सत्य होते आणि सर्वसामान्यांना कोड्यात टाकणारे होते. हिंदू समाजात घरात शुभकार्य असते तेव्हा अथवा देवकार्य, श्राद्धकार्य इत्यादि दिवशी कावळ्याला 'काकावळ' (जेवणाचे पान) घालण्याची परंपरा आहे. या काकावळीचे संदर्भ 'बनवड' सारख्या आदिम लोककाव्यात सापडतात. कावळ्याने 'काकावळ' खाल्ली म्हणजे पूर्वज तृप्त झाले असा समज आहे. गोव्यात कावळ्यासारखा घुबड हा पक्षी संकेतवाहक मानतात. मात्र घुबड फक्त अशुभाचे संकेत देतो, तो रडू लागला म्हणजे गावात अथवा ज्या घराशेजारी तो रडतो त्या घरात काही तरी वाईट होते, असा समज आहे.

'भालू' गावात येऊन रडायला लागली म्हणजे सुद्धा गावात काही तर वाईट होणार असे मानतात. खरे तर, भालू म्हणजे कोल्ह्यांची मादी (कोल्ही). प्रजनन काळी ती आर्ततेने नराला साद घालीत फिरते अशी मला एका प्राणीमित्राने माहिती दिलेली आहे. ही माहिती सत्य आणि वैज्ञानिक असली तरी भालूच्या रडण्याला मात्र लोकमानसाने अशुभ मानलेले आहे. ●●●

२५.

# पूर्वसंकेत :
# मानव आणि सुष्ट शक्तींमधील गूढभाषा

आपली वन्य अवस्था पार करून मानव ज्या वेळी एका जागी स्थिर झाला, त्या काळात जीवन–मृत्यूसंबंधी कित्येक समजुती त्याच्या मनात रुजल्या गेल्या. या काळी मानवाचा मानसिक विकास तसा प्राथमिक अवस्थेतच होता. जीवन आणि जगासंबंधी त्याचे ज्ञान मर्यादितच होते. आजच्या विज्ञानाने ज्ञात झालेल्या कित्येक गोष्टींपासून तो अनभिज्ञ होता. कित्येक गोष्टींचे त्याला गूढ कायमच होते. अदृश्य शक्ती आणि यातुविद्या यांच्या प्रभावाने त्याचे जीवन व्यापलेले होते. याच काळी 'नियती', 'विधिलिखित', 'पूर्वसंचित', 'पुनर्जन्म', 'स्वर्ग–नरक', 'मोक्ष–मुक्ती' यासारख्या संकल्पना त्याच्या कल्पकतेतून आणि जन्म–मृत्यूसंबंधीच्या मनातील गूढभयातून निर्माण झाल्या.

मानवाला सर्वात जास्त भय होते (अजूनही आहे) ते मृत्यूचे. हा मृत्यू कसा येतो आणि कधी येतो हेच त्याला उमजत नव्हते. त्याचे पूर्ण जीवन मृत्यूच्या भयाने ग्रासलेले होते. मग हा मृत्यू टाळण्यासाठी अथवा त्याला दूर ठेवण्यासाठी त्याने काही तोडगे शोधले. या जगात वावरणाऱ्या काही अदृश्य शक्तींच्या प्रभावातून मृत्यू येतो अशी त्याची कल्पना झाली होती आणि त्या शक्तीला वश करून आपले जीवन तारण्यासाठी आणि वाढवण्यासाठीही त्याने काही उपाय ही शोधले.

जगात जशा दुष्ट शक्ती असतात तशा सुष्ट शक्ती पण असतात. या शक्तींची आराधना केली, त्यांना प्रसन्न करून घेतले तर त्या आपल्या संकटाला धावून येतात, आपल्यावरचे संकट दूर करतात, तसेच संकटाची आपल्याला पूर्वसूचना



**निसर्गातील घटक, घडणाऱ्या घटनांचे पूर्वसंकेत देतात अशी समजूत आहे.**

देऊन आपल्याला वेळीच सावध करतात. हे सावध करणे अथवा पूर्वसूचित करणे कधी स्वप्नात असते, तर कधी दृष्टांत असतो असा त्याचा दृढ समज होता. यातूनच अमूक अमूक स्वप्नात दिसले किंवा घडले तर अमूक अमूक घडेल, असा त्याने कयास बांधला होता. एका दृष्टीने शक्ती आणि मानव यांच्यातील ती गूढभाषा होती.

या सुष्ट शक्तींमध्ये त्याने आपल्या पूर्वजांचा तसेच निसर्गातील काही विशिष्ट घटकांचाही समावेश केला होता. पूर्वज आपल्या वारसांना कोणत्या ना कोणत्या रुपाने घेऊन, कोणत्या ना कोणत्या माध्यमांतून, त्याच्यावर येणाऱ्या संकटाची कल्पना देतात आणि वेळीच सावध करतात, त्यामुळे त्याच्या वारसाला त्यातून मार्ग काढण्याचा अवधी मिळतो, मार्ग काढता येतो, सावधगिरीने वागून जीवावर आलेले संकट लहानशा घात-पाताने निवारण करता येते, अशीही त्याची भावना होती.

निसर्गातील ज्या घटकांशी आपला जिव्हाळ्याचा संबंध आहे, ज्यांच्या सान्निध्यात आपण कित्येक वर्षे राहतो, तेही आपल्याला अशा पूर्वसूचना देऊन (खास करून नैसर्गिक आपत्तीविषयी) सावध करतात, असा त्याचा

समज होता. वातावरणात, हवामानात होणाऱ्या बदलांविषयी, येणाऱ्या नैसर्गिक आपत्तींविषयी पशू-पक्षी, जनावरे, जीव-जंतू, त्याचबरोबर वनस्पतीवर्ग यांना आधी कल्पना येते आणि ते सतर्क होतात, या अवलोकनातून निसर्गातील घटकांकडून मिळणाऱ्या पूर्वसूचनांची किंवा संकेताची कल्पना उदयाला आली म्हटल्यास वावगे ठरणार नाही. तसेच पूर्वजांविषयीची श्रद्धा आणि प्रेम यातून, ते मृत्यू पावले तरी सदैव आपल्या 'सायेला' (मदतीला) असतात या विश्वासातून ते पूर्वसंकेत देतात ही संकल्पना जन्माला आली.

या विश्वात संचार करणाऱ्या अदृश्य शक्ती, पूर्वज आणि निसर्गातील सजीव-निर्जीव घटक अशा तीन शक्तींकडून मुख्यतः मानवाला पूर्वसंकेत मिळतात आणि ते शुभ आणि अशुभ दोन्हीही प्रसंगांचे-घटनांचे असतात अशी आदिमकाळी उदयाला आलेली लोकधारणा आजही लोकमानसावर प्रभाव घालून आहे. या धारणेला 'शकुन' असेही उल्लेखले जाते (शुभशकुन अथवा अपशकुन).

विज्ञानाने आज बहुतेक शकुनांना मिथ्य अथवा 'अंधश्रद्धा' ठरवलेले आहे. तरी पण हे शकुन आजही समाजात रुढ आहेत, हेही तेवढेच सत्य आहे. फक्त अशिक्षित अथवा अल्पशिक्षितच नाहीत; उच्चशिक्षितांमध्येही यांचा प्रभाव काही अंशी का असेना; परंतु असलेला दिसतो.

'शकुन' ही सार्वत्रिक संकल्पना, जगातील सर्व संस्कृतींत होती (आहे). तिच्या प्रगटीकरणात मात्र प्रदेशानुसार आणि मानवी समाज आणि समूहानुसार फरक दिसतो. या शकुनांचा प्रभाव समाजमनावर एकेकाळी किती खोल होता याचे प्रमाण आम्हाला 'लोककथा' या लोकवाङ्मय प्रकारातून प्रामुख्याने मिळते. कथेच्या नायक-नायिकेच्या अथवा अन्य पात्रांच्या जीवनात येणारे संकट अथवा अशुभ समाचारांचे, शुभ गोष्टींचे त्यांना विशिष्ट घटना अथवा घटकांद्वारे पूर्वसंकेत मिळालेले दिसतात.

कोकणी लोकसमाजात प्रचलित असलेले आणि कोकणी लोककथांनी सापडणारे काही पूर्वसंकेत असे :

**अशुभ (संकटाची सूचना देणारे) संकेत :**

१) घराच्या अंगणात अंगाऱ्याचा पाऊस पडणे किंवा अग्निवर्षाव होणे (व्यापाराला गेलेल्या व्यापाऱ्याच्या जहाजावर किंवा पर्यटनाला गेलेल्या

राजाच्या जहाजावर अंगाऱ्यांचा पाऊस पडणे.)

२) घरात ठेवलेल्या तलवारीला गंज येणे.

३) तुळशीवृंदावनातील तुळशीचे रोपटे सुकणे.

४) मुख्य उंबरठ्याला भेग पडणे.

५) दारात पांढरा कावळा येऊन नहाणे अथवा ओरडणे.

६) सुवासिनीच्या गळ्यातील मंगळसूत्र तुटून तिच्या ओटीत पडणे.

७) उंबरठा ओलांडताना ठेच लागून पडणे/ ठेच लागणे.

**शुभ (भविष्यात घडणाऱ्या शुभ घटनांची सूचना देणारे) संकेत :**

१) व्यापाराला गेलेल्या व्यापाऱ्याच्या अथवा पर्यटनाला गेलेल्या राजाच्या जहाजावर मोत्याचा पाऊस पडणे.

२) घरात अथवा अंगणात फुलपाखरू येणे.

३) घरात बेडकी येणे.

या शुभ अथवा अपशकुनांचे अवलोकन केल्यास एक गोष्ट स्पष्ट होते की या साऱ्या शकुनांत नमूद केलेल्या घटना नेहमीच्या व्यवहारापेक्षा विलक्षण आहेत, वेगळ्या आहेत. अपवादात्मक व विलक्षण घटनांचा आणि त्यानंतर प्रत्यक्ष जीवनात घडलेल्या घटनांचा योगायोगाने आलेला प्रत्यय निरखून आदिम लोकमानसाने या पूर्वसंकेतांची कल्पना निर्माण केलेली आहे.



२६.

# झाडांचे लग्न : स्त्रीत्व-पुरुषतत्त्व संयोग

स्त्रीच्या उदरातून नवजीव जन्माला येतो हे सत्य आदिम मानवाने जाणले होते आणि या काळी स्त्रीला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले होते. मात्र नवजीवनाची रचना स्त्रीच्या उदरात कशी होते याचे अतिशय आरंभीच्या काळी त्याला गूढ होते. यातूनच काही सूक्ष्म प्राणी वगैरेच्या सान्निध्यात राहिल्याने तेच तिच्या उदरात नवजीवाची रुजवण करतात अशी धारणा जन्माला आली.

या धारणेच्या प्रभावातून पुढे जाता जाता एक गोष्ट मानवाच्या लक्षात आली आणि ती म्हणजे नवजीवाच्या गर्भरूजवणेच्या कार्यात पुरुषाचीही महत्त्वाची भूमिका आहे आणि स्त्री-पुरुषाच्या संयोग अथवा समागमातून नवजीवाच्या गर्भाचे बीज स्त्रीच्या उदरात रुजते आणि पुढे त्याची वाढ होऊन यथाकाळ बाळरूपात ते स्त्री प्रसवते.

नवजीवाच्या जन्माच्या या रहस्याचा ठाव लागता क्षणी मानवाच्या जीवनात स्त्री-पुरुष संयोग अथवा समागमाला अत्यंत महत्त्व प्राप्त झाले. संयोग म्हणजे एक यात्विक कर्मच अशी त्याची भावना तयार झाली आणि सृजनाच्या अपेक्षेने केलेल्या विधींनी समागमाचा समावेश झाला. या काळी उघड्यावर, यात्विक कर्मस्थळी, सामूहिक पद्धतीनेही समागम केला जायचा आणि व्यक्तिगत आनंदापेक्षाही त्यामागे समूहाचा उत्कर्ष हीच भावना प्रमुख होती. अशा समागमाचे कोणालाही वावगे वाटत नव्हते.

या काळी जनन, भरण आणि रक्षण ही तीन मानवी जीवनाची प्रमुख उद्दिष्टे होती. आपल्या समागमातून जनन होते. नवजीवन जन्माला येतो. संततीप्राप्ती

होते हे जेवढे खरे तेवढेच या संततीचे, या नवजीवाचे भरण होणेही गरजेचे हे सत्य त्याने ताडले होते. हे भरण भूमाता करते, त्यासाठी ती सुजलाम्-सुफलाम् होणे महत्त्वाचे आहे. हेही त्याने जाणले होते. भूमाता सुजलाम्-सुफलाम् होणे म्हणजे ती फुलणे-फळणे. तिने नवांकूरांना जन्म देणे. ही प्रक्रियाही मानवी अथवा अन्य प्राणिमात्राच्या जन्मासारखीच. मानवी स्त्री आणि भूमाता यांच्या निर्मिती प्रक्रियेत साधर्म्य मानलेल्या आदिमानवाने भूमातेच्याही सुफलीकरण क्रियेत स्त्री-पुरुष तत्त्वाचा संयोग अतिशय गरजेचा मानला. यातूनच भूमातेच्या सुफलीकरणा संबंधित रचलेल्या यातूविधीत स्त्री-पुरुष तत्त्व संयोगाच्या कितीतरी प्रथा समाविष्ट केल्या गेल्या.



**'झाडांचे लग्न' हा एक आदिम लोकाचार.**

या प्रथांमधली एक महत्त्वाची आणि आजही उन्नयित समजल्या जाणाऱ्या संस्कृतीत अवशेष रूप प्रचलित असलेली एक प्रथा म्हणजे 'झाडांचे लग्न' किंवा 'झाडांचा विवाह विधी'.

झाड म्हणजे भूमातेचे जिवंत प्रतिक. झाड किंवा वनराज्ञीचे फुलणे-फळणे म्हणजे प्रत्यक्ष भूमाताच सुफल होणे या धारणेतून मानवाने, प्रामुख्याने स्त्री-पुरुष संयोग कर्मात झाडांचा विवाह लावला हे स्पष्ट आहे. येथे 'विवाह' अथवा 'लग्न' ही आजचा सुसंस्कृत अथवा पारिभाषिक शब्द आहे, जो या विषयाच्या विद्वानांनी माझ्या आधीही त्यांच्या लिखाणात वापरला आहे. आणि वाचकांच्या अथवा अभ्यासकांच्या सुविधेसाठी मीही तो घेतला आहे, परंतु या प्रथेमागची मूळची भावना स्त्रीतत्व - पुरुष तत्त्व संयोग ही आहे, हे मी येथे स्पष्ट करते.

'झाडांचे लग्न' ही आदिम लोकमानसातून उदयाला आलेली संकल्पना, जी हजारो वर्षांचा काळ तुडवीत आजही आपल्या सुधारित रूपात का असेना,

परंतु लोकसमाजात पोहोचलेली दिसते.

सार्वत्रिक सापडणारी ही प्रथा भारतातच नव्हे तर जगातील विविध संस्कृतीत अस्तित्वात होती आणि आहे याचे संदर्भ सापडतात. झाडांचा विवाह लावण्याची प्रथा आज तीन स्वरूपांत प्रचलित असलेली दिसते.

१. झाड-झाडाचे लग्न (म्हणजे एका झाडाचे दुसऱ्या झाडाबरोबर लग्न).
२. स्त्री-पुरुषाचे झाडांचा वेश परिधान करून केलेले प्रतीकात्मक लग्न.
३. झाडाबरोबर मानवी स्त्री अथवा पुरुषाचे लग्न.

यातील पहिला प्रकार हा मूळ असून बाकीचे दोन्हीही प्रकार नंतर जन्माला आलेले आहेत, असे दिसते.

झाडांच्या लग्न प्रथेसंबंधी फ्रेझरनी आपल्या 'द गोल्डन बाव'मध्ये सविस्तर विवेचन केलेले आहे आणि काही उदाहरणेही दिलेली आहेत. युरोपमध्ये अशी प्रथा असल्याची ते माहिती देतात, त्याचबरोबर हे लग्न जेवढे नैसर्गिकपणे होते तेवढेच सुफलीकरण यशस्वीपणे होऊन समृद्धी लाभते, अशी धारणा लोकसमाजात असल्याचेही सांगतात.

फ्रेझरनी भारतात प्रचलित असलेल्या झाडांच्या लग्न प्रथेविषयीसुद्धा संदर्भ दिलेले आहेत. ते लिहितात की हिंदूंमध्ये(भारतात) आंब्याच्या झाडाचे लग्न प्रामुख्याने चिंचेच्या झाडाशी लावले जाते.

झाडांच्या विवाह प्रथेमागे स्त्रीउल्लेखी आणि पुरुषउल्लेखी फळझाडांचा संयोग प्रमुखपणे अपेक्षित दिसतो. या संदर्भाने सुद्धा ते पुढील उदाहरण देतात. जर्मनीमध्ये ख्रिसमसच्या दिवशी दोन फळझाडे एकत्र बांधून ठेवण्याची आणि त्यांना नवदांपत्य उल्लेखण्याची प्रथा आहे. (The New Golden Bough; Pg. 110-111)

झाडाशी प्रतीकात्मक रितीने माणसांनी लग्न करण्याची प्रथा कित्येक देशांत आहे. उदाहरणार्थ व्हायट्युनटायड येथील युवक नवरदेवाचे कपडे घालून, अंगाला झाडांच्या डहाळ्या बांधून, तसेच तरुण मुली नवरीचा वेष करून, अंगाला पाने-फुले बांधून, डोक्याला फुलांचा गुच्छ बांधून एका विशिष्ट ठिकाणी जमतात. नंतर नवजोडप्याच्या अवतारात घरोघरी जाऊन भेटी घेतात. ज्या घरी ते भेट देतात, त्या घराची भरभराट होते, अशी धारणा आहे. ब्रुन्सविक येथील व्हेगम प्रदेशात अशीच प्रथा आहे. इथे 'मे' नावाच्या

झाडाचे लग्न लावतात. एक युवती मे झाडाचे रूप घेते. (The New Golden Bough; Pg. 110-112)

जागतिक विचारधारणांशी आपली नाळ जोडून असलेल्या भारतीय आणि पर्यायाने गोमंतकीय लोकसमाजातही आदिम काळी झाडांचे लग्न लावण्याची प्रथा प्रभावी होती असे म्हटल्यास चूक ठरणार नाही. ही प्रथा आज उन्नयित स्वरूपात किंवा अवशेष रूपात रूढ आहे.

हिंदू समाजात, खास करून गोमंतकात तुळशी विवाहाची प्रथा प्रचलित आहे. यामागे आज अनेक मिथक कथा सांगितल्या जातात. माझ्या मते या प्रथेच्या मुळाशी झाडांचे लग्न लावणे ही धारणा आहे. तुळशीच्या लग्नाच्या दिवशी तुळशीत जिथे तुळशीचे रोपटे (स्त्री प्रतीक) असते त्यांच्या सोबत ऊसकांडा (पुरुष प्रतीक) आणि आवळ्याची (पुरुष प्रतीक) व चिंचेची डहाळी (स्त्री प्रतीक) लावली जाते. या गोष्टीचा या दृष्टीने विचार करणे जरुरी आहे. तुळशीचे लग्न या ऊस, चिंच, आवळा यांच्या डहाळ्यांविना अपूर्ण असते ही गोष्टसुद्धा नोंद घेण्याजोगी आहे. येथे चार झाडे येतात, त्यातील तुळशीचे लग्न उसाशी आणि चिंचेचे आवळ्याशी, अशी मुळात दोन संयोगाची संकल्पना असावी, जी नंतरच्या काळात संयुक्त झाली असावी.

गोमंतकातील अहेव स्त्रिया श्रावणात करतात त्या रविवारच्या (आदित्य पूजन) व्रतामध्ये सुद्धा ही प्रथा दिसते. काही समाजात पूजेची पत्री दोन द्रोणांनी विभागून घालतात. एका द्रोणात 'स्त्री पत्री' (उदा. सीतेचे चंवर, सीतेची बोटे, दिवली इत्यादी) तर दुसऱ्या द्रोणांत 'पुरुष पत्री' (उदा. रामपाट, रामबोटां, इत्यादी) हे दोन्ही द्रोण पाटावर ठेवून त्यांची पारंपरिक पद्धतीने पूजा केली जाते. येथे या द्रोणांना 'नवरा-नवरी' (न्हवरो-व्हंकल) असे उल्लेखले जाते. प्रत्यक्ष झाडाशी मानवी लग्न 'जोगतिणी' करण्याच्या विधीत दिसते. येथे निमाच्या झाडाशी जोगतीण होणाऱ्या स्त्रीचे लग्न लावले जाते (होते). आज झाडाऐवजी जोगतीण बनणारी स्त्री अंगाला निमाच्या हडाळ्यापण बांधतानाही दिसते. प्रत्यक्ष झाडाशी करण्यात येणाऱ्या लग्नाचे एक बदललेले रूप म्हणून नवऱ्या-नवरीला मंगळ असेल तर त्याचे प्रत्यक्ष लग्न करण्याआधी झाडाशी लग्न लावले जाते या प्रथेचे उदाहरण घेता येते. स्त्रियांच्या संदर्भात ही प्रथा जास्त प्रचलित आहे.



## २७.
# नाग : आदिमांनी जाणलेले पौरुष प्रतीक

सृजनाच्या प्रक्रियेत स्त्रीबरोबर पुरुषाचासुद्धा सहभाग महत्त्वाचा आहे, हे सत्य उमगल्यावर आदिम मानवाने स्त्रीतत्वाबरोबरच पुरुषतत्त्वाच्याही आराधनेस सुरवात केली. भूदेवीच्या उदोउदोचा हा काळ. या काळी अप्रगत अवस्थेत, निसर्गाच्या सान्निध्यात राहाणाऱ्या मानवाने पृथ्वीतलावर वावरणाऱ्या प्राणीमात्रांत हे पुरुषतत्त्व शोधण्याचा प्रयत्न केला. या शोधात काही प्राणी, पक्ष्यांच्या प्रजनन शक्तीशी आणि क्रियेसी त्यांची तुलना केली, त्या दोघांमधले साधर्म्य जाणले आणि मग त्या प्राणी–पक्ष्यांना आपल्या जीवन व्यवहारात आणि सुफलीकरण विधीकर्मात महत्त्व दिले.

'नाग' किंवा 'सर्प' हा असाच एक जीवचर. त्याच्या लिंगसदृश्य आकृतीचे तसेच भूमातेकडील संबंधाचे आदिम मानवाला विलक्षण गूढ वाटले आणि त्याने भूमाता आणि नाग यांचा संबंध जुळवून टाकला. आदिम मानवाने स्वीकारलेला अथवा मानलेला हा सर्वात आदिम आदिबंध. आदिमांनी वारुळाला पृथ्वीची म्हणजे भूमातेची योनी मानले. (ही धारणा आजही लोकमानसावर प्रभाव टाकून आहे.) नाग वारुळात राहतो. (किंवा धरतीच्या बिळांत राहतो) नागाची वारुळात प्रवेश करण्याची क्रिया ही मानवी स्त्री–पुरुषांच्या समागम क्रियासदृश्य आहे, हे जाणून त्याने नागाला पुरुषत्त्व प्रतिक म्हणून महत्त्व दिले.

साऱ्या आदिम संस्कृतीत, जिथे जिथे भूमातेला महत्त्व दिलेले आहे, तिथे तिथे नागाला पुरुषदेव म्हणून महत्त्व प्राप्त झालेले आहे. ही धारणा फक्त भारतातच नव्हे, तर भारता बाहेरील मानव समूहांत ही प्रचलित होती, असे

संदर्भ रॉबर्ट ब्रिफोसारके विद्वान देतात. तसेच नागाच्या लिंगसदृश्य आकारामुळे त्याला लिंगरुप मानला गेला, या विधानालाही ते दुजोरा देतात. (लज्जागौरी पृ. १६३)

सृजनाच्या क्रियेत लिंगाचे महत्त्व जाणल्यानंतरची ही धारणा, पुढे अनेक लोकप्रथांच्या आधारे विस्तारीत होत गेली. भूमातेच्या सुफलीकरण विधींत नागाला आवाहन केले गेले. प्रत्यक्ष जीवंत नागाची अथवा त्याच्या प्रतिकृतीची पूजा केली गेली. मानवी स्त्रीच्या गर्भधारणेसाठीही नागाचे आवाहन होऊ लागले. नाग स्त्रीच्या उदरात गर्भाची रुजवण करतो, अशा धारणांनी आकार घेतला. यातूनच निःसंतान (वांझोट्या) स्त्रियांनी नागमूर्तीची अथवा नागकलेची पूजा करण्याची प्रथा जन्माला आली. नागपंचमीसारख्या सणांची निर्मिती झाली. नागव्रते-नागमंडळ नृत्ये रचली गेली.

'धालो' या कोकणी लोकसंस्कृतीतील स्त्रियांच्या अत्यंत प्राचिन अशा लोकोत्सवाचे उदाहरण मला येथे मुद्दाम द्यावेसे वाटते. या उत्सवाचे मूळ मातृप्रधान शेती अवस्थेत आहे. भूदेवीच्या सुफलीकरणाचा हा उत्सव. या उत्सवप्रसंगी गायिल्या जाणाऱ्या गीतांमध्ये मला काही उदाहरणे सापडली, ज्यांत नाग आणि 'रोयणी'चा (वारुळ) उघड संबंध सांगितलेला आहे.

याची दोन उदाहरणे पुढील प्रमाणे आहेत :

१. रोयणीच्या पेडा गे ते,
दुलई दोशी नाग गे ते, दुलई दोशी नाग
हाले तशे डुले गे ते, हाले तशे डुले
मस्तकी माणिक जळे गे ते,
मस्तकी माणिक जळे
(पेडणे-मांद्रे)

२. आत्ताळी रोयणी, पात्ताळी रोयणी
रोयणीर नाग डुले गे ते, रोयणीर नाग डुले
खांदाशी पेटारो, हाताशी शंख
शंखार नाग भुले गे बायी, शंखार नाग भुले
(आमोणे-केपे)



**जनन प्रक्रियेशी नागाचा संबंध सर्वत्र असतो ही धारणा जगभर सापडते.**

नागाचे महापुरुषत्त्व आदिमाने स्वीकारले, त्याचबरोबर त्याला अतिमानवी योनीचाही दर्जा दिला. नाग म्हणजे सामान्य जीवचर नाही, तो सामान्य मानवही नाही, तो अतिमानवी. त्याच्यामध्ये एक वेगळी अचाट शक्ती असते आणि या शक्तीमुळेच तो स्त्रीच्या उदरात गर्भधारणा करतो, अशी धारणाही या काळी जन्माला आली. यातूनच 'नागलोक' अथवा 'पाताळ लोक' अशा संकल्पनाही उदयाला आल्या. नाग हा पाताळ लोकात (नागलोकात) राहतो, तो पाहिजे तेव्हा मानवरुप धारण करतो, त्याचे आवाहन केल्यावर तो पृथ्वीलोकात येऊन, त्याचे आवाहन करणाऱ्या स्त्रीच्या उदरात गर्भधारणा करतो (मानवी रुप घेऊन) अशा कित्येक समजुती लोकमानसात रुढ झाल्या.

मानवी लोकमानसाच्या विकासाबरोबर 'अतिमानवी योनी' ही कल्पना मागे पडून नागाला दैवत्व प्राप्त झाले आणि त्याला मूर्तीरुपही मिळाले. नागनाथ, नागेश, नागार्जुन अशी तऱ्हेकवार नावे त्याला प्राप्त झाली. त्याच्या बिळाच्या जागी मंदिरे, देवालये उभी झाली. त्यांच्या लालख्या, पालख्या, मिरणुका निघू लागल्या.

नाग हा आपला पूर्वज आहे, अशी धारणाही समाजात जन्माला आली. मेल्यावर पूर्वज नागरुप घेऊन आपल्या संततीची आणि संपत्तीची राखण करतो, असा समजही रुढ झाला.

नाग हे पुरुषतत्व, या अनुषंगाने स्त्रीच्या जननप्रक्रियेशी नागाचा संबंध सर्वत्र सापडतो. त्यातील एक प्रमुख म्हणजे स्त्रीच्या मासिक पाळीशी नागाचा

जोडलेला संबंध. नागदंशाने स्त्रीला मासिक पाळी येते असा समज बऱ्याच लोकसमुहामध्ये सापडतो. दुसरा, गर्भवती स्त्रीची आणि नागाची दुष्टादृष्ट होता कामा नये हा. तसे झाले तर नागाची दृष्टी जाते आणि तो तिला शाप देतो; मात्र नंतर पुढे ती प्रसूत झाल्यावर तिच्या न्हाणीघराचा गंध अनुभवल्यावर त्याला पुन्हा डोळे येतात, असा समज आहे. गर्भवती असताना स्त्रीचा आणि पुरुषाचा संबंध निषिद्ध मानण्याच्या समजुतीतून या धारणेचा जन्म झालेला आहे, तसेच सर्व पुरुष हे नागाचे प्रतिनिधी आणि नाग हे पुरुषतत्त्वाचे प्रतिक असाच या समजुतीचा अर्थ होतो, असे मत यासंबंधी लोकसंस्कृतीचे ख्यातनाम अभ्यासक डॉ. रा.चिं.ढेरे आपल्या 'लज्जागौरी' या ग्रंथात नमूद करतात.

कोकणी समाजाता स्त्रीच्या मासिक पाळीशी नागासंबंधीत आणखी एक समज रुढ आहे, तो म्हणजे - स्त्रीच्या ऋतुस्रावाला (न्हाणीघरातील रक्तरंजित पाण्याला अथवा या काळी वापरल्या जाणाऱ्या कपड्यांना सुद्धा) नागाचा स्पर्श झाला, तर त्याला अंधत्त्व प्राप्त होते आणि तो त्या स्त्रीला वांझोटेपणाचा शाप देतो.

'नाग' हा स्त्रीचा भाऊ असल्याच्या लोककथा इतर प्रांतात किंवा भाषांत मिळतात, परंतु कोकणी लोकसमाजात मात्र तो तिचा 'नवरा' (पती, प्रियकर) असल्याच्याच कथा सापडतात. पुत्र म्हणूनही तो काही कथांतून दिसतो. यांतून एक गोष्ट सिद्ध होते ती म्हणजे, कोकणी समाजाने नागाला पौरुष प्रतिक म्हणूनच स्वीकारलेले आहे.



# २८.
# आत्म्याची भ्रमंती : कायम आणि तात्पुरती

आदिम माणसाला जसे जन्माचे गूढ पडले होते, तसेच त्याला मृत्यूचेही गूढ पडले होते. माणूस अथवा जीवमात्र मरतो, म्हणजे त्याचे नेमके काय होते याविषयी सुद्धा त्याला कोडे पडले होते. यातूनच त्याने आत्म्याची संकल्पना उदयाला आणली. त्याने जाणले, माणूस जिवंत असताना त्याच्या शरीरात एक चेतना असते, चैतन्य असते. तो बोलतो, चालतो, हसतो, रडतो... साऱ्या शरीरक्रिया करतो. मात्र तो मेल्यावर ही चेतना त्याच्या शरीरात नसते, ही चेतना गेल्यावरच त्याचे शरीर मृत होते, ते कुजते, नष्ट होते.

या अवलोकनातून त्याने चेतनेचे महत्त्व जाणले आणि तिला 'आत्मा' अथवा 'प्राण' असे नावही दिले. पुढे या आत्म्यासंबधी कितीतरी धारणा जन्माला आल्या, ज्या काही प्रमाणात आजही समाजात प्रचलित आहेत.

आत्मा अमर असतो, तो एका शरीरातून दुसऱ्या शरीरात प्रवेश करतो ही आदिमांची धारणा आजही लोकमानसात प्रभाव टाकून आहे. आत्मा पूर्वसंचित असलेल्या कुळातच जन्म घेतो, म्हणजे आपल्या वारसाच्या शरीरात पुनः जन्म घेतो, असाही समज लोकमानसात आहे.

स्त्रीबीज- पुरुषबीज संयोगातून नवजीवनाची रचना होते, त्यावेळी अनुवांशिकतेने या बीजांच्या रुपाने आत्मा नवजीवाच्या शरीरात प्रवेश करतो, इच्छेप्रमाणे तेथे तो काही काळ राहतो, नंतर त्या शरीरासंबंधित आपले कार्य संपले म्हणजे, त्या शरीराचा तो त्याग करतो आणि दुसऱ्या शरीरात प्रवेश करतो. आत्म्याची ही भ्रमंती अखंड चालू असते, असा आदिम समाजामध्ये समज होता, जो आजही लोकमानसाला पकडून आहे.

माणसाच्या शरीरात एक सूक्ष्म माणूस वास करतो, तोच त्याला चेतना देतो, हा माणूस म्हणजे त्याचा आत्मा, असा समज आदिम काळी प्रचलित असल्याचे संदर्भ फ्रेझरनी आपल्या द गोल्डन बाव मध्ये दिलेले आहेत, तसेच आदिमांची ही धारणा फक्त मानवी आत्म्यासंबंधीच नव्हती, तर सगळ्या जीवमात्रांसबंधीही होती, अशीही माहिती ते देतात.

हा सूक्ष्म मानवी जीव (आत्मा) प्रत्यक्ष माणसासारखा हुबेहूब दिसतो, अशीही आदिमाची समज होती, तसेच कधी कधी एका माणसाला चारसुद्धा आत्मे असल्याची, ज्यातील एक त्या माणसाची हुबेहूब प्रतिकृती तर इतर तीन सावल्या, असाही समज काही आदिम टोळ्यांत असल्याची माहिती सापडते. या संबंधाने लॉवर फ्रेझर नदीच्या काठी वस्ती करण्याचा इंडियन ट्राइब्स या जमातीचा येथे उल्लेख करता येतो.

आत्मे उंच असतात, बुटके असतात, मोठे (लठ्ठ) असतात किंवा बारीक असतात असाही आदिमांमध्ये समज होता. या संदर्भाने फिजी बेटावरील नाकेलो जमातीचे फ्रेझर उदाहरण देतात. ते सांगतात, या जमातीमध्ये ज्यावेळी त्यांच्या कोणा आप्ताचा मृत्यू होतो त्या वेळी ते पारंपरिक पद्धतीने सर्व क्रिया करून त्याचे प्रेत नदीकाठी नेतात, तिथे त्यांच्या परंपरेनुसार एक माणूस भूत (विधी करणारा) बनून येतो, त्यावेळी इतर लोक त्या प्रेताला सूप अथवा पंख्याचा आडोसा करून ठेवतात आणि त्याला सांगतात, 'याचा आत्मा एकदम लहान आहे' (The New Golden Bough; Pg. 194)

स्त्री-पुरुष संयोगातून आत्मा नवजीवाच्या शरीरात प्रवेश करतो, अशी धारणा जशी आदिमांमध्ये होती, त्याचबरोबर प्राण्याच्या तसेच मानवाच्या शरीराला असलेल्या भोकातून किंवा छिद्रातून आत्मा पसार होतो, अशीही आदिमामध्ये धारणा होती, खास करून नाक आणि मुखातून आत्मा निघून जातो, असा समज आहे. यामुळेच आजारी माणसाचे नाक-तोंड त्याचबरोबर पाय बांधून ठेवण्याची काही आदिम समाजात पद्धत होती. त्याच्या शरीरातील आत्म्याला निघायला वाट मिळणार नाही आणि तो आजारी माणूस मृत्यू पावणार नाही, अशी त्यांची त्या कृतीमागे भावना होती.

मेलेल्या माणसाचे नाक-तोंड कापसाचा बोळा घालून बंद करण्याची प्रथा आजही आहे. या मागे वैज्ञानिक कारण आहे. शव खराब होऊ नये, प्रेताच्या नाका-तोंडातून रक्त वाहू नये म्हणून हे करतात, मात्र काही आदिवासींमध्ये



**आत्म्याची भ्रमंती अखंड चालू असते.**

त्या प्रेताच्या शरीरात त्या भोकाद्वारे कोणा दुष्ट आत्म्याने प्रवेश करू नये म्हणून ही कृती केली जाते. ह्या कृतिकडे बघितल्यास मूळच्या कृतीचे हे बदललेले रुप वाटते.

आदिम मानवाने मानवी शरीरातून आत्मा निघून जाण्याची क्रिया दोन प्रकारे मानलेली दिसते. एका प्रकारात ही भ्रमंती कायम स्वरुपी दिसते, तर दुसऱ्या प्रकारात ही तात्पुरती अथवा काही काळापुरतीच दिसते. आत्म्याची भ्रमंती जेव्हा कायम स्वरुपी असते तेव्हा तो माणूस मृत होतो आणि माणूस जेव्हा झोपतो, आजारी पडतो किंवा त्याच्या अंगात संचारते तेव्हा त्याच्या शरीरातील आत्मा तात्पुरता निघून गेलेला असतो, तो काही काळाने त्या शरीरात परत येतो. ही तात्पुरती किंवा अल्पकाळाची भ्रमंती. एका तऱ्हेने अल्पकाळाची मृत अवस्थाच मानतात.

झोपेत माणसाचा आत्मा त्याच्या शरीरातून निघून भ्रमंतीला गेलेला असतो आणि तो ज्या जगात फिरतो अथवा जे जीवन त्या अल्पकाळात जगतो तेच स्वप्न रुपाने त्याच्या प्रत्यक्ष शरीराला दिसते असाही समज आहे. तसेच माणूस जेव्हा आजारी पडतो तेव्हा त्याचा मूळ आत्मा दुसरीकडे गेलेला असतो आणि एखाद्या भूत अथवा पिशाच्चाने त्याच्या शरीरात प्रवेश केलेला असतो, तसेच दुष्ट आत्मा, भूत-पिशाच्च किंवा अतिमानवी शक्तीचा आत्मा वगैरे त्याच्या शरीरात प्रवेश करतो तेव्हाच त्याच्या अंगात संचारते, असा समजही वरील समाजाला जोडून असलेला दिसतो.

माणसाच्या आत्म्याचे कायम अथवा तात्पुरते निघून जाणे हे नेहमीच त्याच्या इच्छेने नसते तर कित्येकदा दुष्ट शक्तीच्या, भूत-पिशाच्चाच्या जबरदस्तीने असते, असा समज असल्यामुळेच लहान मुले, आजारी माणूस अथवा दुर्बल मनोवृत्तीच्या माणसाने प्रेताच्या जवळ जाण्यावर आदिम काळी निर्बंध घातलेले होते.

अजूनही बऱ्याच जागी हे निर्बंध मानले जातात. दुष्टशक्तीने प्रभावीत केलेला आत्मा भयानक असतो आणि तो लहान मुले, दुर्बल-आजारी माणसांच्या आत्म्यांना झपाटतो, त्यांना जबरदस्तीने आपल्या बरोबर घेऊन जातो, असा समजही यामागे आहे. यासंबंधी 'द गोल्डन बाव'मध्ये फ्रेझरनी दिलेल्या काही उदाहरणांपैकी पुढील उदाहरण येथे देता येते : म्यानमारमधील कारेन या जमातीमध्ये घरा शेजारून प्रेतयात्रा जाताना, लहान मुलांना एका विशिष्ट प्रकारच्या दोरीने घराच्या एका विशिष्ट जागी बांधून ठेवतात. मुलांच्या आत्म्याने त्या प्रेताच्या आत्म्याला वश होऊन त्यामागे जाऊ नये, हा त्यामागचा उद्देश असतो. तसेच म्यानमारमधील शान कुळाचे लोक मृतदेहाची विल्हेवाट लावून आल्यावर घरातील प्रत्येक सदस्यांच्या मनगटावर एक विशिष्ट प्रकारचा दोरा बांधतात. या सदस्याच्या आत्म्याने मेलेल्या आत्म्याच्या मागे जाऊ नये, हा हेतू असतो. हा दोरा ते स्वतःहून तुटेपर्यंत हातात ठेवतात. (The New Golden Bough; Pg. 198)

आदिम काळी जन्माला आलेल्या या समजुती कित्येक वर्षांचे भ्रमण करीत, आजच्या समाजापर्यंत पोहोचलेल्या आहेत. आज इतर समाजापेक्षा आदिवासी समाजात त्यांचा प्रभाव जास्त आहे. ३०-४० वर्षांपूर्वी माझ्या आमोणे (केपे) गावातसुद्धा वरील समजाशी जुळणारे काही समज प्रचलित होते, त्यातील एक इथे मुद्दाम नोंद करते, तो म्हणजे - घरा शेजारून प्रेतयात्रा जाताना घरातील दारे-खिडक्या बंद करून ठेवल्या जायच्या. या मागे मेलेल्या व्यक्तीच्या आत्म्याने आपल्या घरात प्रवेश करू नये हा उद्‌देश होता.

आत्म्याच्या कायम स्वरुपी भ्रमंतीची धारणा कोकणी लोकमानसातही रूढ आहे, त्याचबरोबर दुष्ट आत्म्याच्या अल्पकाळ प्रभावाचा समजसुद्धा सापडतो. काही लोककथांतून आत्म्याने आपली मूळ काया सोडून दुसऱ्या कायेत प्रवेश केल्याचे, किंवा आत्मा अल्पकाळ शरीर सोडून गेल्याचे कल्पनाबंध सापडतात.



## २९.
# सावली : आत्म्याचेच एक रुप

आदिम मानवाला ज्या कित्येक गोष्टींचे गूढ होते त्यामध्ये 'सावली'चा सुद्धा समावेश होतो. सावलीमागचे वैज्ञानिक कारण त्याला त्या काळी ज्ञात झाले नव्हते. त्यामुळे तिच्यासंबंधी एक प्रकारची भीतीही त्याच्या मनात उत्पन्न झाली होती. 'सावली' म्हणजे नेमके काय? ती पडते वा दिसते कशी? ती मूळ वस्तू किंवा प्राण्याला चिकटून का असते? ती त्याच्याबरोबर का फिरते? तिचा आकार लहान-मोठा असा का बदलतो? असे अनेक प्रश्न त्याला बेचैन करीत होते. खास करून स्वतःच्या अथवा मानवी सावलीसंबंधात तो जास्त गोंधळात सापडला होता. मग त्याने स्वतःची कल्पकता आणि बुद्धी यांचा वापर करून आपल्या पद्धतीने सावलीसंबंधी एक तर्क काढला, तो म्हणजे 'सावली' ही मानवाच्या किंवा ज्या वस्तूशी ती संबंधित आहे, त्या वस्तूच्या आत्म्याचेच एक रुप आहे. (निर्जीव वस्तूंतही आत्मा वसतो अशी आदिम मानवाची धारणा होती) आत्माच संबंधित शरीरातून बाहेर पडून सावली रुपात दिसतो किंवा सावली बनतो.

सावलीला आत्म्याचेच एक रुप मानल्यानंतर सावलीसंबंधी कितीतरी धारणा जन्माला आल्या. खास करून मानवी सावलीसंबंधी. आजारी किंवा भूत, पिशाच्चाने पछाडलेल्या माणसाची सावली एकदम लहान पडते अथवा छोटी होत जाते. ज्या माणसाचा मृत्यूकाळ समीप आलेला असतो त्याची सावली पडत नाही. सावली न पडणे हा त्या माणसाच्या मृत्यूचा संकेत असतो. भूत-पिशाच्चाची सावली महाकाय असते, त्यांचा देह दिसत नाही.

मात्र सावली फिरताना दिसते, वगैरे वगैरे...

सावलीसंबंधी या धारणा जन्माला आल्यानंतर आदिम काली माणसाच्या मनात सावलीचे एक भय निर्माण झाले होते. सावलीवरून आजार पारखण्याचे अथवा भविष्याचा वेध घेण्याचेही तंत्र मानवाने या काळी आपल्या परीने विकसित केले होते.

सावलीसंबंधीचे गूढ आणि त्याचा मानवी आत्म्यासंबंधित जोडलेला संबंध हा जगातील सर्वच आदिम संस्कृतींनी रुढ होता. या संबंधी पुरावे देणारे संदर्भ ही मिळतात. गोव्यातही एके काळी ही धारणा होती याला पुष्टी देणारे काही समज सापडतात. या संदभाने एक वाक्यप्रचार अतिशय महत्त्वाचा आहे. तो म्हणजे 'स्वतःच्याच सावलीला घाबरणे'. (स्वतःच्याच सावलीला घाबरतो.) या वाक्प्रचारामागे मागे सावलीला घाबरण्याचा भाव लपलेला आहे. एके काली येथील समाज मनात सावलीसंबंधी भीती होती, हे यातून सिद्ध होते.

विज्ञान आणि तंत्रज्ञानाने आज मानवी जीवन बदलून टाकले आहे. एके काळी गूढ वाटणाऱ्या गोष्टींमागचे सत्य विज्ञानाने आज उलगडून दाखवलेले आहे, तरी कित्येक आदिम विचारधारणा समाजमनावर अजूनही अंश रुपाने का असेना, परंतु प्रभाव घालून आहेत. 'सावली'चेही तसेच आहे आणि वरील वाक्यप्रचार त्याचे एक प्रमाण आहे.

सावली ही माणसाच्या आत्म्याचे एक रुप या मूळ भावनेतून पुढे भूत-पिशाच्चाची किंवा अतृप्त (सैतानी) आत्म्याचीही सावली पडते, असा समज जन्माला आला आणि यातूनच सावलीविषयीची भीती बाळगण्यास सुरवात झाली. रात्री-अपरात्री, निर्जन जागी, स्मशानात किंवा अंत्यसंस्कार केलेल्या जागी एखादी सावली दिसली (अथवा तसा भास झाला) तर ती भूत-पिशाच्चाची सावली असा समज दृढ होऊन तो माणूस आजारी पडणे, कधी कधी त्याचा प्रभाव एवढा तीव्र होता की तो मृत्यू पावणे अशा गोष्टी सुद्धा होऊ लागल्या. मग सावलीच्या माध्यमातून झालेला हा भूत-पिशाच्च किंवा आत्म्याचा प्रभाव काढण्यासाठी कितीतरी यातूतंत्रे निर्माण झाली. जादूगार, घाडी, भगत वगैरे तज्ञ निर्माण झाली.

खेडोपाडी, 'मी अमूक अमूक जागी एक सावली हलताना पाहिली' किंवा 'जाताना पाहिली', अशा गोष्टी काही लोक अजूनही बोलताना दिसतात.



**सावली संबंधीचे गूढ जगभर आहे.**

कधी कधी या बघण्यातून काही जण आजारी पडलेलेही ऐकू येतात. हल्ली हल्लीपर्यंत माझ्या आमोणे गावात अशा गोष्टी लोक बोलताना मी खुद्द ऐकलेल्या आहेत. खासकरून एखाद्याचा अपघाती मृत्यू होतो, एखादा तरुण मुलगा अथवा मुलगी अकस्मात मृत्यू पावते, तेव्हा अशा गोष्टी बोललेल्या दिसतात.

'सावली ही आत्म्याचे रुप' या भावनेमुळे सावलीला इजा केली म्हणजे तिच्या धन्याला इजा होते, असा समज आदिम काळी रुढ होता. यातूनच एखाद्या माणसाला दुखापत करायची असेल तर त्याच्या सावलीलाच दुखापत करण्याची, अथवा त्याला जिवंत मारायचे असेल तर सावलीच कापण्याची यातूकर्मे सुरू झाली. काही वेळा एखाद्या जागी बळी द्यायचा असेल आणि तसा माणूस मिळत नसेल तर कोणा वाटसरूला बोलण्यात गुंतवून त्या जागी न्यायचे आणि त्याच्या नकळत तेथे त्याची सावली सुद्धा कापली जाऊ लागली. अशा तऱ्हेने सावली कापलेला माणूस काही दिवसांतच मरून जातो, असा समज या प्रथेला जोडला गेला. या जादूकृतीसंबंधी कितीतरी उदाहरणे फ्रेझर आपल्या गोल्डन बावमध्ये देतात. त्यांतील काही उदाहरणे अशी :

१. व्हेटार बेटावरचे जादूगार एखाद्या (त्यांना अभिप्रेत असलेल्या)

माणसाच्या सावलीला टोचून अथवा तलवारीने कापून त्या माणसाला आजारी करतात, त्याला मृत्यू आणतात.

२. बाखर बेटावरचे दुष्ट अथवा खूनशी लोक एखाद्या माणसाचा आत्मा आपल्या काबूत ठेवण्यासाठी त्याची सावली घट्ट पकडून ठेवतात, किंवा त्याची सावली ओरबाडतात, विछिन्न करतात.

३. सेंट्रल सेलेब्स येथील तोलींदोर लोकांमध्ये सावली पायाखाली तुडवणे किंवा ती ओलांडणे हा गुन्हा मानतात. कारण असे केल्याने त्या सावलीचा धनी आजारी पडतो, अशी त्यांची समजुत आहे.

४. तांबोन कुर्स लोक वरील कारणासाठीच लहान मुलांना सावलीशी खेळू देत नाहीत.

५. ओटवा इंडियन्स जमातीमध्ये सावलीवर चित्रविचित्र आकृत्या करून तिच्या धन्याला आजारी पाडता येते, असा समज आहे.

६. मध्य आफ्रिकेचे बंगाडा लोक सावलीला भूत मानतात आणि तिला जखमी करून, तिला पायाखाली तुडवून वगैरे त्या भूताचा नायनाट करता येतो, असे समजतात.

७. पश्चिम आफ्रिकेच्या बेविली जमातीमध्ये लग्न झालेल्या स्त्रीच्या सावलीला पायाखाली तुडवणे अथवा ओलांडणे मोठा गुन्हा मानतात.

८. काही फकीर लोक त्यांच्या सावलीवर कुणालाही उभे राहू देत नाहीत; कारण त्या माणसाच्या अंगात एखादी दुष्ट शक्ती संचार करीत असेल तर त्याचा आपल्यावर प्रभाव होईल, अशी त्यांना भीती असते. (The New Golden Bough; Pg. 201)

काही विशिष्ट लोकांच्या अंगात दुष्ट शक्ती अथवा आत्मा संचार करीत असतो तेव्हा त्यांची सावली अंगावर पडता कामा नये, अशीही समजुत काही आदिवासी समाजात होती. या लोकांमध्ये 'सासू' (बायकोची आई) आणि सुतकात असलेले लोक यांचा ते समावेश करतात.

सासूसंबंधीच्या समजाचे एक उदाहरण म्हणून न्यू साउथ वेल्स येथील ह्युयीय जमातीचा येथे उल्लेख करता येतो, तसेच सुतकी माणसाचे उदाहरण देण्यासाठी ब्रिटीश कोलंबियाच्या शुसवेध इंडियन्सचे नाव घेता येते.



३०.

# प्रतिबिंब : आत्म्याचे प्रकट रुप

प्राथमिक अवस्थेत जीवन जगणाऱ्या मानवाला आत्म्याच्या संकल्पनेने भारून टाकले होते. आत्मा अमर असतो, तो एका शरीरातून दुसऱ्या शरीरात भ्रमण करीत राहतो, अशी त्याची धारणा होती, तसेच आत्मा वेळोवेळी अथवा काही प्रसंगी शरीरातून बाहेर पडून प्रकट होतो अशी समजुत होती. यातूनच माणसाचे (प्राणी, पक्षी, वृक्ष इत्यादींचे सुद्धा) पाण्यात पडणारे प्रतिबिंब म्हणजे त्याच्या आत्म्याचे प्रकटीकरण अशी धारणा त्याच्या मनात रुजली गेली.

मुळात या धारणेमागे प्रतिबिंबासंबंधी मानवाला त्या काळी वाटलेले गूढ कारणीभूत आहे. इतर कित्येक गोष्टींचे जसे वैज्ञानिक कारण या काळी मानवाला ज्ञात झाले नव्हते, तसेच प्रतिबिंबामागचे सुद्धा कारण त्याला उमजले नव्हते. यातूनच प्रतिबिंब म्हणजे मूळ प्राण्याचा आत्मा असा त्याचा समज झाला. आत्मा हा मूळ प्राण्यासारखा हुबेहूब दिसतो, असा समज त्याच्यामध्ये होताच, प्रतिबिंबसुद्धा मूळ प्राण्यासारखेच दिसते, म्हणजे ते आत्म्याचेच प्रकट रुप अशी त्याची भावना झाली.

प्रतिबिंबाच्या आत्म्याशी जोडलेल्या संबंधातून नंतर पुढे कित्येक धारणा जन्माला आल्या. प्रतिबिंबाला इजा केली तर त्याचा धनी म्हणजे ज्याचे प्रतिबिंब आहे, त्या माणसाला सुद्धा इजा होते, असा समज तयार झाला. काही जमातींमध्ये तर स्वतःचे प्रतिबिंब पाहिले तर मरण येते असा समज रुढ असल्याचे संदर्भ सापडतात. प्रतिबिंबाशी जोडलेल्या या संबंधातून जादूटोणा करण्यासाठी कधी कधी प्रत्यक्ष व्यक्तीवर प्रयोग न करता, त्याच्या प्रतिबिंबावर

प्रयोग करण्यात येत असल्याची माहिती सापडते. तसेच एखाद्याच्या अंगात दुष्ट शक्ती, म्हणजे भूत-पिशाच्च वगैरे वावरत आहे, असा संशय असेल तर ते काढण्यासाठी त्या माणसाला पाण्यात बघायला लावण्यात येत असल्याचीही माहिती मिळते. पाण्यात पडणाऱ्या त्याच्या प्रतिबिंबाच्या रुपाने त्या शक्तीचा आत्मा बाहेर पडतो आणि नंतर निघून जातो, असा समज.

गोव्यात या संदर्भाने प्रचलित असलेल्या एका प्रथेचा विचार करायला हवा, असे माझे स्वतःचे मत आहे. ही प्रथा म्हणजे ओंवाळण्याची किंवा 'आरत-बगूळ' (औक्षण) रण्याची प्रथा. दूरचा प्रवास करून आल्यावर, शिकारीहून आल्यावर, युद्धावरून आल्यावर एके काळी घरातील मुख्य (म्हालगडी, म्हाल) स्त्री त्या वीराला (वीर पुरुषाला) ओवाळून घरात घ्यायची. असे संदर्भ लोककथांनीही सापडतात. आज प्रत्यक्ष शिगम्याचा मेळ खेळायला गेलेले पुरुष, दिवाळीला प्रतीकरुपी नरकासुराचा वध करून घरात येणारे पुरुष, दूरवरून आणलेल्या लहान बाळाला घरात घेताना, तसेच गणपतीची अथवा इतर मूर्तींना पूजनासाठी घरात घेताना, त्यांना दारावर थांबवून 'आरत-बगूळ' केली जाते आणि नंतर त्यांना घरात घेतले जाते.

'आरत-बगूळ' म्हणजे दिवा आणि पाणी. दिवा सर्वसामान्यपणे सगळीकडे दिसतो; परंतु पाणी आधी सांगितल्याप्रमाणे काही विशिष्ट प्रसंगीच वापरलेले दिसते. हे पाणी एखाद्या तांब्यात, लोट्यांत, अथवा मडक्यात घालून ते आणतात. कधी हे पाणी नुसते शुद्धपाणी असते तर कधी ते पिंजरीचे लाल पाणी किंवा हळदीचे पिवळे पाणी असते. या पाण्यात दारी आलेल्या त्या वीराला आपले रुप बघायला लावतात, नंतर ते पाणी दूर फेकतात. यावेळी कणकेचे दोन गोळे करून दोन दिशांनी फेकले जातात. मग दिव्याने ओवाळणी करून त्या वीराला घरात घेतले जाते.

माझ्या मते या आरत-बगुळातील 'पाण्याची बगूळ' दाखवण्यामागे सुद्धा त्या वीराच्या अंगावर प्रभाव केलेल्या बाहेरील शक्तींना पिटाळून लावण्याची भावना आहे. मूळच्या प्रथेवर जेव्हा हजारो वर्षांचा काळ उलटतो तेव्हा तिच्या मूळ स्वरुपात बदल घडतो, या परंपरेसंबंधी सुद्धा असेच घडलेले आहे. इथे पाण्याचे महत्त्व दुय्यम होऊन आरतीला, म्हणजे दिव्याला जास्त महत्त्व आले. यासंबंधी अधिक संशोधनाची गरज आहे.



प्रतिबिंबाला इजा केली तर त्याच्या धन्यालाही इजा होते अशी धारणा आहे.

प्रतिबिंबासंबंधी असलेल्या धारणांची काही उदाहरणे फ्रेझर 'गोल्डन बाव'मध्ये देतात. प्राचिन काळी ग्रीक लोकांमध्ये स्वतःचे प्रतिबिंब बघितले तर मरण येते, असा समज होता. एवढेच नव्हे, तर स्वप्नांत सुद्धा स्वतःचे प्रतिबिंब बघितले तर त्या माणसाला मरण येते असा त्यांच्यामध्ये समज होता. असा समज प्राचिन काळी भारतातही रुढ होता, अशी माहितीही फ्रेझर देतात. एझटेक जमातीचे लोक त्यांच्यावर जादूटोणा करायला घरी येणाऱ्या माणसासाठी दारातच एका मोठ्या भांड्यात पाणी भरून ठेवतात. तसेच त्या पाण्यात एक खंजीर अथवा सुरा ठेवतात. घरात येणाऱ्या जादुगाराची दृष्टी त्या पाण्यावर पडते आणि त्याला त्यात आपले प्रतिबिंब दिसते. त्या प्रतिबिंबावर सुरा असल्याने तो आपल्या आत्म्याचा खून झाला असे समजतो आणि नंतर त्या धक्क्याने तो मृत्यू पावतो, असे एक मजेशीर उदाहरणही फ्रेझर आपल्या गोल्डन बाव या पुस्तकात देतात. (The New Golden Bough; Pg. 203)

प्रतिबिंबाशी जोडलेला आत्म्याचा संबंध, मानवी मनावर एवढा प्रभाव टाकून होता की मानवाने आपल्या बौद्धिक आणि भौतिक प्रगतीने ज्यावेळी शेकडो वर्षांच्या काळानंतर आरशाचा शोध लावला, तिथपर्यंतही तो पोहोचला. पाण्यातील प्रतिबिंबाबरोबर आरशातील प्रतिबिंबाशीही त्याने आत्म्याचा संबंध जोडला. यातूनच आजारी माणूस, झपाटलेला माणूस अथवा मेलेला माणूस, यांचा मृतदेह ठेवलेल्या खोलीत आरसा ठेवण्यावर निर्बंध आले. जर आरसा ठेवला तर त्या व्यक्तीच्या अथवा मृतदेहाच्या अंगातील झपाटलेला आत्मा जाऊन त्या आरशात लपून राहतो आणि नंतर इतर लोकांना झपाटतो, त्रास देतो असे समज रुढ झाले. तसेच याला जोडूनच आजारी माणसाच्या खोलीत आरसा ठेवला, तर त्याचा आत्मा मूळ देहातून निघून त्या आरशात जाऊन राहणार आणि तो माणूस मृत्यू पावणार म्हणून त्याच्या खोलीतील आरसे

झाकून ठेवण्याचीही प्रथा काही भागांत सुरू झाली.

लहान बाळाला (एक वर्ष होईपर्यंत) आरसा दाखवू नये, तसे केल्याने बाळ खंगते असा समज गोव्यात एकेकाळी मोठ्या प्रमाणात खेडो-पाडी रुढ होता. अजूनही काही भागात अथवा घरात त्याचा प्रभाव दिसतो. या समजामागील मूळ भावना आत्म्याशी जोडलेली आहे, असे माझे मत आहे. जसे एखाद्या प्रथेवर, परंपरेवर हजारो वर्षांचा काळ उलटला म्हणजे त्यातील मूळ भाव बाजूला पडतो तसेच इथेही झालेले आहे. बाळाचा आत्मा नुकताच त्याच्या देहात स्थिरावू लागलेला असतो, त्याला जर आरसा दिसला तर तो कदाचित त्यात जाऊन राहील आणि बाळाचे काहीतरी बरे वाईट होईल, अशी भीती या समजामागे मूळ होती असेच दिसते.

तैलचित्र आणि फोटो यासंबंधी सुद्धा लोकमानसात आरशातील प्रतिबिंबासारखीच समजुत होती.

निसर्गाच्या सान्निध्यात राहणारा मानव ते यंत्रयुगात नव्या नव्या साधनांचा-आयुधांचा शोध लावलेला मानव, या हजारो वर्षांच्या प्रवासातही आत्म्याच्या संकल्पनेने त्यांच्या लोकमानसावर अजुनही आपली पकड ठेवलेली आहे.



३१.

# पूर्वज नाव आणि त्या मागचे गूढ

आपले पूर्वज वंशजांच्या रुपाने पुनर्जन्म घेतात अशी पक्की धारणा जन्म आणि मृत्यूच्या कोड्यात सापडलेल्या आदिम मानवाची होती. ही धारणा एवढी प्रभावी होती की यांतूनच मेलेल्या पूर्वजाचे नाव त्याच्या वारसाला देण्याची प्रथा सुरू झाली. जगभरच्या मानव समाजात ही प्रथा सापडते. एवढेच नव्हे, तर त्या पूर्वजाचे मान-अधिकार त्या वारसाला देण्यातही येतात. एखादा माणूस मृत झाल्यानंतर त्याच्या घरात अथवा कुटुंबात जन्माला आलेल्या मुलाला म्हणजे त्याच्या वारसाला त्याचे नाव दिले नाही, तर त्या पूर्वजाचा आत्मा रुष्ट होतो आणि तो एक तर त्या जन्मलेल्या बाळाला इजा करतो, त्याला आपल्याकडे नेतो (म्हणजे त्याचा मृत्यू घडवतो) किंवा घरावर-कुटुंबावर अनेक संकटे आणि आपत्ती आणतो, असा समज या प्रथेसंबंधाने प्रचलित आहे. पूर्वजांचे नाव देण्याची आदिम काळी उदयाला आलेली प्रथा इतिहास काळातही समाजावर आपला मोठा प्रभाव पाडून होती. याचे प्रमाण म्हणजे एकाच घराण्यात, एकाच नावाचे कित्येक राजे सापडतात. मात्र त्यांना पहिला, दुसरा, तिसरा... अशी विशेषणे जोडलेली दिसतात. ही प्रथा अजुनही समाज मनावर आपली पकड ठेऊन आहे. आजही कित्येक कुटुंबात नवजात बाळाला त्याच्या पूर्वजाचे नाव दिलेले बघायला मिळते. मात्र, कधी कधी आधुनिकतेशी जोडण्याचा प्रयत्न करून या प्रथेत थोडा फेरफार केलेला दिसतो. म्हणजे पूर्वजांच्या नावातील पहिले, शेवटचे अथवा मधले सुद्धा अक्षर घेऊन त्यावर आधारित नवीन नाव रचून ते बाळाला ठेवण्यात येते किंवा पूर्वजाचे

मूळ नाव पाळण्यात बाळाच्या कानात सांगण्यात येते आणि आधुनिक नाव जाहीर केलेले असते, किंवा कागदोपत्री पूर्वजांचे नाव ठेवण्यात येते आणि दैनंदिन वापरासाठी त्याला दुसरे नाव देण्यात येते. ही प्रथा फक्त भारतातच नाही, तर ती जगभर सापडते.

पूर्वजांचे नाव ठेवण्याच्या प्रथेमागे, आत्मा अमर असतो. तो एका देहातून दुसऱ्या देहात प्रवेश करीत राहतो (जन्म घेत) ही भावना आहे, हे येथे मुद्दाम लक्षात घेण्याजोगे आहे. आत्मा नवबाळाच्या रुपाने परत जन्म घेतो किंवा ज्या व्यक्तीला पूर्वजांचे नाव ठेवले जाते त्या व्यक्तीमध्ये त्या पूर्वजांचा आत्मा वास करतो या समजातून आदिम काळी आणखीही कित्येक परंपरा समजुती जन्माला आल्या, ज्या अवशेष रुपे आजही समाजात रुढ असलेल्या दिसतात.

एखाद्याला दोन नावे ठेवण्याची प्रथा आत्म्याच्या पुनर्जन्माच्या कल्पनेतून जन्माला आली. यामध्ये मूळ नाव लपवून ठेवण्याची आणि दुसरे नाव जाहीर करण्याचीही पद्धत आहे. यामागचे कारण म्हणजें पूर्ववैमनस्य असेल तर एखादा जादुगार, वैरी अथवा दुष्ट माणूस पुनर्जन्म घेतलेल्या त्या माणसावर आघात करू शकतो, त्यासाठी दुसरे नाव ठेवून त्याची दिशाभूल करण्याची आदिमाची युक्ती या प्रथेमागे असल्याची माहिती सापडते. काही वेळा दुसरे नाव मुलाला पाळण्यात न ठेवता दीक्षांत विधी वेळी ठेवण्यात येते. दक्षिण-पूर्व ऑस्ट्रेलियामधील कित्येक आदिवासी समाजात अशी प्रथा आहे. त्यांच्याकडे त्यांचे मूळ नाव अनोळखी अथवा वाटसरूपासून लपवून ठेवले जाते आणि जे दुसरे नाव ठेवलेले असते त्यानेच ओळख केली जाते.

वाटसरू किंवा अनोळखी माणसाला खरे नाव सांगितले तर तो कदाचित घात करील अशी भीती असते. इजिप्शियन लोकांमध्ये सुद्धा दोन नावे ठेवण्याची प्रथा होती. यातील एका नावाला मूळ अथवा मोठे नाव आणि दुसऱ्या नावाला चांगले अथवा धाकटे नाव म्हणून मान्यता असायची. यातील पहिले नाव फक्त घरातील किंवा खास लोकांनाच माहीत असायचे तर दुसरे सार्वजनिकपणे जाहीर केलेले असायचे. पहिल्या नावाचा लग्नकार्य अथवा विशिष्ट प्रसंगीच उल्लेख केला जायचा. लपवण्यात आलेले नाव कुणाला ज्ञात झाले आणि ते त्याने जाहीर केले तर या समाजात रणकंदन व्हायचे. अबिसियन लोकांमध्ये सुद्धा अशीच प्रथा होती. भारतीय आणि पर्यायाने कोकणी समाजातही दोन



**पूर्वजांचे नाव ठेवण्याची प्रथा आजही आहे. (कुंकळी-सासष्टी, १९९५)**

नावे ठेवण्याची प्रथा आहे.

फ्रेझरनी आपल्या गोल्डन बाव ग्रंथांत जगातील कित्येक आदिम समाजात रूढ असलेली या प्रथेशी संबंधित उदाहरणे दिलेली आहेत. ज्यामध्ये त्यांनी आसामचेसुद्धा उदाहरण दिलेले आहे. ते सांगतात, डोंगराळ प्रदेशात वस्ती करून राहाणाऱ्या आसाममधील आदिवासी जमातीत दोन नावांची प्रथा आहे. यांतील एक नाव सार्वजनिक वापराचे तर एक खासगी वापराचे. जर कोणी चुकून स्वतः आपले खासगी नाव सार्वजनिकपणे जाहीर केले तर मग त्याला त्यांच्या पंचायतीकडून दंडही दिला जातो, हा दंड बहुतेकदा त्या आरोपीने कमीत ते दोन दिवस ग्रामजेवण घालण्याचा असतो. (The New Golden Bough : Pg. 235-236)

उत्तर अमेरिकन आणि न्यू मेक्सिकोच्या नवोस लोकांमध्ये सुद्धा दोन नावे ठेवण्याची प्रथा आहे आणि त्या मागे जादुगार अथवा दुष्ट शक्तीपासून आत्म्याचे रक्षण करणे हीच भावना आहे. टेक्सास येथील टोन्काचे इंडियन्समध्ये मूळ निवासी भाषेतील अर्थाला धरून ठेवलेल्या नावा व्यतिरिक्त इंग्लिश भाषेतील नाव ठेवण्याची प्रथा आहे. त्या माणसाच्या खऱ्या नावाने त्याला हाक मारली अथवा बोलले तर स्मशानात दफन केलेल्या किंवा अवती-भोवती वावरणाऱ्या दुष्ट शक्तींना त्याची ओळख पटून पूर्वजन्मीच्या वैराने त्या इजा करू शकतात,

म्हणून सावधगिरीचा पर्याय म्हणून त्याला दोन नावे ठेवली जातात, अशी माहिती सापडते.

दुष्ट शक्तीपासून बचाव करण्याच्या उद्देशाने काही जमातींमध्ये व्यक्तिविशेष नावाने उल्लेख न करता त्या माणसाच्या कूळ नावाने (जे पुढे आडनाव झाले) उल्लेख करण्याचीही प्रथा सापडते.

नवरा-बायकोने एकमेकाला नावाने हाक न मारण्याची प्रथा आदिम काळी रुढ होती. दक्षिण काफिर जमातीचा (कॅफायर्स) या संबंधाने उल्लेख करता येतो. या मागे सुद्धा आपल्या सहचराचे दुष्ट शक्तीपासून रक्षण करण्याचा उद्देश आहे. गोमंतकीय समाजात सुद्धा ही प्रथा रूढ होती (आहे).

आधी नवरा-बायको दोघेही एकमेकांची नावे घेत नव्हते. 'मुलांची आई किंवा बाबा' अथवा '---ची आई किंवा बाबा' अशा पद्धतीने हाक मारायचे अथवा उल्लेख करायचे. नंतरच्या काळात नवरा बायकोचे सरळ नाव घेऊ लागला. आणि बायको तेवढी नवऱ्याला '---चे बाबा' किंवा 'ऐकलंत का?', 'अहो, ऐकाहो...' अशा वेगवेगळ्या तऱ्हेने संबोधू लागली. या मागे नवऱ्याचा आदर करण्याचा भाव आहे अशी सर्वसामान्यांची आज भावना आहे, परंतु आदिम काळी प्रचलित असलेल्या या प्रथेचा अभ्यास करता, या प्रथेमागे 'दुष्ट शक्तीपासून' आपल्या सहचऱ्याचे रक्षण करणे अथवा सावधगिरी बाळगणे, हाच भाव असायला पाहिजे असे मला वाटते. एके काळी राजाचे सुद्धा नाव त्याच्या प्रजेने उघडपणे घेण्यावर बंदी होती. यामागेसुद्धा राजाचे, म्हणजे त्याच्या आत्म्याचे रक्षण करण्याचा हेतू होता. एखाद्याने हा नियम मोडला तर त्याला कडक शिक्षा व्हायची. याच प्रथेबरोबर काही जमातींमध्ये राजाचा मृत्यू झाल्यावर त्याचे नाव किंवा त्या नावाचा शब्दच भाषेतून वगळून टाकण्यात येत असे. या संबंधाने मध्य आफ्रिकेतील बहिमा समूदायाचे उदाहरण इथे देता येते. मृत्यू पावलेल्या राजाच्या आत्म्याने नव्या राजाला त्रास देऊ नये किंवा ते नाव ऐकून त्याचा आत्मा परत येऊ नये अशी समजुत त्यांच्यामध्ये आहे. (The New Golden Bough : Pg. 242).

आत्मा पुनर्जन्म घेतो या समजाशी जुळणारी आणखी एक धारणा बहुतेक सगळ्याच समाजात होती, आजही ती कुठे कुठे पाहायला मिळते. ती म्हणजे, गरोदर असताना अथवा बाळंतपणाच्या अवस्थेत, प्रसव वेदना भोगताना

कुटुंबातील मरण पावलेली व्यक्ती दिसली किंवा जवळ उभी असल्याचा भास झाला तर जन्म घेतलेले बाळ हे त्याचेच रुप आहे, असे मानण्यात येते आणि नंतर त्याला त्याचेच नाव दिले जाते.

गोवा-महाराष्ट्रात बाळाला पाळण्यात घालण्याच्या विधीप्रसंगी आत्या किंवा त्याची आई त्याचे नाव कानात सांगते, नंतर ते मोठ्याने जाहीर करते. या प्रथेमागे सुद्धा बाळाच्या अथवा त्याच्या रुपे जो जन्माला आला त्याचे रक्षण करण्याचा मूळ हेतू असावा. आज सर्वसाधारणपणे बाळाचे नाव त्याच्या कानात सांगितल्यावर तेच जाहीर करतात. मुळात एक नाव (मोठे नाव) त्याच्या कानात सांगून दुसरे नाव जाहीर करण्यातही येत असावे. पूर्वजांचे जे नाव मुलाला ठेवण्यात येते, त्या नावाने बाळाला मोठी शक्ती आणि रक्षण मिळते, त्या नावावरवी त्या पूर्वजांची शक्ती बाळाच्या अंगांत उतरते, असा समज आहे.



# ३२

# बाहुली : मूळचे यातुकर्माचे साधन

कधी कधी एखाद्या साध्या वस्तूमागेसुद्धा खूप मोठे गूढ लपलेले असते. याचे महत्त्वाचे उदाहरण म्हणजे 'बाहुली'. लहान मुलाचे खास करून मुलींच्या खेळण्याचे साधन म्हणून आज तिला अर्थ प्राप्त झालेला आहे; परंतु तिच्या निर्मितीमागे मात्र खूप मोठे सांस्कृतिक संचित लपलेले आहे. मानवी विकासाच्या खूप मोठ्या प्रवासाची ती साक्षीदार आहे म्हटल्यास वावगे ठरू नये.

'बाहुली' (कोकणीत बावली किंवा बावलें) म्हणजे माणसाची प्रतिकृती. स्त्री आकृती केली तर तिला 'बाहुली' आणि पुरुष आकृती केली तर 'बाहुला' अशी संज्ञा प्राप्त होते; परंतु खूपदा 'बाहुली' ही संकल्पना लोकपरंपरेत येते. त्यावेळी ती माणसाची प्रतिकृती या अर्थाने घेतली जाते. बाहुली या संकल्पनेने आदिम काळी मानवाच्या युद्धासाठी खूप मोठी भूमिका बाजवलेली दिसते. बाहुलीचे मूळ मानवी विकास पंथाच्या खूप मागे जाते, ज्या काळी मानवी समाज यातुविद्येने भारावला होता, त्या काळी या बाहुलीचा जन्म झाला. या काळी 'यातू' हाच मानवाचा धर्म होता. यातुक्रिया हेचधार्मिक कृत्य होते. निसर्गातील अनेक आपत्तींशी झुंज देत जीवन जगण्यासाठी धडपडणाऱ्या मानवासाठी आपले जीवन सुसह्य आणि सुखकर करण्यासाठी तेच साधन होते. निसर्गातील विविध घटनांविषयी वाटणाऱ्या गूढांचे आकलन हे यातूच्या निर्मितीमागचे आणि पर्यायाने बाहुलीच्या निर्मितीमागचे कारण होते.

जनन, भरण, पोषण या तीन क्रियांभोवती संपूर्ण जीवन व्यापलेल्या आदिम

मानवाला स्वरक्षणाबरोबरच, वंशवृद्धी आणि संततीचे रक्षण याची चिंता होती. या निसर्गातील अदृश्य शक्ती आपले जीवन नियंत्रित करतात. त्यांच्या कृपेमुळेच आपल्याला संतती प्राप्त होते. भूमीचे सुफलीकरण होते, पिकांची वृद्धी होते, अशी त्यांची दृढ भावना होती. त्याचबरोबर त्यांच्या अवकृपेमुळे संकटे येतात. रोगराई येतात, अशीही त्यांची समज होती.


काळ्या जादूसाठी काळी बाहुली मुख्यतः वापरली जाते.

म्हणूनच त्याने या अदृश्य शक्तींच्या कृपेसाठी काही तंत्रे विकसित केली. हीच तंत्रे यातुतंत्रे अथवा यातुकृत्ये ठरली.

'सारक्यातून सारके जन्माला येते' किंवा 'कार्य हे कारणासाठी असते' तसेच 'एकदा परस्पर संपर्क घडलेल्या वस्तू परस्परांपासून दूर झाल्या तरीही परस्परांवर परिणाम घडवीत राहतात.' ही आदिमांची धारणा होती आणि या धारणेतूनच त्याने जादुतंत्राची निर्मिती केली.

पाश्चिमात्य देशांत मानवशास्त्रांनी एकोणीसाव्या शतकाच्या उत्तरार्धापासून विविध आदिवासी समूहांच्या प्रथा-परंपरांचा आणि श्रद्धा-धारणांचा अभ्यास सुरू करून यातुविद्येसंबंधी सिद्धांत मांडले आहेत, ज्यामध्ये सर जेम्स जॉर्ज फ्रेझर यांचे नाव अग्रणी आहे. त्यांनी आदिमांच्या वरील पहिल्या धारणेला अनुसरून 'द लॉ ऑफ सिमिलॅरिटी' म्हणजे 'साम्यसिद्धांत' आणि दुसऱ्या धारणेला अनुसरन 'द लॉ ऑफ कॉण्टॅक्ट ऑर कण्टेजिन' म्हणजे संपर्क सिद्धांत मांडला.

बाहुलीचा यातुक्रियेसाठी आदिम समाजात आणि आजच्या कित्येक आदिवासी तसेच परपराप्रिय समाजात केला जाणारा प्रयोग 'साम्यसिद्धांत' प्रकारात येतो. म्हणजे ज्या वस्तूला इजा करायची आहे त्या वस्तूसारखी

दिसणारी किंवा त्या वस्तूची प्रतिकृती असलेल्या वस्तूला इजा केली तर प्रत्यक्ष जिला इजा करायचा उद्देश असतो त्यालाच ती होते. हे तंत्र अथवा शास्त्र इथे वारलेले दिसते.

आदिम काळी नरबळीची प्रथा होती. समूहाच्या किंवा टोळीच्या वंशवृद्धी आणि आर्थिक वृद्धीसाठी प्रामुख्याने आधी हे नरबळी दिले जायचे. यावेळी समूहातील एकाद्या व्यक्तीला आणि कित्येकदा राजाला (प्रमुखाला) बळी दिले जायचे, तर कधी एखादे 'मिथुन' (दाम्पत्य) बळी दिले जायचे. पुढे प्रत्यक्ष एकट्या माणसाला किंवा दाम्पत्याला बळी न देता त्याच्याजागी बाहुल्या बळी देण्यात येऊ लागल्या. (मातीच्या, पीठाच्या, भाताच्या किंवा इतर प्रकाराच्या) या संदर्भात माझ्या आमोणे गावातील उदाहरण देता येते. नव्या पंचमीला पिठाचे दोन गोळे करून त्यांना एका माडाच्या 'पोयींत' बसवून भरलेल्या नदीत सोडतात.

या गोळ्यांना 'होंवर' म्हणजे 'दाम्पत्य' असे संबोधले जाते. ही प्रथा आजही अस्तित्तत आहे. माझ्या मते बाहुली संकल्पनेचा जन्म येथेच, म्हणजे नरबळी देण्याच्या प्रथेतून झाला. पुढे हे तंत्र शत्रूचा नाश करण्यासठी किंवा दुसऱ्याला त्रास देण्यासाठीही वापरण्यात आले.

एखादा माणूस मेला तरी तो आपल्याला प्रिय असलेल्या माणसालाही/ माणसांनाही बरोबर किंवा लगेच घेऊन जातो अशी आदिमकाळी मानवाची धारणा होती. यातूनच मयत विधीत एक, दोन किंवा जी यातुतज्ज्ञाने (मांत्रिक, पुजारी, घाडी, भगत, गुरव किंवा समूह प्रमुखाने) ठरवलेली असतात ती बाहुली बळी द्यायची प्रथा नंतर सुरू झाली. आजही ग्रामीण भागात तंत्रविधीत पिठाची किंवा भाताची (शीत) बावली करून कापतात, बळी देतात. (पिठाच्या गोळ्यांना काजळ वापरून कान-नाक-डोळे रेखांकित करतात. स्त्री प्रतीत करायची असेल तर कुंकम टिळा लावतात.) तसेच वैदिक पद्धतीने केलेल्या मयत विधीत, एखाद्याचा प्राण जाते वेळी वाईट नक्षत्र अथवा चरण सापडला तर 'नारायण बळी' केला जातो. ज्यात बाहुली (बाहुल्या) बनवून बळी देतात. बाहुलीच्या यातुविद्येशी जुळलेल्या या संबंधातून पुढे यातुकार्यासाठी लाकडाच्या, कापडाच्या किंवा मेणाच्याही बाहुल्या बनवून वापरण्यात येऊ लागल्या. कापसाच्या बाहुल्या वापरात असल्याचही माहिती सापडते. अपेक्षित

माणसाला ठार मारायचा नसेल; परंतु त्याला त्रास द्यायचा असेल तर मग तसेच त्रासही बाहुलीला देण्यात येऊ लागले. यात तिला सूया टोचणे हा प्रमुख होता. अशा टोचण्यामुळे त्या माणसाला अतीव वेदना होतात, संबंधित भागातून म्हणजे बाहुलीच्या ज्या भागाला सूया टोचल्या, त्याप्रमाणे प्रत्यक्ष माणसाच्या अवयवातून कधी कधी रक्तही येऊन तो मरतो असा समज होता.

माझ्या मते सुरवातीला समूहातील प्रमुख अथवा नियुक्त मात्रिक बाहुल्याशिवाय, कवटी-हाडे, लिंबू, अंडे, भात, पक्षाचे पीस किंवा अपेक्षित माणसाच्या वापरातील वस्तू वगैरे वापरून जादुटोणा करीत असत. पुढे बाहुल्यांचे तंत्र विकसित होत गेले आणि तेच विशेष रुपाने तो हाताळू लागला. यात तो पारंगत झाला आणि 'बाहुलीकारांचे घराणे' म्हणून त्याला नाव पडले. जादुटोणा करण्याच्या हेतूने नाचवण्यात येणाऱ्या प्रयोगातून आणि साध्य केलेल्या मंत्रातून पुढे 'बाहुल्या नाचवण्याची कला' जन्माला आली.

'कठपुतली' आणि चामड्यांच्या बाहुल्या या दोन्ही प्रकारांच्या बाहुल्यांमध्ये चामड्याच्या बाहुल्या हा प्रकार जुना मानतात. या प्रकाराला इंग्रजीमद्ये 'शेडो पपेट' म्हटले जाते. म्हणजे त्या सावल्यांच्या रुपात पडद्यावर दिसतात. यांच्या सूत्रधाराला जादुटोणा करण्यात पारंगत असलेला माणूस असे ग्रामीण भागात मानले जाते. माझ्या लहानपणी गावात या चामड्याच्या बाहुल्या यायच्या त्या वेळी पणजी ओरडायची, ''त्याच्या जास्त जवळ जाऊ नका, जादू करील तो तुमच्यावर!'' पणजीच्या बोलण्यात कदाचित बाहुल्यांच्या प्रागइतिहास काळातला दुवा जोडलेला असावा, असे आज मला वाटते.

प्रागइतिहास काळात जन्माला आलेल्या मातीच्या किंवा पिठाच्या गोळारुप बाहुलीने आज नव्या तंत्रज्ञानाच्या आधारे नवे रुप धारण केलेले आहे. तिचे पूर्वीचे जादुटोण्याचे साधन हे प्रयोजनही बदलून एक खेळण्याचे स्वरुप तिला प्राप्त झालेले आहे.

मात्र आपल्या पूर्वरुपांतून तिने पूर्णपणे फारकत घेतलेली नाही. अजूनही खेडो-पाडी तिचे मूळचे रुप आणि प्रयोजन दृष्टीपथास येते.



३३

# अतिमानवी योनी : मानवाच्या स्थैर्यकाळात जन्मलेली एक गूढशक्ती

आदिम मानवाला या विश्वाच्या अस्तित्त्वाचे गूढ होते. आपण वस्ती करून असलेली ही पृथ्वी म्हणजे काय? ती कशी जन्माला आली? पृथ्वीच्या डोक्यावर असलेले हे आकाश, हे नभोमंडळ याची उत्पत्ती कशी झाली? आकाशाच्या पलीकडे काय आहे? पृथ्वीच्या खाली, म्हणजे आपण उभे असलेल्या भूमीखाली काय आहे? अशा शेकडो प्रश्नांनी तो त्रस्त होता. मग त्याने आपल्या कुवती आणि कल्पकतेप्रमाणे या प्रश्नांना उत्तरे शोधली आणि या उत्तरांना अनुसरून तो आपले जीवन व्यवहार साध्य करू लागला. यातून पृथ्वीच्या निर्मितीच्या, चंद्र-सूर्य, तारे-ग्रह इत्यादींच्या जन्माच्या कितीतरी मिथककथा जन्माला आल्या.

प्रत्येक भाषेत आणि संस्कृतीत अशा मिथककथा सापडतात. आदिवासी समाजातील मिथककथा तर खूपच कल्पक, रंजक आणि रुढ संकल्पनांना धक्का देणाऱ्या आहेत.

विश्वासंबंधीत मिथकांच्या आणि कल्पनांच्या निर्मितीचा हा काळ, मानवाने आपली शिकारी अवस्था पार करून एका जागी स्थिर अशा शेती अवस्थेत पदार्पण केले, तो काळ असे अनुमान काढता येते. शिकारी अवस्थेत भक्ष्याच्या शोधात वणवण फिरताना जगाच्या व ब्रह्मांडाच्या गोष्टी करण्याची मुभा मानवाला नव्हती. त्याच्यासमोर मात्र शिकार मिळवणे आणि आपले आपत्तीपासून रक्षण करणे हाच मोठा प्रश्न होता. भावनिक आणि काल्पनिक जगाला तिथे थारा नव्हता. शिवाय त्याची मानसिक स्थितीही जनावरांपेक्षा

खूप जास्त प्रगत नव्हती.



अप्सरा ही स्वर्गात वास करणारी अतिमानवी योनी अशी धारणा लोकमानसात प्रचलित आहे.

शेती अवस्थेतला त्याचा प्रवेश त्याच्या जीवनाला स्थिरता देणारा होता. ग्रामसंस्कृती अथवा 'ग्राम' संकल्पनेचा पाया इथेच रचला गेला. या काळापर्यंत पूर्वीच्या वन्य अवस्थेपेक्षा त्याची मानसिक आणि बौद्धिक स्थिती बरीच सुधारलेली होती. मिथककथांचा आणि कल्पक गोष्टींचा उदय मानवाच्या याच अवस्थाकाली झाला. मानवाच्या कल्पकतेतून उदयाला आलेल्या कित्येक विलक्षण गोष्टींमधील एक महत्त्वाची संकल्पना म्हणजे 'अतिमानवी योनी'. पृथ्वीच्या वर म्हणजे आकाशात (अवकाशात) काय आहे? तसेच पृथ्वीच्या खाली काय आहे? या मानवाला पडलेल्या गूढातून या संकल्पनेची निर्मिती झाली.

आपल्या कल्पकशक्तीच्या आधारे मानवाने अवकाशात तसेच पृथ्वीखाली पाताळात एक जग आहे अशी कल्पना आकाराला आणली. अवकाशातील जगाला त्याने 'स्वर्ग' (स्वर्गलोक) असे नाव दिले तर पृथ्वीखालील जगाला 'पाताळ' (पाताळ लोक) असे नाव दिले. या दोन्ही जगातही 'लोक' वास्तव्य करतात अशीही कल्पना केली. त्याचबरोबर पृथ्वीतलावर राहणाऱ्या लोकांपेक्षा या लोकांच्या अंगात एक वेगळी असामान्य-अचाट शक्ती वास करते, अशीही कल्पना केली. पृथ्वीवरील आपल्या मानवी लोकांच्या मर्यादाही ठरवल्या. आपण मानव त्यांच्यापेक्षा सामान्य असेही ठरवले.

धड 'देव' नाहीत आणि धड आपल्यासारखे मानव नाहीत, अशा मध्य अवस्थेतील हे स्वर्ग-पाताळात वास्तव्य करणारे लोक, जन्मतःच अंगात

गूढ, चमत्कारिक आणि विलक्षण शक्ती असलेले, पाहिजे तेव्हा, पाहिजे तिथे संचार करू शकणारे, पाहिजे ते रुप घेऊ शकणारे आणि 'भूलशक्तीत' (मायावी) पारंगत असलेले, अशी त्यांची कल्पक निर्मिती करून मानवाने त्यांना 'अतिमानवी' योनीचे लोक म्हणून संबोधले आणि मग आपल्या सांस्कृतिक व्यवहारात त्यांना समाविष्ट करून घेतले.

'अप्सरा' ही स्वर्गातील अतिमानवी योनी तर 'नाग' ही पाताळातील अतिमानवी योनी असे भारतीय लोकमानसाने कल्पिलेले आहे. 'परी'ची जी कल्पना युरोपियन लोकसंस्कृतीत सापडते; ती भारतात नाही. (इथे एखादा अपवाद असू शकतो)

'अप्सरा' ही गायन-नृत्य या कलांत पारंगत असलेली स्वरुप-सुंदर अतिमानवी स्त्री. तिचे लोकमानसाने कल्पिलेले रूप म्हणजे, मानवी मनाने आपली वन्य-पशुअवस्था पार करून रसिक आणि कलात्मक जगात प्रवेश केल्याचे प्रमाण.

'नाग' हा खरा तर एक प्राणी; परंतु त्याच्या भूशिरांत शिरण्याच्या गुणाच्या व्यवहारावरून तसेच पुरुषलिंगसदृश आकृतीवरून आदिम मानवाने त्याला अचाट शक्तीची अतिमानवी योनी मानलेले दिसते. यातूनच, म्हणजे नाग भूशिरांत जातो त्यावरून पृथ्वीखाली एक जग आहे, हे 'नागलोक' किंवा 'पाताळलोक' अशी कल्पना जन्माला आली. 'नाग' जगभरच्या प्राचिन संस्कृतीत सापडतो.

डॉ. प्रभाकर मांडे यांच्यासारख्या विद्वानांनी राक्षसालासुद्धा अतिमानवी योनीत वर्गीकृत केलेले आहे. (लोकसाहित्याचे अंतःप्रवाह, पृ. ६५, ६६, ६७)

माझ्या मते मात्र राक्षस हा या योनीत समाविष्ट होत नाही. कोकणी लोककथा आणि लोकसांस्कृतिक व्यवहारात त्याच्या अद्भूत आणि अचाट शक्तीचा अपवादानेच उल्लेख सापडेल. मात्र त्यांच्या मानवापेक्षा जास्त ताकदीचे आणि बळाचे वर्णन सर्रास सापडते. शिवाय 'राक्षस' ही एक मानवी जमात हे आज सिद्ध झालेले आहे.

गोव्याच्या लोकमानसाने दोन अतिमानवी शक्ती प्रामुख्याने कल्पिलेल्या आहेत. त्यातील एक आहे 'देवचार' आणि दुसरी 'रंभा'.

देवचार या शक्तीचा वास भूतलावर असतो, परंतु ही शक्ती आपल्या

मूळ रुपात कोणालाच दिसत नाही. ज्या वेळी तिचे दर्शन होते तेव्हा ती वयस्क गावकऱ्याच्या रुपात दिसते. तिच्या अंगी अचाट शक्ती असते आणि ती ग्रामस्थांना हाकेला पावते, गावच्या रक्षणार्थ कार्यरत असते. भूतलांवरील एखाद्या विशिष्ट झाडावर तिचे वास्तव्य असते, अशी धारणा आहे.

'रंभा' (बहुवचनी सुद्धा रंभा असाच उल्लेख होतो)चे स्वरूप अप्सरेसारखेच असले तरी कोकणी लोकमानसाने निर्मिलेली रंभा, प्राचिन अभिजात साहित्यातील 'अप्सरा' या संकल्पनेपेक्षा बरीच वेगळी आहे. 'रंभा' या देव दरबारातील नृत्यांगना मानल्या तरी पृथ्वीतलावर त्यांचे कार्य वेगळे आंखून ठेवलेले आहे. 'धालो' या येथील मूळ रहिवासी जमातींच्या नृत्योत्सवात त्यांना मांडावर मध्यरात्री अवतरावे लागते. नागबाळाच्या किंवा बंधवाच्या सवे त्यांचा संयोग व्हावा लागतो, ज्याद्वारे भूमातेचे सुफलीकरण निश्चित केले जाते. प्रतिकात्मक रुपात किंवा मानवी शरीरात संचारण्याच्या स्वरुपात त्यांचे आगमन होते.

कोकणी संस्कृतीतील रंभांची संख्या सुद्धा निश्चित केलेली आहे. त्या मूळ एकवीस बहिणी; परंतु पुढे त्यांच्या संख्येत घट होऊन त्या 'सात' राहिल्या. पुराण वाङ्मय अथवा प्राचिन वाङ्मयातील अप्सरांची नावे रंभांच्या नावापेक्षा विभिन्न आहेत. उदा. मेनका, उर्वशी, रंभा वगैरे. याच्या उलट कोकणी लोकसंस्कृतीत 'रंभा' हे अतिमानवी स्त्रियांचे वर्गवाचक नाव आहे. या रंभांच्या अचाट कर्तृत्त्वाच्या कितीतरी कथा कोकणी लोककथा भांडारांत सापडतात. या कथांत, त्यांचा संग 'म्हातारेच्या पोराशी' अथवा धाकट्या भावाशी होतो, जे येथील लोकसंस्कृतीचे पुरुष प्रतिनिधी म्हणून पुढे येतात. त्यांच्यावरचे एखादे संकट अथवा गूढ सोडवण्यात रंभा त्याला मदत करते किंवा आपल्या अचाट शक्तीने ते सोडवते.

विदेशी भाषांतील लोककथांत जशी 'परी' किंवा 'Ferry'ची कल्पना आहे, जिला पंख असतात, जी उडू शकते, तीच्या हातात मंत्रसिद्ध करण्याची कांडी असते वगैरे किंवा एखादा अद्भूत शक्ती अंगात असलेला म्हातारा जो प्रकट होऊन मुलांना खाऊ वगैरे वाटतो, अशा संकल्पना कोकणी लोककथांत सापडत नाहीत, मात्र येथील देवचार आणि रंभा आणि तेथील परी आणि म्हातारा यांच्या कार्यकारणात बरेच साम्य दिसते. ●●●

३४.

# केस :
# आत्म्याचे वसतिस्थान, आदिमांची धारणा

स्वतःचा देह, त्याची रचना, त्याचे व्यवहार याचेसुद्धा मानवाला अतीव गूढ वाटले होते. मानवी देह येतो कुठून? त्यांत चैतन्य कसे निर्माण होते? मृत्यूनंतर अथवा ते चैतन्य देहातून निघून गेल्यानंतर, तो देह नाश कसा पावतो? अचेतन कसा होतो? अशा तऱ्हेकवार प्रश्नांबरोबर रक्त, मांसपेशी आणि अस्थी या तीन घटकांपासून रचना झालेल्या मानव देहावर रक्त-मांसरूप नसलेले केस कसे उगवतात? का उगवतात? त्यांचे प्रयोजन काय? हेसुद्धा एक मोठे गूढ त्याला पडले होते. एका दृष्टीने केसांसंबंधी एक गूढ भीतीच त्याच्या मनात निर्माण झाली होती. मग त्या भीतीतून कित्येक समज आणि धारणा उत्पन्न झाल्या. या धारणा आणि समजांचा प्रभाव अजूनही काही प्रमाणात लोकमानसावर दिसतो. मात्र कालप्रवाहात त्यांच्या निर्मितीमागचे प्रयोजन समाज विसरलेला असून त्याला वेगळेच प्रयोजन जुळलेले दिसते.

केसांविषयीच्या गूढयुक्त भीतीमुळे आदिम मानव केस कापण्यास धजावत नसे. नुसते डोक्यावरचे एक 'जावळ' कापण्याची सुद्धा त्याची छाती होत नव्हती. डोके हे माणसाच्या देहात वास करणाऱ्या आत्म्याची बसण्याची जागा आणि केस हे त्या आत्म्याचे संरक्षण करणारे संरक्षक अशी आदिम मानवाची समजुत होती. आपल्या जीवनाच्या आरंभीच्या काळी मानव या समजुतीने एवढा प्रभावित होता की तो कधीच आपले केस धूत नसे किंवा कापत नसे. तसे केले तर आपल्या डोक्यात वास करणाऱ्या किंवा बसलेल्या आत्म्याला इजा होईल, दुखापत होईल त्याचा अपमान होईल अशी भीती

त्याला होती. पुढे आपल्या मानसिक विकासपथावर मार्गक्रमण करता करता या समजाला पूरक असे पर्याय त्याने शोधले. कधी वर्षातून एकदाच किंवा अमुक दिवशीच डोके धुवायचे, अमुक व्यक्तीच्या (टोळीचा किंवा समूहाचा प्रमुख, पुरोहित वगैरे) हातातूनच डोके धुवून घ्यायचे, अमूक दिवशीच, वर्षातून अमूक वेळाच (सुरवातीला एकदाच) केस कापायचे. केस कापताना आत्म्याला आवाहन करायचे, त्याची माफी मागायची... वगैरे वगैरे. पुढे पुढे तर लहान मूल आणि स्त्री यांनी केस कापू नयेत, इतरांनी म्हणजे पुरुषांनी कापावे, असा पर्याय शोधला गेला.

आज सर्वसामान्याला ऐकायला विचित्र वाटाव्या किंवा कल्पित वाटाव्या अशा या वरील धारणा आहेत. फ्रेझरनी जगातील कित्येक आदिम जमातींचे सर्वेक्षण करून केसांसंबंधीच्या त्यांच्या अशा धारणांची माहिती त्यांच्या 'गोल्डन बाव' या ग्रंथात दिलेली आहे. त्याची काही उदाहरणे येथे विषयाला पूरक म्हणून देता येतील.

स्लेव कोस्ट येथील योरुबा जमातीचे लोक प्रत्येक मानवाच्या शरीरात तीन आत्मे वास करतात असे समजतात. त्यातील 'ओलोरी' हा आत्मा जो त्या मानवाचा रक्षक किंवा पालक असतो तो डोक्यावर वास करतो असे मानतात आणि डोक्याला कसलीच इजा करायला म्हणजे केस कापायला वा धुवायला धजत नाहीत. या ओलोरी आत्म्याला ते पक्षाचा बळी देतात आणि त्याचे रक्त आणि पाम तेल एकत्र करून त्याने कपाळाला मालीश करतात.

सयामी लोकांमध्ये कुणाच्या डोक्याला पाय लावण्याची परवानगी नाही. एखाद्या माणसाकडून अनावधानाने सुद्धा ते घडले तर त्या माणसाने आणि ज्याचे डोके आहे त्या माणसाने एकत्र येऊन आत्म्याचा कोप टाळण्यासाठी एक देऊळ बांधावे लागते.

आत्म्याला परत परत डोके धुणे ही गोष्ट अपमानित वाटते या समजाने बर्मी राजा अमूक दिवशीच डोके धुवायचा, ते सुद्धा अमूकच नदीचे पाणी आणून आणि त्या धुण्याला उत्सवाचे रूप यायचे.

पर्शियन राजाचे डोके वर्षातून एकदाच त्याच्या वाढदिवसाच्या दिवशी धुतले जायचे, तर रोमन स्त्रिया त्यांचे डोके वर्षातून एकदाच १३ ऑगस्टला जो देवी डायनाचा दिवस मानला जातो, त्या दिवशी धुवायच्या.

मार्कुशियन लोकांमध्ये कुणाच्याही डोक्याला हात लावण्यावर निर्बंध आहेत. खास वडिलांनी सुद्धा मुलांच्या डोक्याला हात लावता कामा नये किंवा त्याच्या डोक्यावर टांग घालता कामा नये असे बंधन आहे. हा निर्बंध स्त्रीयांवर सुद्धा या जमातीत आहे. त्यांना स्वतःच्या नवऱ्याच्या डोक्याला हात लावण्यास मान्यता नाही.

कंबोडियन लोकांमध्ये प्रत्येक माणसाच्या डोक्याला मान द्यायला हवा अशी धारणा आहे. खास करून राजाच्या डोक्याला. केनियाच्या 'वा-सिंगी' लोकांमध्ये मुलांचे केस कापण्याचा मोठा सोहळा होतो. या दिवशी समूहातील सगळ्या मुलांचे एकत्रितपणे विधियुक्त केस कापतात. या दिवशी सुद्धा एखाद्याचा दुसऱ्याच्या डोक्याला किंवा केसांना हात लागणार नाही याची काळजी घेतली जाते आणि त्यासाठी जमलेल्या प्रत्येक मुलाचे डोके चामड्याने किंवा कपड्याने झाकले जाते.

डोके हे आत्म्याचा वास करण्याची पवित्र जागा, या धारणेला अनुसरून जशी त्याला कोणी दुखापत करणार नाही याची काळजी आदिमांमध्ये घेतली जायची, केस कापतानाही अत्यंत दक्षता बाळगली जायची. त्याचबरोबर कापलेल्या केसांची (जावळ) सुद्धा काळजी घेतली जायची. कारण केस कापले तरी त्या केसांचा माणसांच्या शरीराकडे संबंध राहतो आणि जर त्या छाटलेल्या केसांना कुणी काही इजा केली, ते पायाखाली चिरडले किंवा त्यांना आग लावली तर ज्या माणसाचे केस आहेत त्याला त्याचा त्रास होतो म्हणूनच या केसांची व्यवस्थित विल्हेवाट लावली जायची. ते एक तर जमिनीत खड्डा खणून पुरले जायचे किंवा पाण्यात सोडले जायचे. कधी कधी एखाद्या पुरातन वृक्षाच्या ढोलीत ते लपवले जायचे. या संबंधाने एक उदाहरण फ्रेझर देतात ते म्हणजे, अरु बेटावरच्या स्त्रिया त्यांच्या मुलाचे जावळ कापले की ते घेऊन पळत जातात आणि केळीच्या झाडावर लपवतात.

पश्चिम आफ्रिकेच्या तोगोलॅंड भागातील हॉस या निग्रो जमातीमध्ये इतरांनी केस कापले तरी त्यांच्या पुजाऱ्याला (प्रिस्ट) केस कापायला मिळत नाहीत. डोक्याला वस्तरा लावला, तर त्यांच्या डोक्यावर वस्तीला असणाऱ्या देवाला इजा होईल अशी त्यांच्यात भीती असते. फ्रॅंकीशन राजाला केस कापण्याची मान्यता नसते आणि जीवनभर त्याने ते तसेच मोकळे सोडायला हवे असतात.



**यातुकर्मामध्ये केसांना महत्त्व दिलेले आहे.**

इजिप्शियन लोकांमध्ये वरील धारणेचे पर्याय रुप दिसते. ते इतर वेळी केस कापतात, परंतु प्रवासात असताना केस कापत नाहीत. प्रवासातून आल्या आल्या रब्बाची भेट घेऊन ते केस कापतात.

असाच पर्याय युगांडामध्ये आहे. मूल अमूक वयाचे झाले की ते केस कापतात. मात्र केस कापण्याआधी त्याचे नामकरण व्हायला पाहिजे, अशी अट आहे.

जसे निर्बंध डोक्यावरच्या केसांवर होते, तसेच दाढी–मिशांच्या केसांवरसुद्धा होते, जे पुढे सैल होत गेले. नखे आणि थुंकीची सुद्धा आदिमांनी काळजी घेतल्याची माहिती सापडते. या दोन्ही गोष्टींची ते योग्य जागी विल्हेवाट लावायचे, नाही तर त्या कुणा जादूगार–चेटक्याच्या हातात सापडल्या तर आपला घात होईल, अशी त्यांना भीती होती. काही राजा तर आपल्या थुंकीची विल्हेवाट करण्यासाठी खास नोकर नेमायचे. उदा. आफ्रिकेचा स्लेव कोस्ट राजा.

नखांच्या संबंधाने लहान मुलांच्या बाबतीत अतिशय काळजी आदिम समाजात घेत असल्याचे संदर्भ सापडतात. उदा. युरोपमध्ये एक वर्ष होईपर्यंत मुलांची नखे कापली जात नव्हती. जर वाढली तर आईने स्वतःच्या दाताने ती कुरतडायची असतात. लहान मुलांच्या बाबतीत दुष्ट आत्म्याचा प्रभाव होण्याची जास्त शक्यता असते म्हणून ही काळजी. त्याची नखे, कापलेले

जावळ या गोष्टी गुप्तपणे विल्हेवाट लावल्या जायच्या.

गोव्यातील लोकमानसात सुद्धा केस, नखे यासंबंधी काही समज आजही रूढ असलेले दिसतात. उदा. केस-दाढी शनिवारी करू नये. आपल्या जन्मदिवशी करू नये. रात्रीचे केस कापू नयेत. स्त्रियांनी डोक्याला कात्री लावू नये, लहान मुलाचे वर्षाआधी 'जावळ' करू नये. त्याचे केस विधियुक्त म्हणजे देव-देवतांना आवाहन करून कापायचे. त्याचे कापलेले केस कुणाच्या पायाखाली पडता कामा नये. लहान मुलाची वर्ष होईपर्यंत नखे कापू नयेत. वाढली तर आईने दाताने कुरतडायची. रात्रीची नखे कापू नयेत. एवढेच कशाला, मुलाचे पडलेले दुधाचे दात सुद्धा कुणाच्या पायाखाली पडता कामा नये, या समजाने ते सात खड्यांच्या आणि सात शिंपल्याच्या तुकड्यांबरोबर घराच्या छपरावर फेकले जातात.

माझ्या मते, केस किंवा नखे यांच्या संबंधाने आज गोव्यात ज्या धारणा आहेत त्यांचे प्रयोजन वेगळे दिसले तरी मूळ आदिम धारणेशी त्यांचा संबंध असला पाहिजे. सारा समाज एकेकाळी एकाच तऱ्हेच्या सामूहिक जाणीवेने भारावलेला होता याचे हे प्रमाण आहे. आजही भारतात साधू-यती लोक केस वाढवतात. अंगात दैवी शक्ती संचारली असा समज असलेले इतरही लोक केस कापत नाहीत. दाढी-मिशांना वस्तरा लावत नाहीत. काही लोकांच्या डोक्यावर 'जटा' येतात (केसांच्या लटांचा गुंता होतो). या जटा येणे म्हणजे अंगात दैवी शक्ती अवतरल्याचे प्रतीक म्हणून त्या खूप लोक कापत नाहीत, जन्मभर त्या वाढवतात, घेऊन जगतात. असे बरेच लोक नंतर दैवीक व्यवहार करतात. स्वतःला 'बंठ' (पुरुष) किंवा 'बंठिणी' (स्त्रिया) मानतात. या साऱ्यामागे डोक्यावर किंवा केसांत आत्मा किंवा दैवी शक्ती वास करते या आदिम धारणेचा प्रभाव आहे.



३५.

# गाठ :
# आत्म्याला बांधून ठेवण्याचे एक यातुतंत्र

मूळ एक यातुतंत्र म्हणून उगम झालेले आणि कालप्रवाहात सुरक्षेचें साधनरूप प्राप्त झालेली कृती म्हणजे 'गाठ' (नॉट). आदिम काळी स्वतःच्या आत्म्याला आपल्या देहातून भ्रमण करण्यावर किंवा दुसऱ्या देहात प्रवेश करण्यावर बंदी घालण्याच्या उद्देशाने (बांधून ठेवण्याच्या) या गाठीचा जन्म झाला. पुढे त्याला इतर दुष्ट शक्तींना रोखण्याचेही उद्‌दीष्ट जुळले. एक सुरक्षा कवच या अर्थाने त्याचा वापर होऊ लागला.

या तंत्राचा उगम मानवाने स्वतःच्या देहाभोवती कपडे किंवा चामडे (पाने, डहाळ्या वगैरेसुद्धा) याचे आवरण गुंडाळण्यास सुरवात केली याच्या आधी झाला आणि त्याची केसांपासून सुरूवात झाली असेच एकंदर प्रमाणांवरून सिद्ध होते. केसांत आत्मा वास करतो, या समजामुळे आदिम काळी मानव केस धूत नव्हता, छाटत (कापत) नव्हता. त्या वास करणाऱ्या आत्म्याला डोक्यावरच बांधून ठेवण्याच्या उद्देशाने मानवाने सर्वप्रथम आपल्या वाढलेल्या केसांना गाठ मारायला सुरवात केली, असे अनुमान काढता येते.

केसांना गाठ मारण्याची प्रथा आजही समाजात दिसते. देश-विदेशात कित्येक धार्मिकस्थळांत पुजारी, धर्मगुरुंनी केस वाढवलेले दिसतात आणि या कमरेवर किंवा पाठीवर रुळलेल्या केसांच्या खालची टोके एकत्र करून त्यांना गाठ मारलेली दिसते. हे धर्मगुरू कोपिष्ट किंवा क्रोधीत होतात तेव्हा ते केसांची गाठ सोडवून, केस मानेवर विखरून थयथयाट करतात, अशा गोष्टी सांगितल्या जातात. नाटक-सिनेमांमध्ये तसे चित्रणही दाखवले जाते. प्राचिन संस्कृतींची जी चित्रे-शिल्पे उपलब्ध आहेत, त्यात धर्मगुरू अथवा देव-

देवतांच्या भगतांनी, पुरोहितांनी केस वाढवून त्यांना गाठ मारलेली दिसते. मूळ आदिम संस्कृतीतली प्रथा वैदिक आर्यांनीही उचलली म्हटल्यास वावगे ठरणार नाही. आज वैदिक पद्धतीने केल्या जाणाऱ्या मौजीबंधनात 'बटू'चे चौल्य कर्म केले जाते. यात केसांचा गोटा केला जातो. मात्र मध्ये वर्तुळाकारात थोडे केस ठेवले जातात. कोंकणीत याला 'भोंवरा करणे' म्हणतात. या केसांना गाठ मारली जाते. त्याला 'शेंडी' असेही म्हणतात.

अवैदिक संस्कृतीतही शेंडी ठेवण्याची प्रथा होती. अजूनही कुळंबी- गावडी समाजातील वडील-जाणत्या पुरुषांनी डोक्यावर केस वाढवले तरी त्यांत केसांची एक लट वाढवून तिला गाठ मारलेली असते. जवळच्या व्यक्तीच्या मृत्यूप्रसंगी जेव्हा ते केसांचा गोटा करतात, त्यावेळी ही लट किंवा शेंडी मात्र राखून ठेवली जाते.

या प्रथा बघितल्यावर, स्वतःच्या केसांत, स्वतःच्या आत्म्याला बांधून ठेवण्याची आदिम काळी उदयाला आलेली धारणा आजही समाजात काही अंशी जिवंत आहे, हे स्पष्ट होते.

माझ्या मते स्त्रियांच्या डोक्यावरचा 'अंबाडा' (खोपा) हेसुद्धा गांठीचेच द्योतक असावे. आधीच्या स्त्रिया डोक्यावरील केसांना पीळ देऊन त्यांची नुसती गाठ बांधायच्या. यात पुढे कलात्मकतेचा प्रवेश झाला आणि आंबाड्याचे अनेक प्रकार निर्माण झाले. मात्र वडील-म्हाताऱ्या स्त्रिया आजही गाठ घालूनच केस बांधतात. आदिवासींमध्ये हे चित्र सर्रास दिसते. केसांची वेणी हे गाठीचेच पुढचे पाऊल म्हणावे लागेल. पुरुषांच्या डोक्यावर आत्मा वसतो, तसाच तो स्त्रियांच्या डोक्यावरही वसतो. पुरुषांना जशी त्याला सांभाळायची गरज आहे, तशीच स्त्रियांनाही आहे, या भावनेतून पुरुषांनी जसे केसांना गाठ मारून आत्म्याला बंदिस्त करून ठेवले तसेच आदिम काळी स्त्रियांनीही ठेवलेले दिसते.

केसांपासून सुरू झालेल्या गाठीचे हे तंत्र पुढे कपड्यांपर्यंत गेल्याचे संदर्भ सापडतात. अंगावरच्या कपड्याना गाठ मारणे, म्हणजे 'गाठीने बांधणे' या मागे सुद्धा त्या शरीरातील आत्म्याला त्यात बांधून ठेवण्याचा समज दिसतो.

यातून पुढे, मृत्युशय्येवर असलेल्या, म्हणजे ज्याचा मृत्यू अपेक्षित आहे अशा व्यक्तीच्या अंगावर गाठ ठेवता कामा नये, असा समज रुजला. बाळंतपणाच्या वेळी सुद्धा त्या स्त्रिच्या अंगावरच्या सगळ्या गाठी सोडवायला

हव्यात नाहीतर तिच्या उदरातून जन्माला येणाऱ्या नवजीवाचा आत्मा अडखळतो, अशी धारणा असल्याची माहिती सापडते. लग्नाच्या वेळी सुद्धा अशा प्रथा पाळल्याची माहिती सापडते. यामागे कदाचित लग्नविधीने नवरा-नवरीचा आत्मा एकरुप होतो, तो होण्यावर बंधन येऊ नये, हा उद्देश असावा. या संबंधाने काही उदाहरणे अशी आहेत : ट्रान्सल्विनिया येथील सेसोन्स जमातीमध्ये स्त्री बाळंतवेदना भोगताना तिच्या अंगावरचे सगळे कपडे, गाठी-हुके सोडवून सैल करतात. तसे केले नाही तर तिचे मूल अडकते, असा समज आहे. एवढेच नाही, तर त्या समाजात, या वेळी घराची सर्व दारे, खिडक्यासुद्धा खुली ठेवावी लागतात. सुष्ट, अदृश्य शक्ती त्यातून आत येऊन तिला बाळंत होण्यासाठी मदत करतात अशी धारणा आहे.



**अवैदिक आणि वैदिक दोन्हीही समाजामध्ये शेंडीची प्रथा आहे.**

लाप्स लोकांमध्ये बाळंत होणाऱ्या स्त्रीच्या कपड्यांच्या गाठी सोडल्या नाहीत तर तिला बाळंत होताना खूप कष्ट भोगावे लागतात, असा समज आहे.

भारतातील काही जमातीमध्येही अशी प्रथा असल्याची माहिती मिळते. रोमन धर्मामध्ये बाळंतपणाची देवी ज्युनो लुसिना हिला, तिचे कार्य चालू असताना कोणत्याही गाठीची अडखळ चालत नाही, अशी धारणा आहे.

बाळंत होणाऱ्या स्त्रीच्या अंगावरच गाठ असता कामा नये, असे नाही तर काही समाजात मुलाच्या बापानेसुद्धा हे पथ्य पाळावे लागत असल्याचे संदर्भ मिळतात. तोम्बुलूल उत्तर सेलेब्स जमातीत बायको बाळंत होत असताना तिच्या नवऱ्यानेही आपल्या कपड्यांच्या साऱ्या गाठी सोडाव्या लागतात आणि पाय पसरून बसावे लागते. बायको चार महिन्यांची गरोदर असतानाच त्याने आपल्या गाठी सैल कराव्या लागतात, तसेच त्याने पायावर पाय टाकून बसायची परवानगी नसते.

मध्य ऑस्ट्रेलियाच्या कैतीश जमातीमध्ये सुद्धा अशीच प्रथा असल्याचे

संदर्भ मिळतात. या जमातीत स्त्री बाळंत होताना, आपल्या अंगावरचे सगळे पट्टे, दोऱ्या, बंध, घरी सोडून तिच्या नवऱ्याला तीन दिवस अज्ञातवासात जावे लागते. त्याने मागे ठेवलेले बंध हे त्याने अंगावर कोणतीच गाठ ठेवली नसल्याचे प्रमाण मानतात.

जगातील विविध जाती-जमातींमध्ये गाठीसंबंधी असलेल्या धारणांचा अभ्यास केल्यास, एक विचार मनात झटकून जातो, तो म्हणजे, गोव्यातील गावडी-कुळंबी या आदिवासी जमातींमध्ये स्त्रियांनी 'देठली' (गाठ) घालून कापड नेसण्यात येणाऱ्या पारंपरिक पद्धतीमागे, आत्म्याचे संरक्षण किंवा आपल्या आत्म्याने आपल्या देहातून बाहेर निघून जाऊ म्हणून केलेले मूळ यातुतंत्र तर नसावे?

'आठवण राहणार नाही तर केसांना गाठ मार!' किंवा 'आठवणीसाठी केसांना गाठ मारली' अशा स्वरुपाचे वाक्प्रचार कोकणी भाषेत सापडतात. या वाक्प्रचारामुळे केसांना गाठ मारणे ही कृती आठवणीचे एक तंत्र म्हणून पुढे येते. तसेच 'काळवैदास पुत्र', 'निळंबा कन्या' वगैरे लोककथांतून धाकट्या पुत्राला किंवा भावाला, ज्यांचा जन्म, त्याच्या पित्याचा राक्षसाने किंवा जादूगाराने कपटाने वध केल्यानंतर झालेला असतो, म्हणून त्यांना बरोबरची मूले खेळताना 'पोटाचो' (अनौरस) म्हणून हिणवतात, तेव्हा ते केसांना गाठ (गाठी)मारतात, ज्या सकाळी त्यांचे केस विंचरताना आईला दिसतात. ती त्या गाठीचे प्रयोजन त्यांना विचारते. तेव्हा ते घडलेली गोष्ट आईला सांगून वडिलांच्या मृत्यूचे कारण विचारतात, पुढे त्या दुष्टाचा वध करून मृत वडील तसेच इतर आप्तांना परत जिवंत करून घरी आणतात. नायिकेने आठवणीसाठी रुमालाला गाठी मारल्याचेही कथानक सापडते.

वरील वाक्प्रचार आणि कथानक यामधील गाठीमागचे प्रयोजन बघता ते आत्म्याला बांधण्याच्या प्रयोजनापेक्षा वेगळे दिसते. मात्र ते मूळ उद्‌देशापासून फार दूर गेलेले नाही, असे मला वाटते. दोन्ही प्रकारांत गाठींचा आत्म्याशी संबंध दिसतो. वाक्प्रचारात गाठ आत्म्याला जागृत ठेवण्याचे काम करते तर लोककथांतील गाठी पुत्राचा/पुत्रांचा आत्मसन्मान (आत्म्याचा सन्मान) जागवतात. या जागवण्यातून पुढे स्वकुटुंबाचे दुष्ट शक्तीपासून रक्षण करतात. दोन्ही गोष्टींमध्ये 'गाठ' यातुतंत्राचेच कार्य करते.



३६.

# गणपती :
# कुलप्रतिक उपासनेतून उदयाला आलेला देव

आपल्या पारधी अवस्थेपासूनच मानवाला या जगाच्या उत्पत्तीसंबंधी आणि व्यवहारासंबंधी एक गूढ पडले होते. मग आपल्या मर्यादित कल्पानाशक्तीतून त्याने या गुढावर उत्तरही शोधले होते. हे जग एका अज्ञात शक्तीने निर्मिलेले आहे, अशी त्याने कल्पना केली होती. तसेच ही शक्तीच या जगाचे व्यवहार नियंत्रित करते, ती अदृश्यरुपाने आपल्या सभोवताली वावरत असते, अशीही त्याने कल्पना केली होती. त्याच्या जीवनाचा अत्यंत अविकसित, रानटी, संघर्षमय असा हा काळ. या काळात त्याच्या कल्पनाशक्तीला अतिशय मर्यादा होत्या. जनावराचीं शिकार करायची, स्वतःचे पोट भरायचे, मैथुन करायचे, संतती निर्माण करायची एवढेच त्याचे जीवन व्यवहार होते. मात्र अशा अप्रगत अवस्थेतही त्या अज्ञात शक्तीविषयी त्याच्या मनात एक गूढ भीती होती.

ही शक्ती अचाट आणि भयानक आहे. या शक्तीच्या कृपेशिवाय आपण कोणतीही गोष्ट साध्य करू शकत नाही, अशी त्याची समजूत होती. यातूनच त्याने एका जागेवरून दुसऱ्या जागेत जाताना, शिकार करताना वगैरे या शक्तीच्या आवाहनात कितीतरी कृत्ये केली. आज आदिमानवाच्या अस्तित्त्वाच्या प्रमाण देणाऱ्या ज्या गुंफा अथवा स्थळे सापडलेली आहेत, त्यात त्यांच्या या कृत्यांच्या खुणा सापडतात. आजची आदिवासी नृत्ये किंवा लोकनृत्ये ही सुद्धा मूळ आदिम मानवाने या शक्तीच्या आवाहनार्थ केलेल्या नृत्यांतून उगम पावलेली आहेत, हे सर्वमान्य आहे.

कृषी अवस्थेत मानवाच्या कल्पनाशक्तीला धुमारे फुटले, त्यात कल्पकतेची भर पडली. आधी तो भयानक अशा गूढ शक्तीचे अस्तित्त्व

मानत होता, परंतु ती शक्ती त्याने निराकार स्वरुपात कल्पिली होती. त्या शक्तीचे दृश्य रुप त्याने निश्चित केले नव्हते. कृषी अवस्थेत त्याने आकारी रुपातील शक्ती कल्पिली. ही शक्ती एखाद्या क्षणी, एखाद्या माणसाला, ज्याच्या अंगी वशीकरणाची आगळी शक्ती असते किंवा विलक्षण ताकद असते अशा माणसालाच दिसते किंवा तिच्या असण्याचा आभास होतो अशीसुद्धा कल्पना त्याने केली. स्वर्ग-पाताळ लोकांची कल्पना करून त्यात तिचे वास्तव ठरवले. या शक्तीचे दृष्य रुप त्याने मानवी ठरवले तरी मानवापेक्षा तिच्या अंगी असामान्य शक्ती असते, अशीही कल्पना केली.



गणपती हा मूळ कुलप्रतिक म्हणून उदयाला आलेला देव.

अतिमानवी शक्तीच्या निर्मिती अवस्थेतून पुढे जाता जाता त्याने 'देव' संकल्पना उदयाला आणली. ही अदृश्य शक्तीची त्याने कल्पिलेली विकसित अवस्था. अदृश्य रुपात हे देवत्व या चराचरात वावरते ही कल्पना करून, प्रत्यक्षात भक्तगणांच्या दर्शनासाठी तिची त्याने दृश्य रुपात स्थापना केली. स्थल-कालपरत्वे या शक्तीला वेळोवेळी, प्रसंगानुरुप वेगवेगळी नावे दिली, त्यांचे कार्य निश्चित केले. त्यांच्या उत्पत्ती आणि चमत्कारासंबंधी विविध मिथककथा-दैवतकथांची रचना केली. त्यांच्या आराधनेचे, उपासनेचे वेगवेगळे प्रकार ठरवले.

प्राग अवस्थेतली निराकार गूढमय शक्ती ते कृषी अवस्थेत मानवी मानसाने कल्पिलेली आकारी दैवी शक्ती, यांच्या वाटेवर कुलप्रतिकाची कल्पना उदयाला आली. आपल्या कुलाचा जन्म एखाद्या विशिष्ट प्राण्यापासून, एखाद्या विशिष्ट वनस्पती किंवा झाडापासून झाला, असे मानून त्या कुलप्रतिकाची उपासना मानवाने केली. आज जे सांस्कृतिक अवशेष सापडतात त्यावरून दैवी शक्तीपेक्षाही कुलप्रतिकाचा प्रभाव आदिम समाजावर जास्त होता, हे सिद्ध होते.

या संबंधाने एक महत्त्वाचे उदाहरण देता येते. ते म्हणजे गणपती किंवा 'गणेश' या दैवताचे (देवाचे). एक सर्वशक्तीमान देव म्हणून पूजल्या जाणाऱ्या या देवाच्या उत्पत्तीसंबंधी कितीतरी धारणा वैदिक आणि अवैदिक समाजात सापडतात. लोकपरंपरेत (गोव्यात) या देवाच्या जन्माविषयी एक मिथककथा सापडते. ही कथा कधी ओवीच्या स्वरुपात, कधी फुगडी गीताच्या स्वरुपात तर कधी जतीच्या (शिगमोगीत) स्वरुपात सादर केली जाते. या मिथककथेत गणपतीच्या जन्मासंबंधी तसेच त्याच्या हस्तिमुख रुपासंबंधी स्पष्टीकरण सापडते. कथेचा सारांश असा :

पार्वतीचा पती महादेव (शंकर) शिकारीला जातो आणि पार्वती आपल्या गुंफेत एकटीच उरते. त्यावेळी ती स्वतःच्या अंगाचा 'मळ' काढून त्या मळाचे एक बाहुले तयार करते, मग या बाहुल्यात प्राण फुंकून त्याला सजीव करते. त्याला गुंफेच्या दारावर रक्षक म्हणून ठेवून ती स्नानाला जाते. एवढ्यात महादेव शिकारीहून परत येतो आणि गुंफेत शिरू लागतो, तसा तो रक्षकबाळ त्याला अडवतो. आपल्याच गुंफेत शिरायला, आपल्याला अडवणारा तू कोण? असा प्रश्न करून महादेव त्याचा शिरच्छेद करतो. त्याचवेळी पार्वती तेथे पोहोचते. आपल्या बाळाचा महादेवाने शिरच्छेद केलेला बघून ती अत्यंत क्रोधित होते. साऱ्या जगाचा विध्वंस होवो असा शाप द्यायला पुढे सरसावते. तसा महादेव तिला थोपवतो, तुझा बाळ मी जिवंत करून देतो, असे आश्वासन देऊन हत्तीच्या पागेत जातो. हत्तीच्या पिलाचे मुंडके छाटून ते आणून पार्वतीच्या पुत्राच्या धडावर लावतो. त्याला परत सजीव करतो.

हत्तीचे मुंडके लावलेला आणि महादेवाने परत सजीव केलेला पार्वतीचा हा बाळ म्हणजेच गणपती, असा लोकमानसात समज आहे. एकंदरीत भारतीय लोकमानसात त्याच्या हस्तिमुखासंबंधी पडलेल्या प्रश्नाला वरील कथानकच उत्तर म्हणून स्वीकारलेले दिसते.

मूळ मानवी रुपात जन्माला आलेल्या गणपती या देवाला महादेवाने शीर छाटल्यानंतर हत्तीचे मुंडके धडावर चिकटवून परत जिवंत केला आणि तेव्हापासूनच किंवा त्याच कारणास्तव तो हस्तिमुख बनला, अशी लोकमानसात दृढ धारणा असली तरी या विषयाचे संशोधन मात्र वेगळेच सत्य सांगते.

या विषयातील संशोधनाप्रमाणे गणपतीची उत्पत्ती अतिप्राचिन काली

कुलप्रतिक उपासनेतून झालेली आहे. त्याचे गणपती हे नाव 'गणप्रमुख' या अर्थाने त्याला प्राप्त झाले. यातील 'गण' म्हणजे टोळी किंवा समूह आणि 'पती' म्हणजे प्रमुख, पालनहार, धनी, राजा वगैरे. प्राचिन काळी हत्ती हे कुलप्रतिक (कुलचिन्ह, Totem) असलेला एक गण खूपच मातब्बर झाला. त्याने कित्येक गणांना आपल्या अधिपत्याखाली घेतले. या आधीच्या गणांनी त्या हत्ती गणाचे आपल्यावरचे वर्चस्व स्वीकारताना त्याचे कुलप्रतिक सुद्धा स्वीकारले. किंबहुना त्यांना ते स्वीकारावे लागले. हेच कुलप्रतिक पुढे संस्कृतीच्या आणि कलेच्या विकासाबरोबर आजच्या गणपतीचे रुप धारण करू पावले. गणपतीच्या चित्रात वा मूर्तीत त्याच्या पायाशी एक मूषक (उंदीर) दाखवतात. या संबंधीही जे संदर्भ सापडतात, त्याप्रमाणे मूषक म्हणजे हत्ती कुलप्रतिक असलेल्या गणाने पराजीत केलेल्या आणि आपले दास्यत्व स्वीकारायला लावलेल्या मूषक कुलप्रतिक असलेल्या एका गणाचे प्रतिकरुप.

गणपतीच्या हस्तिमुखाचे हे स्पष्टीकरण एकदम तर्कनीष्ठ वाटते. आदिम मानवाच्या जीवनात आपल्या कुलप्रतिकाला अत्यंत महत्त्व होते. कुलप्रतिकाच्या खुणा तो अंगावर मिरवीतही होता. एकविसाव्या शतकात ही कुलप्रतिकाचा समाजमनावर प्रभाव दिसतो. हिंदूधर्मीय लोकांमध्ये लग्न-मुंजीसारख्या शुभकार्यादी प्रसंगावर आजही कुलप्रतीक वा देवक पूजले जाते. कुलप्रतिकाच्या पूजेशिवाय अशा कार्यांचा आरंभच होत नाही. आदिवासी समाजात तर 'कुल' अथवा पूर्वजपूजेलाच प्राधान्य आहे. त्यांच्यामध्ये इतर देवांचे महात्म्य दुय्यम आहे. हे सारे बघता हत्तीगणाचे कुलप्रतिक, त्याच्या अधिपत्याखाली आलेल्या गणांनी स्वीकारणे ही गोष्ट तर्काला धरून आहे, असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.

हस्तिमुख गणपतीचे संदर्भ इ.स. पाचव्या शतकाच्या आधी सापडत नाहीत, तेव्हा याच शतकाच्या सुमाराला त्याचा उदय झाला असावा, असे विद्वानांचे मत आहे.

गणपती संकल्पनेच्या उदयाचा काल मानवाच्या रानटी अवस्थेचाच होता, या विधानाला गोव्यातील ज्या मिथक कथेचा वर उल्लेख केला ती सुद्धा पुष्टी देते. या कथेत पार्वती-महादेव गुंफेत राहत होती आणि महादेव शिकारीला जातो, हे वर्णन वन्य काल प्रतीत करणारे आहे. चतुर्थीच्या उत्सवात घरोघरी

गणपतीच्या डोक्यावर जी 'माटोळी' बांधतात, त्यात परंपरेने बांधली जाणारी रानफळे सुद्धा त्याचा एकेकाळचा रानाकडील संबंध सूचित करणारी आहेत.

'कुलप्रतिक' म्हणून मूळ उदय झालेले असो किंवा 'देव' म्हणून, आज गणपती या शक्तीने भारतीय समाजाला पुर्ण भारून टाकलेले आहे. हिंदू समाजातील कोणतेही धार्मिक कार्य त्याच्या आवाहनाविना सिद्ध होत नाही. विघ्नहर्ता, लंबोदर, गणनायक, एकदंत, विद्याधर, विनायक, लोकनायक, गणेश, गजेंद्र अशा कित्येक नावांनी त्याची ओळख आहे. सृजन आणि रक्षण ही त्याची प्रमुख कार्ये मानलेली आहेत. विद्यादाता म्हणूनही तो जनसामान्याचे आराध्य आहे.



३७.

# उत्सव-व्रते : मूळची भूमातेच्या विविध रुपासंबंधित यातुकर्मे

निसर्गधर्म हा पृथ्वीतलावरील मूळ धर्म. आदिवासी समजल्या जाणाऱ्या जमातींनी आजही या धर्माशी आपली नाळ जोडून ठेवलेली आहे.

या धर्माची उत्पत्ती संस्कृती निर्मितीच्या उदय कालापासून झाली किंबहूना निसर्गधर्माच्या आचरणात या पृथ्वीतलावरील मूळ संस्कृतीचा उगम झाला. निसर्ग धर्माचा मूळ आत्मा किंवा केंद्र म्हणजे पृथ्वी, जिला 'भूमाता' ही पदवी संस्कृतीच्या मार्गपथावर प्राप्त झाली. भूमातेचे आणि आकाशाचे एक अतूट नातेही निसर्गधर्माच्या व्यवहारात मानले गेले.

निसर्गधर्माची उत्पत्ती पृथ्वीतलावर घडणाऱ्या विविध बदलांविषयी मानवाला पडलेल्या गूढातून झालेली आहे. पृथ्वीचे, म्हणजेच सृष्टीचे क्षणोक्षणी, कालमानाप्रमाणे बदलणारे रूप बघून तो थक्क झाला, कोड्यात पडला. परिवर्तनाचे हे चक्र कसे अविरत फिरत राहते याचे त्याला अमाप गूढ वाटले. या साऱ्या मागे एक अदृश्य शक्ती आहे, किंबहूना पृथ्वीमातेच्याच अचाट शक्तीचाच हा प्रत्यय आहे, असा त्याचा दृढ समज झाला. मग पृथ्वीमातेच्या या अचाट शक्तीपुढे तो नतमस्तक झाला.

पृथ्वीतलावर नियमित होणारी परिवर्तने आपल्या जीवनावरही परिणाम करणारी आहेत. जेव्हा पृथ्वीतलावर गिष्मात सगळे वैराण होते, झाडे-वृक्ष आपली पर्णे टाकतात, हिरवाई नष्ट होते, त्या वेळी आपण अन्न-पाण्याला त्रस्त होतो, आपले हाल हाल होतात. प्राणीमात्र, पशुपक्षीसुद्धा अन्नासाठी वणवण करतात आणि ज्या वेळी पावसाच्या धारांनी चिंब होऊन धरती

पल्लवित होते, नवांकुर रुजवते, झाडा-झुडपांना फुले - मोहर येऊन फळे लागतात, रोपट्यांवर धान्याच्या लोंब्या डुलतात, त्या वेळी आपले जीवन सुखकर होते, समृद्ध होते, हे त्याने ताडले. मग त्याने आपल्या सुखी-समृद्ध जीवनासाठी महामाता पृथ्वीला तऱ्हेकवार रीतिने आवाहन केले. तिची करुणा भाकली, प्रार्थना केली, तिच्या कृपादृष्टीसाठी साकडे घातले.

यात भर म्हणून तिच्या कृपेच्या अपेक्षेने आपले वागण्याचे नीती-नियमही त्याने निश्चित केले. यांतूनच त्याचा 'जीवनधर्म' निर्माण झाला.

भूमातेच्या दिनचर्येत घडणारे बदल, आपल्या जीवनावर मोठा प्रभाव टाकणारे आहेत हे जाणून मानवाने, काही यातुतंत्रांची निर्मिती केली ज्यांच्या वरवीं या बदलांचा चांगला परिणाम आपल्या जीवनावर होईल आणि वाईट परिणामांपासून आपण मुक्त राहू अशी योजना त्याने केली. या यातुतंत्रामध्ये कालपरत्वे कित्येक नव्या गोष्टी जुळून आणि कित्येक बदलून, त्यांना आजचे उत्सव-व्रतांचे रूप प्राप्त झाले.

आज प्रचलित साऱ्या धर्मांचे मूळ निसर्गधर्माशी जोडलेले आहे, या विषयी कुणाचेही दुमत नसेल. प्राचिन संस्कृतीशी जोडलेल्या साऱ्या धर्मात निसर्गपूजेचे तत्त्व प्रभावी होते जे या संस्कृतीचे जे अवशेष उपलब्ध आहेत त्यावरून सिद्ध होते. सारी मानव जात, रानटी अवस्थेतून स्थित्यंतर होत आजच्या प्रगती स्थरावर पोहोचलेली आहे हे सर्वज्ञात आहे. यावरूनच आज कोणताही धर्म मानणारा मानव समूह असू दे, त्याचा संबंध एकेकाळी निसर्गधर्माशी होता हे उघड आहे. यावरूनच या धर्मातील कर्मकांडे, उत्सव-व्रते पृथ्वीवरील परिवर्तनाशी जोडूनच कधीकाळी निर्माण झालेली आहेत, असे विधान केल्यास चूक ठरणार नाही.

मातृदेवी असलेल्या पृथ्वीसंबंधीत निसर्गधर्माचे आचरण करताना आदिम मानवाने स्त्रीला केंद्रस्थानी ठेवलेले दिसते. यामागचे कारण म्हणजे त्याला भूमातेच्या म्हणजेच पृथ्वीच्या आणि स्त्रीच्या निर्मिती प्रक्रियेमध्ये जाणवलेले साम्य.

भारतीय संस्कृतीमधील आणि प्रामुख्याने गोव्यातील काही व्रत-उत्सवांचा विषयाच्या संदर्भाने येथे संक्षिप्त उहापोह करता येतो. उदाहरणार्थ पौष महिन्यातील 'हळदीकुंकू' हे स्त्रीयांचे व्रत.



**व्रतांची सुरवात संस्कृतीच्या उगमापासून झाली.**

पौष महिना हा ‘सून’ (वैराण) महिना मानला जातो. या महिन्यात पृथ्वीमाता आपले स्त्रीत्व हरवते, असा लोकमानसात समज आहे. प्रत्यक्षातही या महिन्यात किंवा काळात पृथ्वीवरची निसर्ग संपदा सुकलेली असते, सगळीकडे रखरख-वणवण दिसते. या महिन्यात कोणतेच शुभकार्य केल्यास फळ मिळत नाही, असा समज आहे. पृथ्वीचे हे वैराण रुप बदलून तिला परत स्त्रीत्त्व प्राप्त होवो हा उद्देश अहेव स्त्रियांच्या हळदीकुंकू व्रतामागे मुळात असलेला दिसतो. अहेव स्त्रियांनी एकमेकींना ‘वाण’ देऊन भूमातेचे स्त्रीत्त्व वृद्धिंगत करण्याचे ते एक प्रकारचे यातुतंत्रच असावे.

दुसरे उदाहरण आहे ‘शिगमा’ ह्या हिंदुच्या सण-उत्सवाचे. पौष संपून येणाऱ्या माघ-फाल्गूनात हा उत्सव येतो.

आदिम परंपरेतून उगम पावलेला हा सण-उत्सव. यात ‘मेळ’, ‘होळी’ व ‘गडे’ या तीन परंपरा प्रमुख आहेत. या परंपरांचा बारकाईने अभ्यास केल्यास ती आदिमांनी सिद्ध केलेली सुफलीकरणाची यातुतंत्रे हे स्पष्ट होते.

ज्येष्ठ-आषाढात संततधार पावसात धरणीमातेला रजस्वलेचे रुप प्राप्त होते, ती ऋतुस्नात होते. तिचे हरवलेले स्त्रीतत्व तिला परत सापडते अशी लोकधारणा आहे. या संततधार पावसात वाहणारे लाल पाण्याचे ओहळ म्हणजे पृथ्वीमातेच्या रजस्रावाचे पाट असा समज आहे. या काळात ‘अंबुवाची’ हे

व्रत करतात. गोव्यात 'आषाढ पौर्णिमा' तसेच 'आषाढी अमावस्या' हे दिवस सणांचे म्हणून साजरे केले जातात. या महिन्यातच हिंदूंच्या काही देवळांनी 'चिखलकाला' (चिखल अंगाला माखणे) होतो, तर ख्रिस्ती समाज चिखल तुडवणारा 'सांजाव' उत्सव साजरा करतो.

श्रावणात भूमाता गर्भधारण करते हा सर्वमान्य समज आहे. श्रावणातले तिचे हिरवेगार लोभस रूप हे तिची गर्भिणी, होण्याचे प्रमाण मानतात. या महिन्यात स्त्रीया 'आयतार व्रत', 'शाकंभरी', 'मंगळागौरी' यांसारखी व्रते करतात. ही व्रते भूमातेचे डोहाळे पुरवणारी असेच वाटतात.

श्रावणानंतर येणाऱ्या भाद्रपदात चतुर्थीचा (चवथ) उत्सव येतो. 'गणपती बाळ' जन्माला येते. या बाळाच्या जन्मानिमित्ताने त्याच्या आईचे सुद्धा (गौरीचे) कोडकौतुक होते. गौरीपूजन-हरितालिका ही चतुर्थीच्या सणातील व्रते हेच सूचित करणारी आहेत. गणपतीचे रूप हे तर पूर्णसृजन रूप.

दसरा-दिवाळी हे दोन्हीही सण म्हणजे सुगीचे, भूमाता पूर्ण माता बनल्याचा आनंद साजरा करणारे सण. आपला आनंद नुसता सण रुपाने घराच्या चार भिंतीतच नाही तर मानवाने सार्वजनिक स्थरावर देव-देवळांच्या प्राकारातही सामुहिकपणे साजरा केलेला दिसतो. दिवाळीनंतर गोव्यातील लहान-मोठ्या देवळांत 'कालोत्सव' आणि 'जत्रोत्सव' होतात ही गोष्ट सुद्धा येथे खास लक्षात घेण्याजोगी आहे.

पौषातील पृथ्वीचे उखडलेले रूप म्हणजे स्त्रीतत्व हरवलेली पृथ्वी, ज्येष्ठ आषाढात लाल पाण्याचे ओहळ अंगावरून ओघळणारी पृथ्वी म्हणजे रजस्वला, श्रावणात हिरवाईने नटलेली पृथ्वी म्हणजे गर्भीणी, भाद्रपदात फळांनी, दुधाळ लोंब्यांना अंगावर घेऊन मिरवणारी पृथ्वी म्हणजे नवबाळंतीण (ओली बाळंतीण), अश्विन-कार्तिकात पक्व फळे आणि पिवळ्या जर्द लोंब्यांना वाऱ्यावर डुलवणारी पृथ्वी ही पूर्ण माता, महामाता... अशी पृथ्वीमातेची महारूपे आदिम काळी मानवाने कल्पिली जी आजही सण-उत्सव रुपाने लोकमानसात जीवंत आहेत.

भारतीय संस्कृतीत कित्येक सांस्कृतिक प्रवाह एकरूप झालेले असल्याने या व्रत-उत्सवांच्या आयोजनांचा काल निश्चिताना मागे-पुढे झालेले दिसते. कधी कधी एकच समाज आचरत असलेल्या दोन वेगळ्या विधींनी किंवा उत्सवांनी एकच प्रयोजन असलेलेही दिसते. 

३८.

# म्हाळ : पितर पूजेचा एक याग

आत्म्याच्या व्यवहाराचे गूढ वाटलेल्या मानवाने आदिम काळापासूनच पितरपूजेला महत्त्व दिले होते. त्याच्या धार्मिक व्यवहाराचाच तो एक भाग होता. देव या संकल्पनेच्या उदय काळाआधी पितर पूजेची संकल्पना रुजली होती, असे विधान केल्यास चूक ठरणार नाही आणि याचे प्रमाण आज अस्तित्त्वात असलेल्या कित्येक आदिवासी जमातीच्या सांस्कृतिक व्यवहारातून मिळते. पितरपूजा, कुलप्रतिकपूजा याच्या नंतर अतिमानवी किंवा दैवी शक्तींच्या आराधनेस मानवाने सुरवात केली.

आत्मा अमर असतो, तो मरत नाही. तो एका अवस्थेतून दुसऱ्या अवस्थेत जातो, अशी मानवाची आदिम काळी धारणा होती, जी आजही बऱ्याच अंशी समाजात आहे. मृतात्मा प्रेत किंवा भूत योनीत जातो. या योनीत तो कित्येक वाईट शक्तींच्या ताफ्यात राहतो. त्यामुळे त्याला स्वतःला त्रास होतो, मग तो आपल्या वारसांनाही त्रास करतो. यासाठी एका वर्षाच्या आत काही ठराविक विधी-प्रथा संपन्न करून त्याला त्या शक्तीच्या (वाईट कलमे) तावडीतून सोडवणे गरजेचे असते. अशी सोडवणूक झाल्यावर तो प्रेतात्मा एका वर्षाने पितर पदाला पोचतो नंतर तो त्याच्या कुळात पुनर्जन्म घेतो, अशी लोकमानसात समजूत आहे.

आपल्या पितरांचे अस्तित्त्व सदाकाळ असते, मेल्यांतरही आपले पूर्वज आपल्या वंशजांवर कृपादृष्टी ठेवून असतात, संकटकाळी हाक मारल्यावर ते वंशजाच्या मदतीला धावून येतात, संकट निवारण करतात अशी आदिम

काळापासूनच मानवाच्या मनात श्रद्धा होती. सुरवातीला जेव्हा टोळी पद्धतीचे, अथवा सामूहिक स्वरुपाचे जीवन माणूस जगत होता त्या काळी तो मेलेल्या पितरांच्या नावे एखादा दगड ठेवून अथवा एखाद्या जागी त्याची स्थापना करून त्याची पूजा करायचा, आराधना करायचा. पुढे या त्याच्या पूर्वज स्मारकांना कित्येक जागी देवरूप प्राप्त झाले.

काही 'पूर्वज' अथवा 'पितर दैवते' ही त्या त्या कुटुंबाचीच राहिली तर ग्राम-वसाहतीशी अथवा मोठ्या समूहाशी संबंधित पूर्वज हे त्या संबंध गावचेच दैवत बनले, ग्रामदैवत झाले.

गोव्यात 'जल्मी', 'मूळवंश', 'मूळवीर', 'म्हारींगण' इत्यादी दैवते पूर्वज पूजेतूनच उद्‌गम पावलेली आहेत. पितर पूजेची परंपरा सुधारलेल्या आणि मागासलेल्या दोन्हीही समाजात दिसते. गोव्यात तर प्रत्येक घराच्या देव्हाऱ्यात अथवा ठराविक जागी (अपवाद नव्यांचा) 'पुरुस' (पुरुष) पूजेला लावलेला दिसतो. म्हणजे घरातील प्रथम पुरुष मेल्यावर त्याला 'दाम' रुपाने (तांब्याचे नाणे) आणून (कुलदेवाचा कौल घेऊन) देव्हाऱ्यात ठेवला जातो. घरातील मृत स्त्रियांनाही दामावर आणून ठेवतात. मात्र संबोधताना 'घरपुरूस' अथवा 'घरचा पुरूस' असाच उल्लेख केला जातो.

माणूस मृत झाल्यावर भूतयोनीत जाणे आणि नंतर काही यातुकर्माद्वारे त्याला पितर रुप प्राप्त होणे ही धारणा जगभर होती. मात्र समूह, जमात, जात, समाज, प्रदेश या फरकाप्रमाणे त्याला पितर रुप प्राप्त होण्यासाठी केलेल्या कर्मामध्ये फरक दिसतो. आदिमकाळी अवैदिकांमध्ये जशी ही परंपरा होती तशीच ती वैदिककाळी सुद्धा होती याचे संदर्भ सापडतात. एवढेच नव्हे तर या काळी प्रेतदहनानंतर मृतात्मा तत्काळ पितर पदाला पोहोचतो अशीसुद्धा समजूत असल्याची आणि नंतर गृहसूत्राच्या काळात ती बदलली आणि मृतात्मा, वर्षभर प्रेत (भूत) अवस्थेत राहतो आणि एकोदिष्ट, सपिंडीकरण श्राद्ध, भरणी श्राद्ध, वर्ष श्राद्ध अशा यागातून त्याची सुटका होऊन तो पितरपदाला पोहोचतो, अशी समजूत दृढ झाल्याचीही माहिती मिळते.

गोव्यात आज वैदिक आणि अवैदिक असे दोन सांस्कृतिक प्रवाह एकरुप होऊन वाहत आहेत. एकेकाळी प्रत्येकाचे स्वतंत्र अस्तित्व होते. आज एकाचा दुसऱ्यावर प्रभाव आहे तरीसुद्धा प्रत्येकाचे आगळेपणही जपलेले आहे. कुळंबी,



**पिंडदान हा म्हाळविधीतील महत्त्वाचा भाग असतो.**

गावडी, नायक वगैरे येथील आदिम अनार्य जमाती-जाती. एकेकाळी त्यांची पितर पूजेची पद्धत आणि अंत्यसंस्कार वेगळ्या तऱ्हेने व्हायचे. सरसकट यांच्यामध्ये प्रेत दफन (पुरले) केले जायचे आणि नंतर वर्षपर्यंत बारावा, सोडपां (मृतात्म्याला) कुलदेवाचा कौल घेऊन, कोंबडा-शहाळी वगैरे अर्पण करून वाईट शक्तींच्या कचाट्यातून सोडवणे आणि दामरुपाने घरात आणणे), अनसूट, वर्षश्राद्ध ही कर्मे करून त्याला पितर रुप प्राप्त करून द्यायची परंपरा होती. वैदिकांमध्ये सोडपांच्या बदला 'सपिंडीश्राद्ध' आणि 'भरणी श्राद्ध' वगैरे (भाद्रपद महिन्याच्या दुसऱ्या पक्षात ठराविक तिथीला) केले जायचे.

आणखी एक समजूत हिंदू समाजात रुढ झालेली दिसते. ती म्हणजे, ज्या मृत माणसाला कोणीही वारस नाही किंवा त्याची पुढील अंत्यकार्ये करणारा माणूस नाही त्याचे/तिचे प्रेत पुरतात. तसेच त्याची/तिची पुढील कार्ये करण्यासाठी कोण नसल्यामुळे त्यांचा आत्मा पितर रुप पावत नाही, त्याला मोक्ष मिळत नाही. तो भूतयोनीत राहतो, अशी समजूत आहे.

हिंदू धर्म मानणाऱ्या जाती-जमातींमध्ये पितर पूजेचे एक मोठे कर्म म्हणजे 'महालय श्राद्ध' किंवा 'म्हाळ श्राद्ध'. जे पितर 'चुकून-माकून' अजूनही

भूतयोनीत राहिलेले आहेत, त्यांना तसेच पितर पदावर पोहोचलेल्या पितरांना त्यांच्या वंशजांची स्मृती राहावी या हेतूने सुद्धा भाद्रपद कृष्णपक्षात हे महालय किंवा म्हाळ श्राद्ध केले जाते. या पूर्ण पक्षालाच 'पितृपक्ष' मानतात. कुटुंबातील कर्म करणाऱ्यांचा पिता ज्या तिथीला मृत पावला ती तिथी या श्राद्धासाठी निवडली जाते. या दिवशी पिंडदान करून पितरांच्या नावे अन्नदान किंवा अन्न सतर्पण केले जाते. जे जिवंत आहेत त्यांना सोडून पित्याकडील तसेच मातेकडील साऱ्यांच्या नावे अन्न अर्पण केले जाते. आठवणीतील माणसांच्या नावे 'ब्राह्मण' (स्वजातीय) जेववला जातो. इथे खापर पणजी किंवा खापर पणजोबापर्यंत नाते मानतात.

सवाष्ण स्त्री आणि लहान मुलांच्या नावे सुद्धा तशी माणसे जेववली जातात. याच पक्षातील नवमीला 'अहेव नवमी' किंवा 'अविधवा नवमी' मानतात आणि त्या दिवशी घरातील मृत सवाष्णींच्या नावे श्राद्ध वाढले जाते. सवाष्णपणाचा शृंगार दान दिला जातो. सौराष्ट्रांत वद्य त्रयोदशीला 'बाळा भोळानी तेरस' मानतात आणि त्या दिवशी मृत लहान मुलांच्या नावे काकवळी देतात.

या पक्षाच्या शेवटी येणाऱ्या अमावास्येला 'सर्वपित्री' अमावास्या मानून त्या दिवशीही श्राद्ध वाढतात. हे श्राद्ध केले तर साऱ्या पितरांना पावन होते अशी समजूत आहे. दर महिन्याला येणाऱ्या अमावास्येला सुद्धा पितरांना अन्न अर्पण करून 'काकावळ' घालण्याची प्रथा आहे. यामुळे पितर सदैव जागृत राहातात अशी समजूत आहे.

गोव्यातील हिंदू कुळंबी समाजामध्ये म्हाळाच्या दिवशी अन्नअर्पण आणि इतर यागाबरोबर 'बनवड' गायनाचे सुद्धा सादरीकरण करण्याची प्रथा आहे. एका कुटुंबाचे किंवा 'घरवयेचे' लोक रात्र पडल्यावर एकत्र येऊन घराच्या ओसरीवर बसून हे गायन करतात. गायनाला घुमट टाळांचे वाद्यसंगीत असते.

सर्व साधारणपणे मध्यरात्री ही कथा संपते आणि बसल्या वारसामधून एकाच्या वा जास्ती जणांच्या अंगात संचारते. बनवड गायनात, महाभारत कथेच्या प्रतिकात्मक गायनातून, पितरांचे आवाहन होऊन, ते आपल्या वारसांना त्यांच्या रक्षणार्थ तत्पर असल्याचा निर्वाळा तिथे अवतरून देतात.

हे बनवड गायन म्हाळपरंपरेच्या आदिमतेची ओळख सांगते. एकेकाळी

गायन हेच एक यातुकर्म अथवा यातूयाग मानले जायचे. बनवडीची परंपरा ही सुद्धा या प्रकारात समावीष्ट होते.

मूळ हिंदू, नंतर धर्म परिवर्तन झालेल्या गोव्यातील ख्रिस्ती समाजात सुद्धा पितर पूजा अथवा पितरांना जेवण अर्पण करण्याची प्रथा आहे. नोव्हेंबर महिन्याच्या २ तारखेला 'आल्मां फेस्त' साजरे केले जाते. या रात्री (आधीच्या) मृतात्मे पृथ्वीतलावर अवतरतात असा समज त्यांच्यामध्ये आहे. या दिवशी घरात गोडधोड बनवतात, गरीब अथवा अनाथ म्हाताऱ्यांना जेवण घालतात.



## ३९.

## साकडे : गूढ शक्तींच्या कृपेसाठी रचलेले एक यातुकर्म

या विश्वाची निर्मिती एका गूढ आणि अज्ञात शक्तीने केलेली आहे, ही शक्ती अचाट आणि महाप्रबळ आहे, या विश्वातील साऱ्या घटना आणि व्यवहारांचे नियंत्रण आणि संचलन ही शक्तीच करते. पृथ्वीतलावरील जीवमात्र, प्राणिमात्र आणि वनस्पती सृष्टी या साऱ्याची सूत्रे तिच्याच हातात असतात. आपलेही जीवन या शक्तीच्याच मर्जीवर अवलंबून आहे. तिची कृपादृष्टी असेल तर आपले जीवन तरते नाहीतर मोठमोठी संकटे येऊन, उत्पात होऊन आपले जीवन उद्ध्वस्त होते. आपला वंश तगत नाही, सारे काही विनाशाच्या जबड्यात जाते, अशी दृढ धारणा आदिम मानवाची होती आणि या धारणेपोटी तो त्या अदृश्य शक्तीला घाबरून जगत होता, तिच्याविषयीची एक आदरयुक्त गूढ भीती त्याच्या मनात सतत होती. या शक्तीला वश करण्यासाठी त्याने कित्येक यंत्रे-गारुडेसुद्धा रचली होती. तिच्या आवाहनाचे कित्येक मार्ग, त्याने निश्चित केले होते.

या शक्तीला वश करण्यासाठी केलेल्या यंत्रे-गारुडातील किंवा ठरवलेल्या प्रथारुप प्रकारांतील एक महत्त्वाचा प्रकार म्हणजे 'साकडे घालणे'.

कोकणी भाषेत किंवा गोव्यात या साकडे शब्दाला 'गाराणे' हा शब्द प्रचलित आहे. मराठी भाषेतील 'गाऱ्हाणे' या शब्दाशी जवळीक असलेला वा समरुप दिसणारा हा शब्द किंवा संकल्पना कोकणीत सांस्कृतिक व्यवहारात तक्रार या अर्थापेक्षाही 'मागणे' या अर्थाने वापरली जाते. मराठीतील 'साकडे' या संकल्पनेशी ती बरोबर जुळते. यात तक्रारीपेक्षा याचनेचा भाव जास्त असतो.

या पृथ्वीतलावर जर आपल्याला सुखरुप जगायचे आहे, तर या विश्वातील अदृश्य शक्तीची कृपादृष्टी लाभणे अत्यंत महत्त्वाचे आहे, किंबहुना त्याशिवाय आपण जगूच शकणार नाही, तेव्हा त्या कृपादृष्टीसाठी त्या शक्तीकडे याचना करणे, तिला विनंती करणे अतिशय गरजेचे आहे; परंतु ही विनंती एकट्या-दुकट्याने न करता ती अख्ख्या समूहानेच जर केली तर ती परिणामकारक राहील, अशी आदिम मानवाची दृढ समजूत असल्याने त्याने सामूहिकरित्या त्या शक्तीला आवाहन करण्यास किंवा याचना करण्यास सुरवात केली. एकट्याचा आवाज कदाचित त्या शक्तीपर्यंत पोहोचू शकणार नाही, परंतु पुऱ्या समूहाचा आवाज एक झाला तर तो बुलंद असेल आणि त्या आवाजाने ती शक्ती निश्चित जागृत होऊन आपल्यापर्यंत तिची दृष्टी जाईल, अशा श्रद्धेतून साकडे घालण्याची परंपरा सुरू झाली हे स्पष्ट आहे.

आदिम काळी मानवाचे सारे व्यवहारच सामूहिकरित्या होत होते. टोळीत जीवन जगताना, व्यक्ती म्हणून कुणालाच स्वतंत्र अस्तित्त्व नव्हते. अशा अवस्थेत जीवन प्रदान करणाऱ्या आणि ते तारणाऱ्या शक्तीचे आवाहन आणि तिच्या कृपेसाठी केलेली याचना, म्हणजे घातलेले साकडे हे सामूहिकरित्या मानवाने सिद्ध करणे ही गोष्ट साहजिकच आहे.

साकडे घालण्याच्या परंपरेचे रुप बघता त्याचा उदय मानवाच्या व्याघ्र अवस्थेत झाला असेच म्हणावे लागेल. या काळी शब्द-भाषा विकसित झाली नव्हती. चित्रे आणि अंगविक्षेप या स्वरुपात मानव शिकार प्राप्तीसाठी आणि संकट निवारण करण्यासाठी साकडे घालायचा, याचे प्रमाण देणारी चित्रे (प्रस्तर चित्रे) आज भारतात कित्येक ठिकाणी सापडलेली आहेत. खास गोव्याचाही या संदर्भाने उल्लेख करता येतो. गोव्यात सांगे तालुक्यातील पणसाळीमळ येथे अशी चित्रे सापडलेली आहेत. पुढे शेतीचा शोध लागून, कृषी संस्कृती आणि त्याला जोडून ग्रामसंस्कृती उदयाला आली. या काळी भाषाही विकसित झाली आणि शब्दरुप साकडे घालण्यास प्रारंभ झाला, असे एकंदर स्थितीच्या अवलोकनातून म्हणता येते.

साकडे घालताना समूहाचा (गावचा, कुळाचा किंवा घरवयीचा) प्रमुख जो कित्येकदा पुरोहितही (गुरव, भगत, जल्मी, मुळवी, वेळीप इत्यादी) असतो, तो अभिप्रेत असलेले शब्द किंवा वाक्ये आधी उच्चारतो, नंतर जमलेले सारे जण



**दुखापत झालेल्या अंगाचा भाग बरा करण्यासाठी मिनीन जेजुला शरीराच्या त्या भागाच्या मेणाच्या प्रतिकृती अर्पण करण्याचे नवस बोलतात. (कोलवा-सासष्टी, १९९०)**

एकमुखाने त्याच्या वाक्या-वाक्याला दुजोरा देतात. हा दुजोरा 'हय सायबा, किंवा 'हय सायबिणी', किंवा 'हय देवा' किंवा 'हय माये' या उच्चारणात दिला जातो. या दुजोऱ्यानेच घातलेले साकडे खऱ्या अर्थाने फलप्राप्त होते, साकड्याचे सामूहिक उच्चारण हे एक यात्विक कर्म ठरते. एकट्याने घातलेले साकडे हे नुसती याचना ठरते आणि तिचा प्रभाव त्या शक्तीवर ज्यास्त पडत नाही अशी धारणा आहे.

गोव्यात 'दहा जण' (दहा सदस्य) ही संकल्पना रुढ आहे आणि साकडे घालताना या दहा जणांची तिथे उपस्थिती अत्यंत महत्त्वाची असते. दहा जणांतील एक सुद्धा सदस्य हजर नसेल तर साकड्याची पूर्तता होत नाही, अशी समजूत आजही ग्रामीण भागात आहे. हे दहाजण म्हणजे गावगाड्यातील दहा 'कारकी' (कार्यकरी, सेवेकरी, बलुतेदार) यातील एकसुद्धा अनुपस्थित राहिला तर ज्या शक्तीला साकडे घातले जाते ती शक्ती गावात एकजुटता नाही अशी समजूत करून घेईल आणि ती कदाचित आपली याचना मानून घेणार नाही, तसेच तिच्यापर्यंत गावकऱ्यांचा आवाज पोहोचण्यास कमी पडेल, अशी श्रद्धा लोकमानसात आहे. साकडे घालण्याच्या या सामूहिक पद्धतीतूनच, साकड्याची परंपरा, मानवाच्या सामुहिक जीवन जगण्याच्या अवस्थाकाळी उदयाला आली हे स्पष्ट होते.

साकड्याची परंपरा आजही समाजमनावर खोल प्रभाव घालून असलेली दिसते. आदिवासी समाज, लोक समाज आणि नागर समाज या तिन्हीही समाजात ही परंपरा अजुनही प्रचलित आहे. साकड्याला जुळून असलेल्या काही परंपरा कदाचित बदलल्या असतील, परंतु मुख्य भाग अजूनही जिवंत आहे. अजूनही गावात एखादे शुभकार्य करायचे असेल, वार्षिक जत्रा-उत्सव वगैरे सिद्ध करायचे असेल तर साकडे घालूनच त्याची सुरवात होते, तसेच ही कार्ये पूर्ण झाल्यावर ती 'जशी केली, तशी मानून घ्यावीत' या आशयाचे साकडे घालून, गावासाठी 'राखण' (रक्षण) मागितले जाते. शिगम्याच्या आणि दसऱ्याच्या उत्सवावेळी तर या साकड्याचे महत्त्व अधिकच जाणवते. यावेळी खास पद्धतीने साकडी घालून 'येत्या वर्षापर्यंत' गावासाठी ठराविक शक्तींना 'शब्दांत बांधून' ठेवले जाते. गावात एखादे संकट आले, साथीचे रोग पसरले तर खासपणे साकडे घातले जाते, यासाठी आधी 'गावपण' (ग्रामसभा) पण बोलावले जाते.

साकडे हे प्रामुख्याने गावच्या किंवा सार्वजनिक भल्यासाठी घातले जात असले तरी कधी कधी एखाद्या गावकऱ्याच्या नीजी मागणीवरूनही साकडे घातले जाते. संतती प्राप्ती, रोग निवारण, अर्थप्राप्ती, हरवलेली वस्तू सापडण्यासाठी वगैरे साकडे घातले जाते. कुणाला अपाय करण्यासाठी साकडे घालण्याची विनंती केल्यास ते घातले जात नाही. शेताच्या वृद्धीसाठी तसेच गुरा-वासरांच्या समृद्धीसाठीही साकडे घातले जाते. या संबंधाने पुढील उदाहरण देता येते :

सांगे-केपे परिसरात 'गोंसाय' (गोसावी) गुरां-वासरांचे वाघांपासून रक्षण करण्यासाठी 'वाघन्न' नावाच्या जंगलात जाऊन 'वाघ्राला' (व्याघ्रदेव) वार्षिक साकडे घालतो.

साकडे घालण्याची एक पारंपरिक पद्धत आहे. यात संबंधित देव-दैवतांची नावे घेऊन त्याला हाक मारतात आणि त्यांच्याकडून अपेक्षित असलेले कार्य उच्चारण करतात.

कर्ल-केपे गावचे श्री. जानू गावकार यांच्याकडून काही वर्षांआधी शिगम्याच्या वेळी घातले जाणारे एक साकडे मी संकलित केले होते. आदिम गोव्यातील साकड्याचे ते एक महत्त्वपूर्ण उदाहरण म्हणता येते. ते पुढीलप्रमाणे

आहेः

“देवाऽऽ
आज आदिनाथ तूं, पायक तूं!
सांतेर तूं, पांचा पुरीस तूं!
आज एक चित्त एक मत करून
आज गडी आसा तें गडी थारावन
अबस्तानां आसा तें अबस्तानां थारोवन
मागां आसा तें मागां थारोवन
मेळ्या आसा तें मेळ्या थारोवन
वाटे आसा तें वाटे संतून
वाग आसा ते कोले करून
रान आसा तें शार करून
नाग आसा तें हेंवाळीं करून
कांटो आसा तो मुणो करून
वीख आसा तें अमृत करून
सरकारा-दरबारां सादोवन,
घरां-वस्तुरेक, भुरग्यां-बाळांक सांबाळून
गोरवा-वासरांक राखण दिवन,
आज वर्सा होरावणेक तुमी जाप दिवची,
पिळगे उल्याक उबें रावचें
आनी चुकलें-माकलें पोटी दवरून
सगळ्यांचे बरें करचेंऽऽ!
सगळ्यांक आविश्य-आरोग्य दिंवचे!”

(हे साकडे प्रसंगानुरूप वाढवले जाते.)



# ४०.
# नवस :
# शक्तींना संतुष्ट ठेवण्याची क्लृप्ती

शिकारी अवस्थेत मानवाने अदृश्य शक्तींची कल्पना रचली. या शक्तीच्या कृपेवरच आपले जीवन तरून आहे, अशी धारणा करून घेतली. 'शिकार' जी त्याच्या जगण्याचे प्रमुख साधन होते, किंबहुना शिकार करणे हा एकच त्याचा जीवन व्यवहार होता, या शिकारीची प्राप्ती ही त्या अदृश्य शक्तीच्या मर्जीवरच अवलंबून आहे, अशी दृढ समजूत त्याने करून घेतली. मग त्या शक्तीला प्रसन्न करून घेण्यासाठी त्याने काही यंत्र-तंत्रे निर्माण केली. या यंत्र-तंत्रांमधीलच एक म्हणजे 'नवस'.

नवस रुपाने मानवाने त्या अदृश्य शक्तीला शब्दांत बांधून ठेवले. 'अमूक-अमूक गोष्ट घडली किंवा अमूक अमूक गोष्ट कर, तुला अमूक अमूक देईन' असा त्या शक्तीशी शाब्दिक (एकतर्फी) करार केला. पुढे जेव्हा इच्छित गोष्ट घडली किंवा परिपूर्ण झाली तेव्हा दिलेल्या शब्दाला धरून त्या शक्तीला, त्या वस्तू किंवा कृती अर्पण केल्या.

मानवाच्या शिकारी अवस्थेच्या ज्या खुणा किंवा अवशेष जगभरच्या पुरातत्त्व शास्त्रज्ञांना सापडलेल्या आहेत, जी प्रस्तर चित्रे सापडलेली आहेत, त्यावरून शिकारी अवस्थेत मानव, मिळालेली पूर्ण शिकार, कल्पिलेल्या शक्तीला अर्पण करून, नंतर तिचा स्वतः भोग घेत होता, मिळालेल्या शिकारीचा पहिला वाटा त्या शक्तीला अर्पण करीत होता, असे अनुमान काढले जाते. शिकारीला सुरवात करण्या आधीही तो त्या शक्तीचे आवाहन करीत होता. इथेच नवस परंपरेची सुरवात झाली म्हणता येते. 'तू आम्हाला



**नवस सामुहिकरित्या तशेच व्यक्तीगत रित्याही आज बोलले जातात. (१९९३)**

शिकार मिळवून दे, आम्ही तुला तिचा पहिला वाटा किंवा भोग देतो' असा जणू करारच मानवाने अदृश्य शक्तीशी केला आणि नंतर इच्छिल्याप्रमाणे जेव्हा शिकार मिळाली तेव्हा तिची पूर्तीही केली. पुढे स्वरक्षणासाठी, म्हणजे नैसर्गिक आपत्तींपासून, हिंस्र जनावरांपासून, इतर टोळींच्या आक्रमणांपासून, रोगराईपासून टोळीचे रक्षण करण्यासाठी त्याने नवस केले (बोलले).

सुरवातीच्या काळी हे नवस सामूहिकरित्या बोलले जात होते. यात दुमत नाही, तसेच सर्व नवस समूहाच्या वतीने टोळी प्रमुख बोलत होता. आजही समूहाच्या किंवा गावाच्या वृद्धीसाठी, सामुहिक आपत्ती निवारणासाठी बोलले जाणारे नवस टोळीप्रमुख (ग्रामप्रमुख) बोलताना दिसतो. या काळी व्यक्तीच्या भल्यासाठी सुद्धा बोलला जाणारा नवस हा सामूहिक रितीनेच बोलला जायचा. याचे कारण म्हणजे समूहमनाने भारावलेल्या मानवाचे या काळी कोणतीच गोष्ट व्यक्तिगत नव्हती, त्याचे सारे प्रश्न, सुख-दुःख हे सामूहिकच होते.

'जनन', 'भरण' आणि 'पोषण' या तीन गोष्टींची प्राप्ती हे याच्या जीवनाचे प्रमुख लक्ष होते. त्याच आदिम मानवाने त्यांच्या प्राप्तीसाठी नवस बोलले होते, हे आजही प्रचलित असलेल्या काही सांस्कृतिक व्यवहारांवरून स्पष्ट होते.

'नवस' रुपाने उदय झालेली काही कृत्ये संस्कृतीच्या प्रवाहाबरोबर प्रथारुप धारण घेती झाली, याची उदाहरणे आज आदिम काळी वसाहतीला आलेल्या गावांनी सापडतात. या संबंधाने एक महत्त्वपूर्ण उदाहरण माझ्या आमोणे गावात सापडते. माझ्या गावात तीन दिवसांच्या वार्षिक शिगम्याच्या समाप्तीच्या

वेळी, गड्यांचे विसर्जन होऊन त्यांना विधिवत स्नान घातल्यानंतर गावचे सगळे 'गावकार' (प्रमुख आणि दहा जण) 'शेटी पाणटो' या जागी जमतात. या पाणवट्याच्या जागेकडून वरच्या कडेला गावची 'महाल खुंटी' आहे. येथे वर्षाची 'पुरवण' करतात. म्हणजे कोंबडा मारला जातो. कोंबड्याच्या रुपाने येथील देवचारांचा 'मान पुरवला' जातो. यासंबंधी आख्यायिका सांगतात : आमोणे गावचा मूळ पुरुष (महाल जल्मी) तिसवाडी तालुक्यातील नार्वे ह्या गावचा. आपत्तीच्या काळी तो मूळ गाव सोडून सुरक्षित स्थळाच्या शोधात निघाला. चालत चालत तो कुशावती नदीच्या तिरी पोहोचला. तिथे आपण सुरक्षित आहे. याची खात्री पटून त्याने नदी ओलांडली; परंतु गाव वसवण्याआधी त्याने नदीकाठच्या देवचाराला नवस केला, 'तू मला इथं राहायला रक्षण दे, मी तुला दरवर्षी तुझा मान देईन!' त्याप्रमाणे एक वर्ष संपल्यावर त्याने त्या देवचाराला पक्षी (कोंबडा) अर्पण केला आणि नंतर नियमित दरवर्षी ती 'पुरवण' करू लागला, जी आजतागायत चालू आहे.

अस्तित्वाच्या संघर्षात आदिम मानवाने सुरू केलेली नवसाची प्रथा पुढे संस्कृतीच्या विकासाबरोबर विस्तारीत झाली. जीवनासंबंधी कित्येक व्यवहारांच्या प्राप्तीसाठी 'नवस' बोलले जाऊ लागले आणि कित्येक वस्तू, कृती अर्पण करून किंवा सादर करून ते फेडले जाऊ लागले.

नवसाची प्रथा सर्वत्र आहे. जगभरच्या जाती-जमातींत ती सापडते. आदिवासी तसेच प्राचिन समाजात तिचा प्रभाव जास्त असला तरी शहरी आणि शिक्षित समाजातही ती दिसते. पूर्वीच्या काळी संततीप्राप्ती, लग्न जुळवणी, रोग निवारण, संकट निवारण, शेती धंद्याची बरकत, गुरा-वासरांची समृद्धी, अशा मोजक्याच गोष्टींच्या प्राप्तीसाठी नवस बोलले जात असल्याची माहिती मिळते. आज परीक्षेत यश मिळण्यासाठी किंवा प्रवास सुखकर होण्यासाठी सुद्धा नवस बोललेले दिसतात.

लोक आणि शिष्ट दोन्हीही समाजांत 'नवसाची प्रथा दिसते, तशीच हिंदू, ख्रिस्ती आणि मुसलमान या तिन्ही धर्मिय समाजातही नवसाची प्रथा सापडते. नवस संकल्पनेला गोव्यातील ख्रिस्ती समाज 'आंगोण' म्हणतात, तर मुसलमान लोक 'मिन्नत' म्हणतात.

शिकारी अवस्थेपासून सुरू झालेल्या 'नवस' परंपरेने कालपरत्वे

संस्कृतीच्या विकासाबरोबर व्यापक रुप घेतले, यांत अतिमानवी आणि दैवी दोन्हीही शक्तींना नवस बोलण्याची परंपरा रुजली. तसेच प्रत्येक शक्तीचे रुप आणि कार्य यांच्या वैविधतेप्रमाणे 'नवस' करण्याची प्रथा ठरली. उदाहरणार्थ गोव्यात सातेरी देवीला, सात रंगांच्या फुलांच्या माळा वाहण्याचा नवस केला जातो. हा नवस प्रामुख्याने मूल होण्यासाठी किंवा साथीचे रोग दूर होण्यासाठी करतात. लग्न ठरल्यास किंवा मूल झाल्यास शांतादुर्गा, सांतेरी, नवदुर्गा इत्यादी देवींना खणा-नारळाने ओटी भरण्याचा नवस करतात. फातर्पेच्या शांतादुर्गेला 'फुलांचे ताट' भेट देण्याचा नवस सर्रास केला जातो. आपल्याला किंवा नात्यातील बाईला मूल झाल्यास गणपतीपुढे 'नागडी फुगडी' घालण्याचा नवस करतात. नवस बोलण्याबरोबरच वर्षाच्या आत मूल झाल्यास, त्या मुलाला गणपतीच्या माटोळीला बांधण्याचाही नवस केला जातो. म्हारु-देवचार यांना सूर-रोट देण्याचा नवस करतात. पायक देवाला घोडा (मातीची आकृती) अर्पण करण्याचा नवस करतात. भूतनाथ-रौदिरो सारख्या देवांना 'चिरूट' पेटवण्याचा नवस करतात. शिरगावच्या लईराईला 'मोगरीचे अमूक अमूक कळे' वार्षिक जत्रेच्यावेळी अर्पण करण्याचा नवस केला जातो. काही देवतांची किंवा देवस्थळांची वारी करण्याचा नवस करतात. खुंटी मायेला 'पंचखाद्य' किंवा ओटी देण्याचा नवस करतात. गोव्यात 'कुडका' येथील सांतान सायबिणीला (प्रामुख्याने ख्रिस्ती समाज) मूल होण्यासाठी हिरवा चुडा देण्याचा नवस करतात.

नवसाचा ठराविक काळ तसाच वेळ असतो. अमूक वेळात इच्छित कार्य घडले आणि नवस पूर्ण केला नाही, तर नवस करणाऱ्याला त्यांचा त्रास होतो. गळणारे केस थांबण्यासाठी चंद्रेश्वर देवाला त्याच्या पर्वताच्या पायऱ्या केसांने झाडण्याचा नवस करतात. अंगाचा एखादा भाग दुखत असेल किंवा मोडला असेल तर तो बरा होण्यासाठी (म्हणजे तो झाल्यावर) त्या भागाची मेणाची प्रतिकृती ओल्ड गोवा येथील सेंट झेव्हियरला अर्पण करण्याचा नवस करतात. एखाद्याला दुर्धर आजार झाला तर तो बरा झाल्यावर पाच घरांमध्ये भिक्षा मागून सत्यनारायण पूजण्याचा नवस करतात.

नवसाचा अवधी सर्वसामान्यपणे एक ऋतुचक्र असते. एका ऋतुकालात तो पूर्ण झाला तर तो देव (शक्ती) नवसाला पावला असे गृहीत धरतात आणि

मग नवसाची पूर्ती केली जाते. देव नवसाला पावला आणि नवसाची पूर्ती झाली नाही, तर मात्र नवस बोलणाऱ्याला आणि ज्याच्यासाठी नवस केला त्या दोघांनाही त्रास होतो. त्याला संकेत दिले जातात. संकेत मिळूनही नवस फेडला नाही तर मग ती शक्ती त्यांना शिक्षा देते, अशीही समजूत आहे.

लोककथांतही नवसाचे कल्पनाबंध सापडतात. यांत प्रामुख्याने राजा पुत्ररत्न (पुत्रफळ) होण्यासाठी नवस करतो. एक-दोन कथांमध्ये राजकन्या 'उपरासंगी माळयेर' म्हणजे गवाक्षात बसून मोत्यांची माळा गुंफते. ही माळा गुंफून ज्या वेळी संपेल आणि त्याच वेळी तिथून जो पुरुष जाईल त्याच्या गळ्यात ती आपण घालणार आणि त्याला वरणार, अशी ती 'नवस' करते असे वर्णन सापडते. मात्र, इथे 'नवस' हा शब्द 'पण' या अर्थाने वापरलेला दिसतो. कदाचित दोन्हीही शब्दांमागे अमुक अमुक घडल्यास, अमुक अमुक करीन असा एकच भाव जुळलेला असल्याने ही शब्दांची सरमिसळ झाली असेल.



# ४१.

# कौल-प्रसाद : दैवी शक्तींकडून मिळालेले रक्षणाचे आश्वासन

प्रतिदिनी आणि प्रतिक्षणी अनेक आपत्ती आणि संकटांचा सामना करीत जीवन जगण्याचा आटापिटा करणाऱ्या आदिम मानवाने, या विश्वात संचार करणाऱ्या अदृश्य आणि गूढ अशा शक्तींची कल्पना करून आपल्या रक्षणार्थ तिचे आवाहन केले. वेळप्रसंगी तिला हाक दिली, तिच्या जागृतीसाठी साकडे घातले, तसेच कार्यसिद्धी करण्यासाठी नवसही बोलले.

व्याघ्र अवस्थेत या शक्तीच्या अस्तित्वाची मानवाच्या मनात रुजलेली भावना, त्याच्या शेती अवस्थेत विस्तारीत होत गेली. आपल्या जीवनातील जनन, पोषण आणि रक्षण ही तीन लक्ष्यं सिद्ध करण्यासाठी त्याला या शक्तीची कृपादृष्टी अत्यंत मोलाची होती. याच काळी ग्राम संस्कृतीची पायाभरणी झाली. आधीचा टोळी प्रमुख आता 'ग्रामप्रमुख' बनला. त्याचे कार्यक्षेत्र विस्तारले. अधिक जनांच्या रक्षणाची जबाबदारी त्याच्या खांद्यावर आली. आता त्याला नुसते या शक्तींना आवाहन करून भागणार नव्हते, तर त्या शक्तींकडून आश्वस्त होणे जरुरी होते. त्या शक्ती खरोखरच आपल्या समूहाचे रक्षण करील, त्यांच्या पोटा-पाण्याची चिंता मिटवील याची त्याला पक्की खात्री हवी होती. त्या शक्तींकडून प्रत्यक्ष 'भाक' (भाषा, शब्द) हवी होती. या साऱ्या प्रयोजनातून, या शक्तींकडून शब्द घेण्याचे एक यातुतंत्र मानवाने रचले, जे विविध ठिकाणी, विविध नावांनी ओळखले जाऊ लागले. कोकणात या तंत्राला 'कौल' या नावाने ओळखतात. हा शब्द मूळ 'अरबी' आहे. अरबी भाषेच्या प्रभावाआधी येथील मूळ आदिवासी कोणत्या शब्दात

या तंत्राला ओळखत होते याविषयी सध्या मला संदर्भ सापडले नाहीत. मात्र, कौलाची म्हणजे सुष्ट (देवी) शक्तींकडून आपल्या रक्षणाचा किंवा इच्छापूर्तीचा शब्द घेण्याची प्रथा भारतात सर्वत्र आहे. जगभरातील आदिम संस्कृतींतही ती अस्तित्वात होती याचे संदर्भ सापडतात. इंजिप्शियन, ग्रीक आणि रोमन संस्कृती या संदर्भाने सुप्रसिद्ध आहेत. महाराष्ट्रातील या प्रथेचे रुप गोव्यातील परंपरेशी मिळते-जुळते आहे.

गोव्यात कौलाच्या दोन तऱ्हा सापडतात. एकामध्ये आवाहन केलेली शक्ती प्रत्यक्ष मानवी देहात अवतरते (संचारते) आणि शब्द रुपाने आपल्या भक्तांना, म्हणजे ज्यांनी आवाहन केले त्यांना, त्यांच्या रक्षणाचे आश्वासन देते. कोकणीत याला 'उत्तर दिलें' किंवा 'शब्द दिलो' असे म्हणतात. ही शक्ती शब्दाबरोबरच प्रतिक रुपानेही आश्वासन देते, म्हणजे विभूती, नारळ, फूल, अक्षदा या स्वरुपात कौल मागणाऱ्याला शब्द देते. सर्वसामान्यपणे कौल हा नारळाच्या रुपांत दिला जातो. नारळ देण्यामागे येथे एक सांकेतिक अर्थ आहे. कुणाला 'प्रमाण' करायचे असेल, म्हणजे बोलणारा माणूस सत्य बोलतो याची खात्री करायची असेल तर त्याच्या हातात 'नारळ' देऊन बोलायला लावले जाते. माझ्या मते येथे नारळ वापरण्यामागेसुद्धा हीच श्रद्धा असली पाहिजे. कौल मागणारा अंवसराच्या (ज्याच्या अंगी संचारले तो, याला 'भार' असेही संबोधतात.) हातात नारळ देतो. अंवसर आपल्या कपाळाला तो टेकवून नंतर विभूतीसह तो नारळ परत त्याच्या ओंजळीत टाकतो. हा नारळ दुसऱ्या वर्षीचा कौल घेईपर्यंत घरात वर्षभर जपून ठेवतात. कौलाचा हा नारळ घरादाराचे रक्षण करतो, अशी लोकमानसात धारणा आहे.

कौलाची दुसरी तऱ्हा म्हणजे 'प्रसाद लावणे'. जिथे अवसर येण्याची परंपरा नाही, तिथे या प्रकारालाच 'कौल' म्हटलेले दिसते. गोव्यात मात्र अवसराकडून प्रत्यक्ष मिळालेला शब्द हा 'कौल', तर गुरव, भगत, भट (पुजारी) यांच्या मध्यस्थीने फुले, कळ्या, तांदळाचे दाणे, पाने (पानांचे तुकडे) अशा स्वरुपात प्रतिकात्मक रीतीने गूढ शक्तींकडून (देवी) मिळालेला शब्द हा 'प्रसाद' अशा नावाने संबोधतात.

प्रसाद लावण्याचे खास असे तंत्र आहे. गाव आणि दैवत याच्या फरकानुसार त्यात विविधता दिसते. काहींकडे देवाच्या मूर्तीला तर काहींकडे देवळाच्या




**प्रसाद–पाकळी परंपरा आजही प्रचलित आहे.**

विशिष्ट खांबाला प्रसाद लावतात. तसेच पटकोळीचे फूल, तुंब्याची फुले, जास्वंदीच्या फुलांच्या पाकळ्या, तांदूळ किंवा पानाचे तुकडे (करमल झाडाचे) प्रसादासाठी वापरतात. नुसत्या पाण्यात ओल्या करून या वस्तू चिकटवल्या जातात. कुठल्या भागावर चिकटवलेली वस्तू किती वेळामध्ये आणि कुठल्या क्रमाने (डावी आधी की उजवी आधी... वगैरे) खाली पडते, यावर पुजारी (मध्यस्थी) पृच्छकाला पाकळीचा अर्थ सांगतो. इथे नोंद करण्यासारखी गोष्ट म्हणजे कुठलीही वस्तू लावली तरी तिला 'पाकळी' किंवा 'कळी' म्हणूनच उच्चारतात.

पाकळ्या कुठल्याही पडू देत, शेवटी राखणीची 'पाकळी' किंवा 'कळी' मागितली जाते. लावलेल्या वस्तूंमध्ये राखणीच्या अर्थाने लावलेली वस्तू पुजारी पृच्छकाला गुंडाळून घरी न्यायला देतो. ती एक तर देव्हाऱ्यात ठेवायची असते किंवा खायची अथवा अंगावर ठेवायची असते. यातसुद्धा विशिष्टपणा असतो. कुटुंबाच्या रक्षणासाठी मागितलेली 'कळी' देव्हाऱ्यात ठेवतात, तर एखाद्या कुटुंबातील सदस्यासाठी मागितलेली कळी, त्याच्या अंगावर ठेवतात. नाहीतर त्याला भक्षण करायला देतात. 'प्रसाद' सार्वजनिक कार्यासाठी तसेच व्यक्तिगत कार्यासाठीही आज लावलेला दिसतो, तरी त्याचा मूळ उगम समूहाच्या वृद्धीसाठी झाला हे एकंदर परंपरांवरून सिद्ध होते.

अंवसरांकडून कौल घेण्याची प्रथा प्रामुख्याने दसऱ्याच्या उत्सवाशी निगडित असून ती प्रसाद घेण्याच्या प्रथेपेक्षा जुनी, मूळची. प्रसाद रुपे कौल



**कौलाची परंपरा आजही अस्तित्वांत आहे. (पेडणे, १९९३)**

घेण्याची प्रथा त्यानंतर उदयाला आलेली आहे. आदिम काळी ज्या वेळी समाज गूढ शक्तींच्या प्रभावाने पूर्ण भारावलेला होता, त्या काळी तो विशिष्ट प्रसंगी त्या शक्तींचे आवाहन करून त्यांना मानवी देहात अवतरवून आपले कार्य सिद्ध करीत होता. शिगम्याच्या परब-उत्सवातील 'गडे' या संबंधीचे एक महत्त्वपूर्ण उदाहरण आहे. माझ्या मते कौलाची परंपरा मूळची शेती व्यवहाराशी म्हणजे भातकापणीशी संबंधित आहे.

दसऱ्याचा उत्सव हा खरा सुगीचा उत्सव. पूर्वीच्या काळी दसरा झाल्याशिवाय म्हणजे दसऱ्याचा कौल घेतल्याशिवाय शेत कापणीला सुरवात होत नसे. ज्या गावांत दसऱ्याला अंवसर येतात ते त्यांच्या तरंगासहित (कधी पालखीसह) गावच्या नमशींनी (देवकार्यासाठी राखून ठेवलेल्या जमीनी) किंवा मुख्य शेतीत येऊन कौल देतात आणि नंतरच कापणीला सुरवात होते. आजही गोव्यातील काही गावांत ही प्रथा रुढ आहे. पारोडे येथील चंद्रेश्वर-भूतनाथाचे अंवसर-तरंगे त्याच्या पायथ्याशी असलेल्या मुळे येथील 'गोंसायांच्या नमशीत' येऊन गेल्याशिवाय तिथे कापणीला सुरवात होत नाही, हे एक उदाहरण येथे देता येते. येथील ग्रामस्थ भारांकडून घेतलेला कौल (नारळ) नेऊन घरात ठेवतात. पूर्वीच्या काळी आणि आजही शेती असलेल्या घरांत हा नारळ

भाताच्या राशीत (ढिगांत) ठेवला जातो.

या जगातील सारे व्यवहार नियंत्रित करणाऱ्या त्या सार्वभौम शक्तीनेच, आपण पेरलेले बी मातीत रुजवून आणले. त्याला ऊन-पाणी दिले, तुफान-वाऱ्यापासून, जनावरे-श्वापदांपासून त्यांचे रक्षण केले. त्या बियापासून तयार झालेले पीक, ही त्या शक्तीचीच कृपा, तिचीच देण. तेव्हा तिची ही देण आपण घरी घेऊन जाताना, तिचा 'शब्द घेणे' अत्यंत जरुरी आहे. नाहीतर तिच्या नाराजीने सारे धान्य नासून जाईल, खराब होईल, आपण दाण्या-गोट्याला महाग होऊ, या श्रद्धेतूनच आणि भितीतूनही दसऱ्याच्या उत्सवात अवसर-कौल या प्रथा जन्माला आल्या, असे एकंदर हे परंपरेचे अवलोकन केल्यास स्पष्ट होते. तसेच दसऱ्याशी जुळलेल्या इतर प्रथा नव्या पिकाचा आनंद व्यक्त करतात, ही गोष्टसुद्धा लक्षात घेण्याजोगी आहे.

शेतकापणीसाठी परवानगी घेणे कौल प्रथेचे मुख्य प्रयोजन. घर-समूह, व्यक्ती-सदस्य आणि गुरे-वासरे यांचे रक्षण ही या प्रथेला जुळलेली दुय्यम प्रयोजने आहेत.

कौलाचे दुसरे रुप असलेले, प्रसाद घेण्याचे तंत्र हे नंतर गरजेतून निर्माण झाले म्हणावे लागेल. कारण कापणी व्यतिरिक्त इतर गोष्टींसाठी सुद्धा माणसाला त्याच्या जीवनपथावर देवाच्या शब्दाची गरज भासू लागली. उदाहरणार्थ आजार, आर्थिक व्यवहार, लग्न ठरवणे इत्यादी. त्यासाठी एक वर्ष, म्हणजे पुढील सुगीपर्यंत थांबणे गैरसोयीचे किंवा अडचणीचे होऊ लागले. यावर तोडगा म्हणून मग लोकमानसाने प्रसादाचे हे तंत्र निर्माण केले असे स्पष्ट होते. ती शक्ती आणि सामान्य माणूस (पृच्छक) यामधला मध्यस्थी, ज्याच्यावर अंवसर अवतरायचे, तोच सुरवातीला प्रसाद तंत्राच्या आधारे त्या शक्तीकडे गरजेच्या प्रसंगी संवाद साधायचा (अशी धारणा) आणि पृच्छक व्यक्तीला देवाची मर्जी-गैरमर्जी कळवायचा.

गोव्यात तसेच कोकणात गुरव, भगत, मेस्त (सुतार) यांच्या अंगात अंवसर यायचे आणि तेच पूर्वी प्रसाद लावायचे. भटाचा प्रवेश या क्षेत्रात नंतर झाला. परीट, न्हावी आणि भंडारी यांच्यावर अंवसर येत असल्याची माहिती मिळते; मात्र ते प्रसाद लावत असल्याची माहिती नाही.



## ४२.

# भूते घालवणे : अंवसराचे एक महत्त्वाचे कार्य

मृत्युनंतर माणसाचे काय होते, या गूढ प्रश्नातून आदिम मानवाने 'भूत' किंवा 'प्रेतात्मा' या संकल्पनेची निर्मिती केली. मृत्यूनंतर मानवाच्या शरीरातील आत्मा एका विशिष्ट कालानंतर आणि विशिष्ट यागानंतर दुसऱ्या देहात प्रवेश करतो आणि पुनर्जन्म घेतो, अशी या काळी मानवाची दृढ धारणा होती.

या धारणेतूनच, जर मृत्यू पावलेल्या माणसाच्या काही इच्छा (त्या जन्मातील) अतृप्त राहिलेल्या असतील, त्याचा जीव त्याच्या आप्तस्वकीयांमध्ये अडकून राहिलेला असेल, त्याला अवेळी मृत्यू आला असेल किंवा त्याच्या मुक्तीसाठी परंपरेने उपयोजलेले याग पूर्ण झालेले नसतील, तर त्याचा आत्मा घुटमळत राहतो आणि तो 'भूत' बनतो. त्याचा समावेश भूतयोनीत होतो, अशी समजूत आदिम काळी जन्माला आलेली होती.

मानवाच्या उत्क्रांती अवस्थेच्या सुरवातीच्या टप्प्यावर जन्माला आलेल्या या धारणेची पाळे-मुळे एवढी खोलवर आणि मजबूत होती की हजारो वर्षांच्या कालप्रवाहातही ती टिकून राहिलेली आहेत. आजही 'भूत-प्रेतात्मा' यासारख्या संकल्पनेने लोकमानसाला पछाडलेले आहे. शहरी आणि शिक्षित समाजात या धारणेचा प्रभाव थोडा सैल असला तरी तो पूर्णपणे पुसून मात्र गेलेला नाही.

मृत्यू पावलेल्या माणसाचे लिंग, वय, जात, धर्म, त्याचबरोबर मृत्यू येण्याचे कारण आणि प्रकार यावरून या भूताला लोकमानसात नावेही दिलेली सापडतात. माझ्या मते, ही नावे मानवाच्या मानसिक विकासाबरोबर, जेव्हा भाषेचा विस्तार होत गेला, संस्कृतीचा पाया रचला गेला, तेव्हा एक एक



**भूताची संकल्पना आदिवासी आणि अप्रगत समाजात अजुनही रूढ आहे. (पेडणे, १९९३)**

करून अतृप्त आत्म्यांना दिली गेली.

भूताची संकल्पना जगभर आहे. वेगवेगळ्या समाजात, धर्मात, भाषेत त्यांना वेगवेगळी नावे आहेत. गोव्यातील काही नावे खालील प्रमाणे आहेत. :

**समंध** : बारा वर्षांवरील वयाचा, परंतु लग्न न केलेला, आगीत होरपळून, झाडावरून पडून, साप चावून किंवा एकाद्या अपघाताने मरण पावलेला पुरुष.

**खेत्री** : लग्न झालेला, परंतु अपघाती मरण पावलेल्या पुरुषाचा आत्मा.

**निमो किंवा दिणो** : बारा वर्षांखालील मरण पावलेला मुलगा.

**मुंजा** : मौजीबंधन केलेला, परंतु लग्न न झालेला मुलगा.

**सटी** : लहानपणी लग्न झालेली, परंतु ऋतुमती होण्याआधीच मरण पावलेली स्त्री (मुलगी).

**वारगत** : (अवगत, देवगत, म्हारगत) ऋतुस्राव चालू असताना मरण पावलेली स्त्री.

**आलवांतीण** : गरोदर अवस्थेत किंवा बाळंत होताना (बाळंत होऊन एका महिन्याच्या आत) मरण पावलेली स्त्री.

**निपुत्रिक** : मूल न होता मेलेली स्त्री किंवा पुरुष.

**बाळसटी** : तीन वर्षे पूर्ण होण्याआधी मरण पावलेले मूल.

**ब्रह्मराक्षस** : मरण पावलेला पापी ब्राह्मण.

दक्षिण भारतात 'भूत' या संकल्पनेकडे जरा वेगळ्या दृष्टीने बघितलेले दिसते. येथे 'भूत' हे नाव अदृश्य, अतिमानवी शक्तीला उद्देशून वापरलेले दिसते. ही शक्ती विशिष्ट प्रसंगी किंवा विशिष्ट उत्सव प्रसंगी अनार्य किंवा असूर जमातीच्या अंगात संचारते. ज्या माणसाच्या अंगी ती शक्ती संचारते, तो माणूस रुद्र वेशभूषा धारण करतो. हत्यार किंवा कोलीत पाजळीत नृत्य करतो. विविध परंपरा त्याच्या हस्ते संपन्न केल्या जातात. या भूताला संबंधित गावचे किंवा समाजाचे रक्षण करण्यासाठी आवाहन केले जाते.

ज्या भूताचा सुरवातीला उल्लेख झाला ते भूत मात्र एक अतृप्त आत्मा असून तो ज्याला झपाटतो (पछाडतो) त्या व्यक्तीला तो त्रास देतो. त्यांच्या कुटुंबाला त्रास देतो, कधी कधी गावालाही (वस्तीलाही) त्याचा त्रास होतो. झपाटलेली व्यक्ती काहीबाही बरळते, उगाच रडते, विविध भाषा बोलते, ज्याचे भूत आहे त्याच्या ओळखीच्या खुणा सांगते, त्यांच्यासारखे वागते, कुणी त्याला मारले किंवा हत्या केली वगैरेचा संशय असेल तर त्याचे नाव घेते इत्यादी. कधी कधी ते जवळ येणाऱ्या माणसाचा गळाही दाबते किंवा तसा प्रयत्न करते अशी समजूत आहे.

सगळ्या भूतांमध्ये समंध, खेत्री आणि आलवांतीण ही भूते मानतात. आलवांतीण दिसली तर मध्यरात्री किंवा दुपारी दिसते. ती लाल कपड्यांत दिसते. ती लाल फुले माळते, हातात हिरवा चुडा, कपाळी लाल कुंकू, हातात लहान मूल, जास्त करून ती मुलाला घेऊन रडताना दिसते, अशी समजूत आहे. वारगत ही म्हातारीच्या रुपात दिसते, असे सांगतात.

वारगत बहुतेकदा दिवा-वात पेटवताना दिसते. ती सहसा कुणाला त्रास देत नाही; परंतु 'शेळ्या नक्षत्रां'च्या (घाबरट) माणसाला ती दिसली तर तो 'अंग काढतो' (दचकतो, घाबरतो) आणि आजारी पडतो.

माझ्या आमोणे गावात जल्म्याच्या मठासमोर 'म्हाल वारगतीची शिळा' आहे. गावावर संकट येणार असेल तर वारगत गावप्रमुखाला दृष्यरुपात दिसते आणि त्याविषयी सूचित करते, अशी समजूत आहे.

'भूतबाधेपासून' म्हणजे झपाटण्यापासून मुक्त होण्यासाठी मानवाने खूप

उपाय–तोडगे काढलेले दिसतात. भूतापेक्षा ताकदवान अशा अतिमानवी आणि दैवी शक्तीचा धाक घालून किंवा त्या शक्तींना अवतरवण्यास लावून त्यांच्या हस्ते त्यांना घालवून लावण्याचा प्रयत्नही केलेला दिसतो. कधी 'घाडपण-बंठपण' सारखी जादुतंत्रे करून त्यांना पळवूनही लावले असेही ऐकिवात येते.

भूतांना घालवण्याचे जे कित्येक उपाय माणसाने उपयोजिले आणि जे आजही लोकसंस्कृतीत रुढ असलेले दिसतात, त्यामधील एक उपाय म्हणजे दसऱ्याच्या दिवशी स्थानिक देवळांत अवतरणाऱ्या अंवसरावरवी त्यांना बेतकाठीचा धाक दाखवून घालवणे किंवा बेताच्या छड्यांनी बदडून पळवून लावणे.

ग्रामीण उक्तीप्रमाणे 'भूताने पछाडणे' याला 'पिशें लागणे' असे म्हणतात. भूत काढण्याचे कार्य फक्त 'भूतनाथ' आणि 'रवळनाथ' हे दोनच देव (अंवसर) करू शकतात, अशी समजूत आहे. 'भूतनाथ' देवाला भूतांचा राजा मानतात. त्याला भूते घाबरतात किंवा त्याचे सांगणे ऐकतात. रवळनाथ हा भूतनाथासारखाच रौद्र देव आहे. भूतनाथ हा त्याचा सेनापती किंवा सहाय्यक. जी भूते भूतनाथाला जुमानत नाहीत, ती रवळनाथ काढतो अशी समजूत आहे.

गोव्यात खूप ठिकाणी दसऱ्याला अंवसर अवतरतात. त्यामध्ये भूतनाथ आणि रवळनाथाचेही अंवसर असतात. ते 'पिशे' काढतात. गोव्यात साष्टी तालुक्यातील पारोडे येथील दसरा, तसेच पेडणे येथील दसरा, 'भूत' काढण्यासाठी अत्यंत प्रसिद्ध आहे. दूर दूरहून लोक 'पिशे लागलेल्या' म्हणजे भूताने पछाडले आहे अशी समजूत असलेल्या आपल्या नातेवाईकांना घेऊन येतात. पारोडे येथे आधी भूतनाथ 'पिशे' काढण्याचे कार्य करतो. जी भूते त्याला जुमानत नाहीत ती चंद्रेश्वराचा अंवसर काढतो. चंद्रेश्वर आणि रवळनाथ हे दोघेही देव महादेवाचा अवतार मानतात आणि महादेव हा भूतांचा अधिपती अशी धारणा आहे.

सुरवातीला भूतनाथ देवाचा अंवसर 'भूताला' तो कोण, कुठचा याविषयी विचारणा करून त्याला संबधित शरीरातून निघून जायला सांगतो. भूत जर त्याला जुमानत नाही, तर तो बेतकाठीचा धाक दाखवतो. तरीही भूत बधले नाही तर तो भूताला बदडून (भूत अंगावर असलेल्या व्यक्तीला) काढतो. भूत माराला घाबरून हात जोडते, 'आपण जाते, आपल्याला मारू नको' म्हणून

विनंती करते. भूत अंगावरून निघून गेले म्हणजे ती व्यक्ती मूर्च्छित होते. तिच्या तोंडावर मग देवाचे तीर्थ मारतात आणि जागे करतात. तीर्थ प्यायला देतात. ती शुद्धीवर येते आणि मग भूत गेल्याचा निर्वाळा मिळतो. कधी कधी भूत छलकपट करते. आपण गेल्याचे नाटक करते, पण थोड्या अंतरावर जाऊन आपण तुम्हाला फसवले असे सांगते. मग त्या माणसाला परत भाराजवळ आणतात. यावेळी एकतर भूतनाथ त्याला दुपट्टी चोप देतो किंवा चंद्रेश्वराचा (रवळनाथाचा) अंवसर त्याला दम-धाक देऊन घालवून देतो. शिक्षणाच्या प्रसाराबरोबर हल्ली भूत काढण्याचे प्रकार अपवादानेच दिसतात.



४३.

# नृत्यातून अदृश्य शक्तींचे वशीकरण

सृष्टीतील विविध घटना बघून भांबावलेल्या आणि जनन, मरण, रक्षण या जीवनासंबंधी तीन कार्यांच्या पूर्तीसाठी अथक संघर्ष करणाऱ्या आदिम मानवाने त्या सृष्टीवर अधिराज्य करणाऱ्या अदृश्य शक्तींची कल्पना करून तिच्या वशीकरणासाठी जी कित्येक यात्विक कृत्ये केली, त्या कत्यांमधील एक अतिशय महत्त्वाचे कृत्य म्हणजे 'नृत्य'.

पदन्यास, अंगविक्षेप, मुद्रा आणि त्यांच्या संयुक्त सादरीकरणातून घडणारा कलात्मक आविष्कार, या दृष्टिकोनातून आज नृत्य या प्रकाराकडे बघितले जाते. मात्र ज्या काळी या प्रकारचा जन्म झाला, त्या काळी त्याचे स्वरुप निखळ एक यात्विक कृत्य असे होते. आपल्याला ज्या गोष्टीची अपेक्षा आहे, त्या गोष्टींची नक्कल करून, त्याची प्राप्ती अदृश्य शक्तींकडून करून घेण्याचा प्रयत्न आदिम मानवाने नृत्यावरवी केला. याची सुरवात मानवी संस्कृतीच्या प्राग काळी झालेली आहे. गुहेत राहणाऱ्या आणि शिकारीसाठी वणवण फिरणाऱ्या आदिम मानवाने, अपेक्षित असलेल्या शिकारीची नक्कल करून ती प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न केला. यातून विशिष्ट पदन्यास, अंगविक्षेप तयार झाले. पुढे त्याच्या बौद्धिक विकास पथावर, जेव्हा वस्ती करून एका जागी राहण्यास त्याने सुरवात केली आणि शेती करण्यास प्रारंभ केला, तेव्हा त्याच यात्विक कृतीचे स्वरुप विस्तारले. पृथ्वीच्या किंवा भूमातेच्या सुफलीकरणाचे प्रयोजनही त्याच्या नक्कलकृतीत समाविष्ट झाले. पुढे त्यांत अधिक सराईतता येऊन कलात्मक भाव अभिव्यक्त झाला आणि मुळच्या विधीला 'नृत्य' ही ओळख प्राप्त झाली.

मानवाच्या प्रारंभीच्या जीवनकाळी, तो अदृश्य शक्तींना वचकूनही होता. या शक्तीकडे संवाद करण्याची किंवा संपर्क करण्याची ताकद टोळीतील एखाद्याच ताकदवान माणसाकडे आहे. (उदा. प्रमुख, पुजारी वगैरे) अशी त्याची धारणा होती आणि या धारणेतून, आपण आपल्या अपेक्षित मागण्यांची नृत्यरूपे नक्कल करून जेव्हा या शक्तीपुढे ठेवतो तेव्हा ती शक्ती प्रत्यक्ष अवतरून आपल्याला आश्वस्थ करते, अशी त्याची दृढ समजूत होती. या समजुतीतूनच भूत नृत्यासारख्या नृत्यांचा जन्म झाला. म्हणजे ती शक्ती अभिप्रेत असलेल्या व्यक्तीच्या अंगात संचारल्यानंतर, शक्तीच्या बलस्वरुप जेव्हा ती थयथयाट करू लागली, एका विशिष्ट रुद्र पद्धतीने उड्या मारू लागली, हावभाव करू लागली, अंगविक्षेप करू लागली. तेव्हा त्या कृतींतून पुढे नृत्याविष्कार घडला.



**धर्मविधीतून नृत्याचा उदय झाला.**
**(सांगेचा वीरभद्र, सांगे, १९९०)**

जगभराच्या आदिम संस्कृतींत 'भूतनृत्य' प्रकार सापडतो. लोकसाहित्याच्या गाढ्या विद्वान दुर्गा भागवत यांनी आपल्या 'धर्म आणि लोकसाहित्य' या ग्रंथात 'भूतांच्या नाचातूनच धर्माचा उदय झाला' असे विधान केलेले आहे. त्यांच्या मते धर्मांची सुरवात इथूनच झाली.

भारतात, खास करून दक्षिणेत भूतनृत्ये सापडतात. 'भूतक' या शब्दाचा अर्थ सर्वसामान्यपणे प्रेतात्मा या अर्थाने घेतात, तसा इथे अभिप्रेत नसून तो विश्वातील एक अचाटरुपी शक्ती ह्या अर्थाने येतो. कधी कधी कूळ किंवा वंशांची स्थापना करणारी आणि त्यासाठी देवत्त्वाला पावलेली व्यक्तीही (मृत) 'भूत' असते. हे भूत त्याच्याच घराण्यातील वंशजावर अवतरते. भूताची ही परंपरा अनार्य संस्कृतीतील असून बहुतेक ती आदिम वंशांशीच संबंधित दिसते.

'मांग' किंवा तत्सम जमातीत त्याचे प्रस्थ जास्त दिसते. ज्या गावात ही परंपरा आहे, त्या गावाची महाजनकी किंवा प्रमुखपण जरी उच्च जातीकडे असले तरीही विशिष्ट दिवशी, हे भूतनृत्य केले जाते आणि त्या दिवशी त्या घराण्याला गाव-गावस्कीत महत्त्व दिलेले दिसते. रुद्र रंगभूषा-वेशभूषा, मुखवटे, टोप, अंगाला झाडांच्या किंवा ताडाच्या झावळ्या, पाने, वेली... अशा स्वरुपात, काळाला खूप मागे नेणारा, असा या भूताचा वेश असतो. विशिष्ट पदन्यास घालीत नर्तक रूद्र नृत्य करतो, काही पारंपारीक विधीही केले जातात.

आज गोव्यात 'वीरभद्र' नावाने सुप्रसिद्ध असलेल्या नृत्यरुपाचाही बारकाईने अभ्यास केल्यास त्याचे मूळ भूतनृत्याशीच जोडलेले दिसते. भूतनृत्य हे समूहाच्या वृद्धीसाठी केले गेले तरी ते सामूहिक नृत्य नसून एक व्यक्ती किंवा दोन किंवा तीन (मोजक्या) व्यक्तीच यांत नर्तक असतात. सामुहिक नृत्यांतूनच अशा नृत्यांचा उदय झाला हे स्पष्ट आहे.

शिकारी अवस्थेत जरी या समूहनृत्याची पायाभरणी झाली तरी या प्रकाराला पूर्ण स्वरुप आले ते शेती अवस्थेत. भूमातेच्या सुफलीकरणाच्या उद्देशाने ही नृत्ये, शेतीच्या विविध अवस्थांमध्ये केली गेली. तसेच शेतीसंबंधित विविध गोष्टी पूर्ण व्हाव्या या हेतूने त्या नृत्यांत तशी नक्कल केली गेली. नृत्याला पूरक गीतेही गायली गेली.

सर्वसामान्य लोक 'लोकनृत्ये' म्हणजे शेतीच्या कार्यातून फुरसद मिळाल्यानंतर 'विरंगुळा' म्हणून नाचली जाणारी नृत्ये असे विधान करतात. कधी कधी या विषयांच्या अभ्यासकांच्या लेखनातूनही अशी विधाने दिसतात; परंतु ही विधाने चुकीची आहेत. 'लोकनृत्य' किंवा 'लोकनृत्ये' ही मूळची धर्मविधी असा सिद्धांत आज जागतीक स्तरावर विद्वानांनी मान्य केलेला आहे. मुळात आदिमाची कोणतीच कृती विरंगुळा नव्हती. ती नैसर्गिक आणि मानवनिर्मित संकटातून वाट काढण्यासाठी त्याने केलेली धडपड होती. ज्या काळी या नृत्यांचा उदय झाला त्या काळी अतिशय मर्यादित साधनसुविधा मानवाजवळ होती. नव्हतीच म्हटली तरी चालेल. अशावेळी सुष्ट किंवा दुष्ट शक्तींना वश करण्यासाठी, आवाहन करण्यासाठी शारीरिक कृती हेच त्याचे साधन होते आणि त्याच्याच आधारे त्याने ते कार्य पार पाडले. यातूनच नृत्याचा जन्म झाला. भाषेच्या उगमाबरोबर त्यांत उक्तींचा समावेश झाला.

मूळचे विधी रुप असलेल्या नृत्य प्रकारांतील विधी हा भाग समाजाच्या सांस्कृतिक उन्नतीबरोबर मागे राहिला आणि त्यातून कलात्मक अभिव्यक्ती घडली. यातूनच 'नृत्य' हा एक वेगळा कलाप्रकार म्हणून ओळखला जाऊ लागला. मात्र त्यांतील विधीचा भाग पूर्णपणे हरवलेला नाही.

मुळात सर्व लोकनृत्ये ही धार्मिक उत्सव-व्रतांशी जोडलेली आहेत, हेच त्यांचे 'विधी' होण्याचे प्रमाण म्हटल्यास वावगे ठरणार नाही. 'आदिम' ते आदिवासी, आदिवासी ते लोक किंवा नागर आणि आता आधुनिक समाज असा या नृत्याचा प्रवास झालेला आहे. विषयाच्या अभ्यासकांनी जरी आदिवासी नृत्ये, लोकनृत्ये अशा संज्ञा वापरल्या (आपल्या सोयीसाठी) तरी ज्या समाजात ही नृत्ये आजही नाचली जातात, त्या समाजात मात्र या संकल्पना प्रचलित नसून त्यांच्या उत्सव-विधीनुसार त्यांना वेगळी नावे आहेत, हे मुद्दाम नोंद करण्यासाखे आहे. तसेच भूतनृत्यासरख्या विधीनृत्यातून विधीनाट्याचा उदय झाला आणि पुढे त्यांतूनच लोकनाट्य उद्‌भवले हीसुद्धा इथे लक्षात घेण्याजोगी गोष्ट आहे.

गोव्यात आज जी लोकनृत्ये हिंदू आणि ख्रिस्ती दोन्हीही समाजामध्ये सापडतात त्यातील वीरभद्रासारखा एखादा अपवाद सोडल्यास ती सर्व सामूहिक नृत्ये आहेत. यात स्त्री आणि पुरुष दोघांनीही वेग-वेगळ्या सादर केलेल्या नृत्यांचा समावेश होतो.

वीरभद्र या नृत्याचा माझ्या मते मूळ उदय भूतनृत्यातून झाला. पुढे त्याचे सांस्कृतिक उन्नयन होऊन पुराण कथेतील वीरभद्राशी त्याचे नाते जोडले गेले. तसेच 'घोडेमोडणी' हे विधीनृत्य असून त्यातील विधीभाग सहजपणे लक्षात येतो. स्त्रियांच्या 'धालो' आणि 'धिल्लो' (धिनलो, दिंनलो) या नृत्य प्रकारांच्या बाबतीतही असेच दिसते.

समाजाच्या उन्नयनाबरोबर सांस्कृतिक प्रथा-परंपरांचेही उन्नयन होते, संस्कृतीकरण होते. हे होताना आदिमांच्या प्रथा-परंपरांना वेद-पुराणांच्या कथा चिकटवल्या जातात. समाज कोणता, त्यांची सांस्कृतिक वैशिष्ट्ये कोणती यांचेही भान ठेवले जात नाही. गोव्यातील आदिवासी कुळंबी (हिंदू) समाजातील स्त्रियांच्या 'धिल्लो' लोकनृत्य परंपरेशी पार्वतीपुत्र कार्तिकेयचा संबंध काही गोमंतकीय अभ्यासकांनी जोडलेला आहे. ●●●

## ४४.

# दिवा :
# आदिमांनी निर्मिलेले अग्नीचे तेज रुप

श्वापदांसारखे जीवन जगणाऱ्या आदिम मानवाने, नैसर्गिक घटनांतून जंगल, अरण्यांना लागलेली आग पाहिली आणि यातूनच त्याने अग्नी निर्माण करण्याचा शोध लावला. त्याच्या प्रगतीच्या इतिहास पथावरील ही एक महत्त्वाची घटना. या घटनेतून त्याच्या प्रगतीच्या वाटेला धुमारे फुटत गेले.

दगडांच्या घर्षणातून ठिणगी निर्माण करून, त्यापासून आग निर्माण करण्याचे तंत्र मानवाने हस्तगत केले तरी या आगीच्या निर्मितीचे त्याला मोठे गूढच पडले होते. आगीमध्ये असलेल्या जाळण्याच्या, भस्मसात करण्याच्या शक्तीविषयी एक भयंकर भीती त्याच्या मनात वसलेली होती. या भीतीबरोबरच या आगीपासून तयार होणारे तेज आणि प्रकाश याचेही महत्त्व त्याने जाणले होते. या आगीला जनावरे-हिंस्र श्वापदे घाबरतात हेसुद्धा त्याने अनुभवलेले होते. डोंगर-कपारी, गुहा-गुंफांनी राहण्याचा हा मानवाचा जीवनकाळ. या काळी त्याने आपल्या गुंफेच्या दाराशी अखंड विस्तव पेटवून हिंस्र श्वापदांपासून, थंडी-हिमापासून आपले रक्षण केले होते. पुढे या आगीत शिकार किंवा अन्न भाजण्याची क्लुप्ती त्याला समजली, जी नंतरच्या काळात शिजवण्यापर्यंत पुढे गेली.

विस्तव किंवा अग्नी नसेल तर संपूर्ण रात्र आपली भयानक अंधारात जाते. (ध्रुव प्रदेशात वास्तव्य करणाऱ्या मानवासाठी तर सहा-सहा महिने अखंड अंधार असतो.) या पार्श्वभूमीवर आदिम मानवाच्या जीवनात अग्नीचे महत्त्व प्रस्थापित, प्रज्वलित होत गेले.

शेती संस्कृतीत पदार्पण झाल्याबरोबर मानवाचा अग्नीकडे बघण्याचा दृष्टिकोन विस्तारला. अग्नीच्या रौद्र रक्षणकारी रुपाबरोबरच त्याचे तेजरुपही त्याने ताडले. अग्नीमध्ये निर्मितीची शक्तीसुद्धा आहे, अशी त्याची धारणा झाली. मातृदेवतेच्या उदयाचा हा काळ. पृथ्वीमातेच्या कुशीत हा अग्नी अखंडपणे प्रज्वलित असतो, ज्याच्या तेजामुळेच ती असंख्य जीवसृष्टीला - वनस्पती सृष्टीला जन्माला घालते, अशी त्याची दृढ समजूत झाली. भूमातेच्या प्रतिक रुप मानलेल्या मानवी स्त्रीच्या कुशीतला गर्भसुद्धा हे अग्नितेजाचे प्रतिक असे त्याने मानले आणि मग पृथ्वीच्या उदरातील हे गर्भतेज अबाधित राहण्यासाठी त्याने अग्नितेजाचे प्रतिक असलेल्या दिव्याची निर्मिती करून त्याची आराधना केली.

सर्वसामान्यपणे उजेडासाठी दिव्याची निर्मिती झाली किंवा केली गेली अशी समजूत आहे, परंतु माझ्या मते समूहजीवन जगणाऱ्या मानवाने त्यासाठी केलदे (जूडी, पलिते) सारख्या वस्तूंची (साधनांची) निर्मिती केली होती आणि त्या वातावरणात ते जास्त उपयुक्त ही होते. 'ज्योत' पेटवण्याची संकल्पना मानवाच्या मनात पृथ्वीच्या निर्मिती शक्तिला जागृत करण्याच्या उद्देशाने उदयाला आली.

पृथ्वीचे म्हणजे भूमातेचे निर्मिती चक्र अखंड चालू राहण्याच्या कामनेनेही या काळी मानवाने 'दिवे' (दीप) पेटवण्यास आरंभ केला. गोव्यात किंवा पर्यायाने भारतात दीपोत्सवाच्या किंवा 'दीप' पेटवण्याच्या ज्या परंपरा प्रचलित आहेत, त्यांचा अभ्यास केल्यास, त्या मागे हीच श्रद्धा दिसते. या प्रथा-परंपरांच्या कार्यकाळाचा अंदाज बांधल्यास त्याला पुष्टी मिळते. एका दृष्टीने सारे दीपोत्सव हे सृजनोत्सव आहेत. एक तर ते भूमाता सुफलित होण्याआधी संपन्न केले जातात (म्हणजे इच्छित कार्य व्हावे म्हणून) किंवा भूमाता सुफल झाल्यावर (म्हणजे इच्छित कार्य पूर्ण झाल्यावर) साजरे केले जातात.

मराठीत 'दीप' आणि 'दिवा' अशा दोन वेगवेगळ्या संज्ञा सापडतात. देवासमोर किंवा सांस्कृतिक पारंपरिक कार्यात पेटवतात तो 'दीप' आणि उजेडासाठी पेटवतात तो 'दिवा' (केरोसिनचा) असे सर्वसामान्यपणे म्हटले जाते. कोकणी भाषेत मात्र दोन्हींना 'दिवो' (दिवा) असेच म्हणतात. 'जोत' हा शब्द 'ज्योत' या अर्थाने असला तरी कधी कधी ग्रामीण व्यवहारात देवासमोर पेटवण्यात येणाऱ्या दिव्याला 'ज्योत' असेही उद्‌गारले जाते.


पणतीच्या मातीरूपात अर्थता आहे.

देवासमोर पेटवण्यात येणारा हा दिवा किंवा ज्योत केरोसिनने पेटवणे निषिद्ध आहे. तसेच त्याची वात कापसांची (कापशीण अथवा ग्रामीण शर्वरी) असावी लागते. पूर्वीच्या काळी 'पद्मसूत्र', 'दर्भसूत्र' वगैरे वातीसाठी वापरण्यात येत असल्याची माहिती सापडते.

माझ्या मते भूमातेच्या आराधनेच्या उद्देशाने निर्माण झालेल्या दिव्याच्या संकल्पनेतूनच पुढे उजेडाच्या दिव्याची निर्मिती झाली. 'पणती' हे या दिव्याचे मूळ रुप. या पणतीचा आकार आणि रचना निरखल्यास त्यात एक सांकेतिक अर्थ लपलेला दिसतो. पणतीची आकृती योनीसदृश्य आहे. तिच्या खोलगट भागात असलेले तेल हे उदरातील गर्भजल रुप असून त्यापासून अग्निज्योत पेटते. या ज्योतीसाठी वापरण्यात येत असलेल्या वाती जोडीने घालाव्या लागतात. त्यासुद्धा दोन्ही तळहातावर चोळून एकरुप करतात. या वातीचे दोन असणे सुद्धा सांकेतिक वाटते. स्त्री-पुरुष दोघांच्या संयोगातून म्हणजेच एकरुपांतून नवजीवाची निर्मिती होते, हीच सूचकता या पणतीच्या निर्मितीमागे आहे.

'पणती' मातीची असते हेसुद्धा अर्थरुप आहे. माती हे भूमातेचे रुप. या पणत्या बनवणाऱ्या कुंभाराला गोव्यातच नाही, तर भारतातील कित्येक स्त्री देवतांच्या मंदिरात खास स्थान आहे, हे सुद्धा नोंद घेण्याजोगे आहे.

एक गोष्ट इथे नमूद करावी लागेल, मातीच्या पणत्या बनवण्याआधी 'दगडी' (पाषाणी) पणत्या होत्या. ही गोष्ट दिव्याचा पाषाण युगाशी संबंध सांगणारी आहे. (माझ्या आमोणे गावात 'खुंटी' मायेसमोरची पणती दगडी आहे.)

पाषाण युगातून पुढे जाता जाता, मातीच्या पणत्यांची निर्मिती झाली, हे उघड आहे. पुढे धातूंच्याही पणत्या तयार झाल्या. मात्र मातीच्या पणतीचे परंपरेत स्थान राखून ठेवले गेले. त्याही पुढे मानवाच्या कला विकासाबरोबर तऱ्हेकवार प्रकारचे दिवे उदा. समया, नंदादीप, लामणदिवे, निरांजने वगैरे

निर्माण झाली. या दिव्यांचे आकार-प्रकार वर वर पाहता वेगळे दिसले तरी बारकाईने निरखल्यावर पणतीचे मूळरूप त्यात जतन केलेले दिसते. काही विधींनी खास कणकेचे दिवे वापरतात. या दिव्यांमध्ये सुद्धा ते रुप सांभाळलेले दिसते. सुरवातीला हे दिवे किंवा पणत्या जनावरांच्या चरबीपासून पेटवल्या जायच्या, पुढे मग तेल-तूप आले. नारळाच्या करवंटीतूनही ज्योत पेटवत असल्याची माहिती मिळते. गोव्यात मात्र करवंटी पेटवत नाहीत तर नारळाच्या 'वळ्यांत' (खोबरे असलेला अर्धा भाग) ज्योत पेटवतात.

पणतीचे योनीसदृश्य रुप स्पष्ट करण्याच्या उद्देशाने एक प्रथा मुद्दाम येथे नोंद कराविशी वाटते. घरी पणती (नातवाला किंवा नातीला झालेली मुलगी) जन्माला आली तर पणजीने तिच्या बारशाला सोन्याची पणती पेटवण्याची प्रथा गोव्यात आहे.

आदिम मानवाने मानवी स्त्रीला मातृदेवीचेच रुप मानले आणि तिची पूजा-प्रार्थना सुरवातीला तिच्याच हाताने संपन्न केली. याला धरून भूमातेला दीप पेटवून तिची आराधना करण्याचे कार्य प्रथमतः स्त्रीनेच केले. 'दिवाळी' किंवा 'दीपावली' (दीपोत्सव) सारख्या खास दिवे पेटवण्याच्याच सणात याची प्रचीती येते. गोव्यात दिपावलीला ग्रामीण भागात नदी-पाणवठ्यांची पूजा करून स्त्रिया कणकेचे दिवे पेटवतात. घरी-दारी दिवे लावतात, पुरुष मंडळींचे दिवे दाखवून औक्षण करतात. थोरल्या दिवाळीला (देवदिवाळी किंवा तुळशीचे लग्न) स्त्रिया तुळशीला खास दिवे ओवाळतात. काही जागी याला 'जोडवी' म्हणतात, काही लोक 'आरत्या' म्हणतात, तर काही गावी किंवा घराण्यात 'दिवज' म्हणतात. (दिवजांसाठी खास प्रकारचा दिवा असतो.)

स्त्रियांनी दिवे पेटवण्याची प्रथा भारतभर असली तरी गोव्यात ज्या तऱ्हेने 'दिवज' पेटवले जाते ते बघितल्यास, दिवजांची प्रथा ही खास गोमंतकीय म्हटल्यास चूक होणार नाही. तशी गोव्याच्या उत्तर-दक्षिण दोन्हीही सीमेवर ती कुठे कुठे ऐकिवात येते. मात्र गोव्यात प्रामुख्याने प्रचलित दिसते. इतिहास काळी गोव्याहून केरळमध्ये स्थलांतरित झालेल्या कोकणी समाजाने ती आपल्याबरोबर तिथे नेलेली आहे.

'दिवज' म्हणजे पाच पणत्या बसवून तयार केलेला दिवा. त्याला पकडायला एक छोटासा दांडा किंवा मूठ असते. 'दिवज' हे मूळचे मातीचे.

कालपरत्वे आता पितळ-स्टीलची दिवजे अवतरलेली आहेत.

विशिष्ट उत्सव-जत्राप्रसंगी आपल्या कुलदैवताच्या समोर स्त्रियांनी दिवज पेटवण्याची (ओवाळण्याची) प्रथा आहे. सामूहिक रीतीने ही दिवजे पेटवतात. गोव्याच्या गावडी, कुळंबी, नाईक, देसाई, खारवी, महार, सूतार या जाती-जमातींमध्ये ही प्रथा प्रामुख्याने दिसते. अपवादानेच ती ब्राह्मण (सारस्वत) समाजामध्ये आहे. ब्राह्मण समाजातील स्त्रिया तुळशीला देवदिवाळी दिवशी आरत्या ओवाळतात. गोव्यात मोरजी, चोपडे, मांद्रे, पार्से, धारगळ, कोरगाव, शिवोली, हडफडे, आगरवाडा, बोरी, मडकई, कुंडई, आमोणे (डिचोली तालुका), काणकोण-श्रीस्थळ येथील दिवजांच्या जत्रा प्रसिद्ध आहेत. यातील बहुतेक जत्रा कार्तिक पौर्णिमेला होतात, काही थोरली दिवाळी ते मालिनी पौर्णिमेपर्यंत विशिष्ट तिथीला होतात. काही गावांत प्रमुखतः केपे-काणकोण येथील कुळंबी समाजाची (हिंदू) दिवजे फाल्गुन पौर्णिमेला होतात. दिवजांची सुरवात बहुतेक पहाटेला होते. देवळाच्या किंवा देवस्थळाच्या अमूक प्रदक्षिणा घालून दिवजांची फेरी विसर्जित होते. दिवज पेटवणाऱ्या स्त्रिया मुख्यतः अहेव स्त्रिया असतात. अहेवपणाची सगळी लेणी घालून ती दिवज पेटवतात. त्याचबरोबर या घराण्यातील नऊ वर्षांवरील, परंतु ऋतुप्राप्ती होण्याआधी कुमारी कन्यांनी दिवज पेटवण्याचीही प्रथा आहे. अशा घराण्यात या कन्यांच्या दिवजाला (लग्नाआधी एकदाच) खूपच महत्त्व दिले जाते. त्यांना नववधूचा शृंगार घातला जातो. या विधींत मामाची भूमिका अतिशय महत्त्वाची आहे. एके काळी मामा भाचीला खांद्यावर उचलून प्रदक्षिणा काढायचे. गोव्यात काही गावांत 'माल्याची जत्रा' होते.

आज पुरुष पुजारी हे माले डोक्यावर घेतात तरी सुरवातीला स्त्रीयाच ते नाचवीत होत्या, असे म्हटल्यास चूक होणार नाही. या साऱ्या उल्लेखीत प्रथा आणि इथे न उल्लेखलेल्या कित्येक प्रथा, दिव्याचे सृजनप्रतिक रुप स्पष्ट करत आहेत.

भूमातेच्या सुफलीकरणाच्या उद्देशाने, दिवे पेटवून तिच्या सृजनाचे अखंडत्व सदैव तेवत राहण्याची कामना केली जाते, त्याच तऱ्हेने स्त्रीचे उदर सुद्धा सृजनगर्भाने फलित होण्यासाठी दिवे पेटवले जातात. दिवजांच्या विधीत खास करून कुमारी कन्येने दिवज पेटवण्यामागे सुद्धा हीच धारणा आहे. एक

तऱ्हेचा हा 'पौगंड विधी' (Puberty rite) आहे. लग्नातील 'शकुन दिवा' हा नववधूच्या उदराचे प्रतिकरुप असून ते उदर लवकरच गर्भ तेजाने प्रज्वलित होवो ही त्या मागची कामना आहे.

एकंदर घरातील कोणत्याच शुभकार्याची सुरवात दिव्याशिवाय होत नाही. दिवा पेटवूनच साऱ्याची सुरवात होते. दिव्याच्या ज्योतीसारखी जीवनाची ज्योत निरंतर तेवत राहावी आणि पृथ्वीचे अखंडत्व अबाधित राहावे, हीच कामना 'दिवा' पेटवण्यामागे असते. 'दिवा' मग ते भारतातील पणती रुप असू दे किंवा पाश्चात्याची मेणबत्ती असू दे, मानवी लोकमानसाने नेहमी हीच कामना केलेली आहे.

●●●

४५.

# मीठ पैरणे : एक आदिम यातुकर्म

अग्निचा शोध ही मानवी उत्क्रांतीच्या पथावरील जशी महत्त्वाची घटना तशीच मिठाचा शोध हीसुद्धा एक महत्त्वाची घटना आहे. 'मीठ' या वस्तूला मानवी संस्कृतीत अतिशय महत्त्व आहे, हे सिद्ध करणारे संदर्भ संस्कृतीच्या शोधवाटेवर सापडतात. वर वर पाहाता एक खाद्यवस्तू एवढेच मिठाचे महत्त्व वाटते; परंतु आदिम संस्कृतीचे जे अवशेष आज उपलब्ध आहेत, त्यांचे बारकाईने अवलोकन केल्यास आदिम मानवाने मिठाला यावात्मक महत्त्व दिलेले दिसते.

माझ्या मते अग्नीचा शोध मानवाला ज्याप्रमाणे नैसर्गिक घटनेतून लागला, तसाच मिठाचाही लागला असावा. समुद्राचे किंवा खाऱ्या नदीचे पाणी भरतीच्या वेळी सपाट जमिनीवर येऊन नंतर सूर्याच्या प्रखर किरणांमुळे आटलेले किंवा सुकलेले आणि त्यायोगे मिठाचे कण तयार झालेले आदिम मानवाच्या दृष्टोत्पतीस आले असावे. भरतीच्या वेळी त्या पाण्यात बुडालेल्या जनावरा-श्वापदांचे, पक्ष्यांचे वगैरे देह मिठाच्या ढिगाखाली (मीठ हे नाव नंतर दिले गेले किंवा प्रत्येक प्रांत-प्रदेशानुसार वेगळा संबोधनात्मक शब्द दिला गेला.) कित्येक वर्षे किंवा काळ न कुजता संवर्धित राहिलेला त्याने बघितला. यांतूनच त्या कणामध्ये (मिठामध्ये) कोणती तरी अचाट व गूढ अशी शक्ती आहे, अशी त्यांची धारणा झाली असावी. मग त्याने यातुकर्मात या मिठाचा उपयोग करण्यास सुरवात केली असावी.

मिठामधली ही वस्तू टिकवून ठेवण्याची क्षमता जाणून आदिम काळी

आपल्या प्रियजनांचे देह जपून ठेवण्याकरिता आदिम मानवाने मिठाचा वापर करण्यास सुरवात केली. खास करून टोळी प्रमुखांचे किंवा त्यानंतर राजा-राणीचे देह मिठात घालून किंवा त्यांच्या देहात मीठ भरून त्यांचे जतन करून ठेवण्यात आले, असे संदर्भ सापडतात. काही लोककथांनीही याचा उल्लेख सापडतो किंवा तसे कथानक सापडते. 'शेणातलो कुंवर' या गीतकथेत तसे कथानक आहे. (संदर्भः अनन्य-४, संपा. डॉ. जयंती नायक : प्रकाशक - गोवा कोंकणी अकादेमी, पणजी-गोवा, जानेवारी-जून २०१६)

पुढे मानवी विकासपथावर मिठासंबंधिची मानवी मनातील गूढमय भीती थोडी बाजूला पडून खाद्य पदार्थ; खास करून मांस, फळे, कंद वगैरे मानवाने मिठात घालून भविष्यकाळासाठी, म्हणजे ज्या ऋतूत ते खाद्यपदार्थ उपलब्ध न होण्याची शक्यता आहे, त्या काळासाठी टिकवून ठेवण्यास प्रारंभ केला असावा. यांतूनच पुढे खाद्यपदार्थांत मीठ घातले तर त्याची चव वाढते, शिवाय मिठाच्या सेवनामुळे अंगात एक वेगळी शक्ती येते हे ज्ञात होऊन मानवाने जेवणात मीठ घालण्यास सुरवात केली असावी.

आज जगभरातील लोकांच्या जेवणात मीठ हा महत्त्वाचा घटक असला तरी आदिम काळी त्याचे महत्त्व उष्ण प्रदेशातच ज्ञात असावे आणि येथीलच सांस्कृतिक व्यवहारात त्याला स्थान असावे. येथील लोकच आदिम काळी आपल्या यातुकर्मात मिठाचा वापर करीत असावेत.

मिठासंबंधीची एक प्रथा गोव्यात आदिम वसाहतकारांच्या म्हणजे विशेषतः कुणबी-गावडा लोकांच्या संदर्भात सापडलेली आहे, तिचा येथे मुद्दाम उल्लेख करावासा वाटतो. ही प्रथा अशी : हे लोक एका गावापासून आपला संबंध तोडून जाताना गावाच्या वेशीवर मीठ पेरून, मागे न बघता जायचे. असे मीठ पेरून गावच्या वेशीबाहेर गेल्यावर त्या व्यक्तीला किंवा त्याच्या वंशजाला पुन्हा कधीच त्या गावात यायची म्हणजे गावची सीमा ओलांडून गावात पुनर्प्रवेश करायची मान्यता नसायची. पुढे कालपरत्वे या प्रथेवर एक तोडगा काढण्यात आला; गाव सोडून गेलेल्या माणसास काही कारणास्तव गावात शिरता येई, पण त्या गावात रात्रीसाठी वसतीला राहायची मान्यता नसे. यदाकदाचित तसे घडले तर त्याला किंवा त्याच्या वंशजाला ते मारक मानले जाई. यातून मृत्यूसुद्धा होऊ शकतो, अशी धारणा असे. ज्याच्या घराण्याशी अशा तऱ्हेच्या



**आदिम संस्कृतित मिठागरा संबंधी गूढमयता होती.**

आख्यायिका जुळलेल्या आहेत. त्यांचे वयस्क-जाणते आजही ही समजूत मनात बाळगून असलेले दिसतात आणि नव्या पिढ्यांनाही त्याविषयी सुचित करताना दिसतात.

माझ्या 'आमोणे' गावचा 'जल्मी' (मूळ पुरुष) हा मूळचा जुने नार्वे गावचा. वंशसंघर्षाच्या काळात तो आपला गाव सोडून येथे आला अशी आख्यायिका सापडते. येताना तो नार्वे गावच्या वेशीवर मीठ पेरून आला असेही सांगितले जाते. या जल्म्याचे वंशज असलेले गावचे गावकार (गावडा जमात) आजही नार्वे गावात जायला घाबरतात. 'आम्हाला नार्वे येथे जाऊन रात्रीच्या वसतीला राहायला मान्यता नाही, असे ते सांगतात.

आणखीही काही कुटुंबे मूळ गावात जाऊन आपल्याला रात्रीच्या वसतीला राहायला मान्यता नाही, असे सांगताना सापडलेली आहेत. आमचा स्वतः चा मूळ गाव म्हणजे सांगे तालुक्यातला 'उगे' हा. आमचे पूर्वज कधीकाळी तो गाव सोडून आमोण्यात येऊन स्थायिक झाले होते. दहा वर्षांपूर्वी कालवश झालेले माझे आजोबा कित्येकदा सांगायचे, ''कुठेही जा, पण सांग्यात रात्रीच्या वसतीला राहू नका!''

'मीठ पेरणे' म्हणजे संबंध तोडणे असा वरवर अर्थ असला तरी वेशीवर (सीमेवर) मीठ पेरण्याला एक गूढ अर्थ पण आहे. मिठामध्ये असलेल्या अचाट शक्तीने त्या गावची सगळी वाईट कलमे (शक्ती) सीमेवर थोपवून आपला

जाण्याचा मार्ग मोकळा करावा, अशी त्यामागे धारणा आहे. म्हणूनच परत त्या गावात जायला लोकमानसाने निर्बंध लादलेले आहेत. कदाचीत थोपवून ठेवलेल्या शक्ती परत जागृत होतील, अशी भीती तेथे असते.

मीठ पेरण्याची प्रथा गोव्याबाहेर भारतात इतरत्र असल्याची माहिती मला अजून सापडलेली नाही. फ्रेझर यांनी त्यांच्या 'द गोल्डन बाव'मध्ये कित्येक आदिम प्रथांवर लिहिलेले आहे. परंतु त्या ग्रंथातही मिठाचे संदर्भ सापडत नाहीत.

मिठासंबंधी एक प्रथा किंवा धारणा सर्वत्र आहे, ती म्हणजे ज्याचे मीठ खाल्ले, त्याच्याशी दगाबाजी करणे हा नैतिक गुन्हा होय. मुळात या समजुतीमागे मिठामध्ये असलेल्या गूढ शक्तीला दगाबाजी चालत नाही, अशी धारणा असावी. किंवा मिठामध्ये यातुशक्ती असते या मूळच्या कल्पनेला धरूनच ही समजूत तयार झाली असावी.

दृष्टबाधा काढण्यासाठी जे यातुकर्म केले जाते, त्यात मिठाचा उपयोग सर्रास केला जातो, हेसुद्धा येथे मुद्दाम नमूद करायला हवे. तिन्हीसांजेला घरात मीठ फेकणे वा 'पेरणे' अशुभ मानण्याची समजूत ग्रामीण भागात आहे, हेसुद्धा या संदर्भात लक्षात घ्यायला हवे.



# ४६.
# तुलसी ः मातृदेवीचे मृत्तिका शिल्प

शेती संस्कृतीच्या उदयाबरोबर मातृदेवीचा उदय झाला. या काळी पृथ्वीदेवीची निर्मिती शक्ती बघून मानव भारावलेला होता. असंख्य वनस्पती आणि जीव-जनावरांना जन्म देऊन त्यांचे भरण-पोषण करणारी पृथ्वीदेवी भूमीला त्याने महामाताच मानली. या धारणेतूनच मातृदेवी संकल्पनेचा उदय झाला. भूमाता म्हणजेच मातृदेवी ही धारणा जगभरच्या आदिम संस्कृतींनी, जिथे जिथे शेती संस्कृती नांदली, तिथे तिथे अस्तित्त्वांत होती याच्या खुणा सापडतात.

आदिम मानव भूमातेची निर्मिती शक्ती बघून जसा अचाट पडला होता, तसाच तो स्त्रीची जननशक्ती बघूनही चकित झाला होता. त्याला तिच्या ह्या निर्मितीशक्तीचे एक प्रकारे गुढच वाटले होते. त्याला स्त्रीच्या या निर्मितीशक्तीमध्ये आणि भूमातेच्या निर्मितीशक्तीमध्ये साम्य जाणवले. स्त्री म्हणजेच पृथ्वीतलावरील भूमातेची प्रतिनिधी अशी त्याची धारणा झाली आणि तो त्या भूमातेला स्त्री रुपात पुजू लागला. तसेच स्त्री संबंधित सृजनविधींनी तो भूमातानिर्मित प्रतिकांचा वापरही करू लागला. भूमातेला प्रसन्न करण्याच्या विधी-व्रतांनी त्याने याच श्रद्धेतून स्त्रीला पुढाकार दिला, पौरोहित्याचा अधिकार दिला. किंबहूना हे अधिकार हक्कानेच स्त्रीच्या हाती गेले.

जनन किंवा संतती जन्माला घालणे हे जीवनाचे प्रमुख कार्य आहे, असे मानण्याचा हा मानवी जीवनाचा काळ. या काळात मानवाला जन्मामागचे वैज्ञानिक सत्य पुरते ज्ञात झाले नव्हते. स्त्री नवजीव जन्माला घालते एवढेच

त्याने जाणले होते. हा नवजीव स्त्रीच्या योनी मार्गातून जन्माला येतो हे त्याने पाहिले होते. यातूनच स्त्रीच्या योनीला त्याने निर्मिती केंद्र मानून, तिलाच मातेचे सदृश्य रुप म्हणून पुजण्यास सुरवात केली होती. जगभर आदिम काळी जिथे जिथे शेती संस्कृती नांदली होती, तिथे तिथे मातृदेवीची योनीशिल्पे सापडतात.

भारतांतही अशी योनीशिल्पे सांपडलेली आहेत. महाराष्ट्रातील लोकसंस्कृतीचे गाढे संशोधक रा. चि. ढेरे यांनी आपल्या 'लज्जागौरी' या ग्रंथांत या संबंधी सविस्तर विवेचन केलेले आहे. त्याचबरोबर काही शिल्पांचे फोटोसुद्धा दिलेले आहेत. मानवी संस्कृतीच्या आरंभ काळी उदयाला आलेल्या या परंपरेचा उगम निश्चितच पाषाण युगांत झालेला आहे, असे विधान एकंदर प्रमाणांच्या अवलोकनातून करता येते.

मानवाच्या मानसिक आणि कलात्मक विकासाबरोबर या योनीशिल्पांच्या आकारात विकास होत गेला. स्त्रीच्या सृजनप्रक्रियेशी जसा योनीचा संबंध आहे. त्याचबरोबर स्तनांचासुद्धा संबंध आहे, हे सत्य आदिम मानवाला अवगत झाले आणि त्याने योनी आकाराबरोबर स्तनांनासुद्धा रेखाटण्यास आरंभ केला. अशी योनी-स्तन शिल्पे किंवा मूर्ती सापडलेल्या आहेत. लज्जागौरी ग्रंथात माहुरझरी (महाराष्ट्र), तेर (उस्मानाबाद, महाराष्ट्र), भीटा (उत्तर प्रदेश) झूंसी (उत्तर प्रदेश, बुंदेलखंड (विंध्यप्रदेश) येथे सापडलेल्या अशा योनी-स्तन मूर्तींची छायाचित्रे आहेत.

पुढे मानवी प्रगतीच्या पुढच्या पथावर स्त्री देहाशिवाय या शिल्पांना पूर्णत्व नाही, ही भावना मानवी मानसांत रुजली आणि योनी-स्तन रेखीत स्त्री देह (नग्न) शिल्पाची निर्मिती झाली. मात्र सुरवातीच्या काळी या स्त्री देहाला शीर्ष नव्हते. अशी शीर्षविरहीत शिल्पेसुद्धा सांपडलेली आहेत. खास लज्जागौरी पुस्तकांत याचे नमूने आहेत. गोव्यात कुर्डी येथे सांपडलेल्या लज्जागौरीचे शीर्ष सुस्पष्ट नाही, याचा येथे मुद्दाम उल्लेख करावा लागेल.

या नंतरची शिल्पासंबंधीत प्रगती म्हणजे या शिल्पांना कमल शीर्ष लावले गेले आणि त्या पुढच्या काळात स्त्रीशीर्ष रेखाटण्यास किंवा कोरण्यास सुरवात झाली. योनी शिल्पांचा हा प्रवास अधोरेखित करणारे पुरावे सापडतात.

हजारो वर्षा आधी योनी शिल्परुपाने सुरू झालेली ही मातृदेवी पूजनाची परंपरा आज अष्टभुजादेवी, स्त्रीरुपाधारिणी, वस्त्र-अलंकारकृत, शस्त्रांकृत,

सुशोभित देवी रुपांत पोहोचलेली आहेत. आज मातृदेवीला दुर्गा, काली, सांतेरी, शांतादुर्गा, भगवती, भूमिका, वैष्णवी, ब्राह्मणी, म्हमारी, केळबाई, कालिका अशी कित्येक नावे प्राप्त झालेली आहेत. तिच्या पूजा-अर्चेत अनार्य परंपरेबरोबर वैदिक आचारही समाविष्ट झालेले आहेत.



स्तनरेखांकित मृतिका तुलसी वृंदावने गोव्यातील ग्रामीण भागात सापडतात. (काजुर-केपे, १९९६)

पाषाण युगांत उदयाला आलेल्या पाषाणी योनीशिल्पांचे उन्नयन होताना किंबहुना त्या आधीही असेल, मातृदेवीच्या योनीरुप मृतिका शिल्पांचाही उदय झालेला आहे. कदाचित ज्या प्रदेशांत पाषाण जास्त नाही, जो प्रदेश मातीचे डोंगर आणि वनराझीने भरलेला आहे, अशा प्रदेशांत ही शिल्पे तयार झाली असावीत. (भीटा येथील योनी-स्तन मूर्तींचा वर जो उल्लेख केलेला आहे ती मृतिका शिल्प आहे.)

माझ्या मते गोवा, महाराष्ट्र येथे प्रामुख्याने लोकांच्या अंगणात असलेली, आणि जी आज हिंदू संस्कृतीचे एक महत्त्वपूर्ण प्रतीक बनलेली, जिला मातृदेवी म्हणून येथील लोकमानसांत स्थान आहे, त्या तुलसीचे मूळचे रुपही योनी रुपच आहे. सर्रासपणे चाळीस-पन्नास वर्षां आधी गोव्यांत लोकांच्या अंगणांत स्थापन असलेल्या आणि आजही काहीं भागांत बघायला मिळणाऱ्या तुलसी बघितल्या म्हणजे या विधानाची प्रचिती येते.

नुसता मातीचा खांब किंवा बैठक आणि त्याच्यावर चौबाजूंनी चार गोळे लावून, मध्ये केलेली 'खोली', असे तुलसीचे मूळ रूप. ग्रामीण भागात या खोलीला किंवा खोलगट जागेला 'पिरनोळी' (पिंडोळी, पिंडी) म्हणतात. पिरनोळी किंवा पिंडी या नांवावरूनच त्याचा अर्थ स्पष्ट होतो. 'पिंडी' म्हणजे जिथे पिंड (गर्भ) रुजतो ती जागा, उदर, गर्भाशय. तिच्या खाली लावलेले

चार गोळे हे स्तनरुप असून, खरे ते दोनच परंतु चारही बाजूने तिचे रुप दर्शनीत व्हावे या हेतूने ते चार लावलेले आहेत. हे गोळे मूळचे गोलाकार होते. पुढे लोकमानसाच्या कलात्मक विकासाबरोबर जसा तुलसीच्या आकृतींत फरक पडत गेला, तसा त्यांच्या रेखाटण्यामागचा उद्देशही बाजूला पडून त्यांच्या आकृतीतही फरक पडला आणि त्यांना खूर म्हणजे पाय असे सुद्धा उच्चारणांत आले. यातूनच काही गावांनी तुलसीच्या मृतिका मूर्तीवर वेगळे स्तन कोरण्याची सुद्धा परंपरा निर्माण झाली.

माझ्या शोधयात्रेत मला काजूर केपें-येथे श्री. म्हाळगो वेळीप यांच्या अंगणात सुमारे वीस वर्षां आधी अशी तुलसी सांपडली. या संबंधी त्यांनी दिलेले स्पष्टीकरण असे : तुलसी ही देवी, परंतु ती एक स्त्री. स्त्रीला जी जी अंगे (अवयव) असतात, ती तिलाही असतात, म्हणून ही स्तने आकारलेली आहेत.

तुलसीचे रुप तिच्या पिंडीत तुलसीचे रोप (झाड) असल्याशिवाय पूर्णत्त्वाला येत नाही, असा समज लोकमानसांत आहे. या मागेसुद्धा अर्थ लपलेला आहे. झाड हे मातृदेवीच्या सृजनाचे दर्श रुप. झाड समाविष्ट प्रसव अवस्थेतील मातृदेवीच्या योनीमूर्ती असल्याचे संदर्भ सांपडतात.

निसर्गपूजक अनार्य समाजाच्या श्रद्धेतून उदयाला आलेल्या या मृर्तिकारुप योनी पूजन परंपरेवर जेव्हा वैदीक परंपरेचा प्रभाव झाला, तेव्हा त्याला कित्येक मिथके आणि पुराणकथा येऊन चिकटल्या आणि तुलसीचे सद्यरुप तयार झाले. त्या मृतिका शिल्पाला 'तुलसी' हे नांव सुद्धा याच दरम्यान प्राप्त झाले असावे.



४७.

# दृष्टबाधा : दुष्टशक्तीच्या बाधेचा असर

अदृश्य शक्ती दुष्ट आणि सुष्ट अशा दोन्हीही प्रकारच्या असतात. त्यांच्या कक्षेत आलेल्या माणसावर त्या साधक आणि बाधक असे दोन्हीही तऱ्हेचे परिणाम करतात, अशी दृढ समजूत किंवा विश्वास आदिम माणसात होता. सुष्ट शक्तींना त्याने देवत्त्वाचा दर्जा देऊन जशी वेगवेगळी नावे दिली तसेच दुष्ट श्क्तींनाही त्याने भूत, पिशाच्च, प्रेतात्मा वगैरे ठरवून त्याप्रमाणे त्यांना नावे दिली. काही शक्तींना त्याने नावे दिली नाहीत, परंतु त्यांची कार्ये मात्र निश्चित केली. कोकणी समाजात अशा दुष्ट शक्तींना सर्वसामान्यपणाने 'कलमे' असे संबोधले जाते.

काही व्यक्तींच्या अंगात अशा दुष्ट शक्ती वास करतात. अशा व्यक्तींशी एखाद्या माणसाचा, जनावराचा, झाडाचा, वस्तूचा वगैरे संपर्क आल्यास ती शक्ती त्याच्यावर आपला प्रभाव पाडते, ज्यामुळें त्यांचे नुकसान होऊ शकते. सजीव वस्तू एखाद्या वेळी मरण पावू शकतात तर निर्जीव वस्तू पूर्णपणे नष्ट होऊ पावतात, अशी समजूत आदिम समाजात होती. कालपरत्वे लोकमानसाच्या प्रगती बरोबरच या समजुतीला अंधश्रद्धा असेही मानले जावू लागले, तरीसुद्धा आजही ही समजूत समाजातून पूर्णपणे तडीपार झालेली नाही.

ज्या व्यक्तींच्या अंगात दुष्टशक्ती वास करते अशामधील काहींचे डोळे जास्त प्रभावी असतात. किंबहुना त्याच्या अंगात वास करणारी शक्ती, त्याच्या डोळ्यांच्या माध्यमातूनच प्रभाव टाकते, अशी समजूत आहे. या प्रकाराला दृष्ट लागणे किंवा दृष्टबाधा होणे असे म्हणतात. ही दृष्टबाधा नेहमीच होते असे

नाही, ज्या क्षणी संबंधीताच्या अंगातील शक्ती कार्यप्रवण होते, त्यावेळीच ती होते अशी सुद्धा समजूत आहे. ही कार्यप्रवणता, त्या शक्तीला एखादी वस्तू वा गोष्ट आवडते, एखादा माणूस आवडतो, एखादी स्त्री, बाळ नजरेत भरते... त्या वेळीच होते, अशी सुद्धा समजूत आहे.

दृष्टबाधा जिला कोकणी भाषेत 'दिश्ट' आणि इंग्रजीमध्ये 'Evil Eye' असे म्हणतात, ती संकल्पना जगभर सापडते. ही दृष्टबाधा कशामुळे होते यासंबंधी वेगवेगळ्या समजूती रुढ आहेत. इबेस्तन या विद्वानाने या संबंधी बहुतेक भागात रुढ असलेली लहान बाळाच्या दृष्टबाधेची संकल्पना विषद करताना सांगितले आहे की, बाळाच्या जन्माबरोबरच एक अदृश्य अशी शक्तीही जन्माला येते ही शक्ती बाधक असते. ती बाळावर अधून मधून परिणाम करीत राहते. ही समजूत कित्येक समाजांमध्ये आहे. या समजुतीवर प्रकाश टाकतानाच त्यांनी पंजाबातील एका रुढीचे उदाहरण दिलेले आहे. त्या उदाहरणाप्रमाणे पंजाबात स्त्रिया मुलाचा जन्म होताच एक स्तन चाळीस दिवस घट्ट बांधून ठेवतात. अशा रीतीने स्तन बांधून ठेवल्याने बालकाबरोबर ज्या शक्तीचा जन्म झालेला असतो, तिचे पोषण होत नाही आणि ती मरून जाते, अशी समजूत त्यामागे आहे. आयलँडमध्येसुद्धा अशाच प्रकारची कल्पना रुढ असल्याची माहिती सापडते. तेथील लोकांच्या मते ही शक्ती निसर्गतः जन्माबरोबरच येते. अनुकूल परिस्थितीत ती कार्यप्रवण होते व परिणाम दाखवते. जेव्हा ती प्रभावी असते त्यावेळी तिच्या कक्षेत येणाऱ्या सर्वांवर ती प्रतिकूल परिणाम करते. (लोकसाहित्याचे अंतः प्रवाह-पृ. १३८)

व्यक्तीमध्ये असलेल्या पिशाच्चरुपी शक्तीमुळे दृष्टबाधा होते अशी समजूत महाराष्ट्रात असल्याची माहिती सापडते. चेटकिणी किंवा चेटके यांच्या अंगात अशी शक्ती वास करते आणि त्या कारणाने त्यांची दृष्टी बाधक असते, अशीही समजूत आहे (लोकसाहित्याचे अंतःप्रवाह - पृ. १३८). या समजुतीचा प्रभाव काही प्रमाणात आजही समाजमनावर आहे. आजही एखाद्या बाई किंवा पुरुषाची दृष्टबाधा होते, असा समज गावात रुढ झाल्यास त्यांना इतर लोक वचकून राहतात. त्यांच्याशी भांडण-तंटा करण्याच्या फंदात पडत नाहीत. गरोदर असताना स्त्रीची एखादी इच्छा अपूर्ण राहिली तर तिच्या जन्माला येणाऱ्या मुलाबरोबरच बाधक शक्तीही जन्माला येते अशी समजूत आदिम

समाजात होती, याचेसुद्धा संदर्भ सापडतात. आजही गरोदर स्त्रीच्या इच्छापूर्ण करण्याचा प्रयत्न केला जातो. तिच्या इच्छा अपूर्ण राहिल्या तर तिच्या बाळावर परिणाम होतो, अशीही समजूत रुढ आहे. मात्र नेमके बाळाला काय होते, यासंबंधी ठोसपणे सांगितले जात नाही.



**दुष्टबाधा टाळण्यासाठी बाळाच्या कपाळाला काजळाची 'तीट' (टिळा) लावली जाते.**

कालौघात समाज मनाला त्याचा विसर पडला असावा, असेच दिसते. वरील समजुतीशी जवळीक सांगणारी एक समजूत मात्र अजूनही समाजात रुढ असलेली दिसते. ती म्हणजे, गरोदर स्त्रीच्या खाण्याविषयीची एखादी इच्छा अपूर्ण राहिली तर तिला होणारे बाळ तोंडातून लाळ टपकत राहते.

दृष्टबाधेचा आणि जेवणाचा संबंध आदिम कालापासून जोडलेला दिसतो. दृष्टबाधेची शक्ती अंगात असलेल्या माणसाची दृष्टी अन्नावर पडली, तर ते जेवण खराब होते, अशी समजूत आहे. खास करून रोजचे जेवण सोडून काही खास पदार्थ असल्यास किंवा घरात भरपूर जेवण बनवलेले असल्यास किंवा घरात अन्नधान्य भरघोस ठेवलेले असल्यास असे परिणाम होतात. कधी कधी जेवण प्रत्यक्ष खराब होत नाही, परंतु घरात अशी काही परिस्थिती निर्माण होते की, ते जेवण न जेवताच बाहेर फेकावे लागते अथवा फेकले जाते, नाही तर त्याचा नाश होतो, असे मानतात.

या समजुतीमुळेच कित्येक आदिम जमातींत जेवणाच्या वेळी बाहेरील व्यक्तींच्या प्रवेशाला बंदी घातलेली असल्याची माहिती सापडते. उदाहरणार्थ- सुमात्रातील एका जमातीमध्ये घरात जेवणे चालू असताना, घराची सर्व दारे-खिडक्या बंद करण्यात येतात. अबिसिनियातील एका जमातीमध्ये जेवणाच्या वेळी घरात कोणी येऊ नये म्हणून एक मशाल जळत ठेवतात. चुकून एखाद्या शक्तीचा (माणसाबरोबर येणाऱ्या शक्तीचा) प्रवेश झालाच तर तिने माघारी जावे किंवा ती होरपळून मरून जावी, असा त्यामागे उद्देश असतो. फिजी लोक खाताना कोणालाच आपल्यासमोर बसू देत नाहीत किंवा ताटांत उष्टे

टाकत नाहीत. (लोकसाहित्याचे अंतःप्रवाह; पृ. १३८).

जेवणाआधी हात-पाय धुण्याच्या प्रथेमागेसुद्धा दुष्ट शक्तीपासून जेवणाचे आणि जेवत असलेल्याचे रक्षण करावे हीच आदिम धारणा होती. वाईट शक्ती जास्त करून चौरस्त्यावर असतात. तिथून येणाऱ्या-जाणाऱ्यांच्या नकळत त्या त्यांच्या अंगात शिरतात. पाय धुण्याने त्या शक्ती त्या पाण्याबरोबर निघून जातात, नपेक्षा त्या त्यांच्या अंगातच राहून, दृष्टीस पडलेल्या जेवणावर त्या प्रभाव टाकतात आणि ते जेवण नासवतात. ते पछाडलेले जेवण जेवल्यास, जेवणाऱ्यावरसुद्धा परिणाम होतो आणि तो आजारी पडतो, अशी त्या मागची धारणा आहे. या धारणेशी साम्य सांगणारी धारणा म्हणजे, घरात आत शिरण्याआधी हात-पाय धुवून, चूळ भरणे. तसे केल्याने अंगावर चढलेल्या वाईट शक्ती बाहेरच्या बाहेरच राहतात आणि घरात बनवलेल्या जेवणावर किंवा अन्य वस्तूंवर त्या परिणाम करू शकत नाहीत.

आजही बाहेरून घरात शिरल्यावर किंवा जेवण्यास बसण्या आधी हात-पाय धुवून चूळ भरण्याची पद्धत आहे. नवी पिढी कदाचित या पद्धतीला थोडी चाल-ढकल करताना दिसत असली तरी जुनी पिढी मात्र या प्रथेचा आदर करते. कालप्रवाहात या प्रथेमागची मूळ धारणा बाजूला पडलेली आहे आणि शरीराची स्वच्छता हे नवे प्रयोजन त्याला जुळलेले आहे.

बाधा झालेले जेवण जेवल्यास, 'पायरव' (रेंच) सारखा आजार होतो, अशीही समजूत लोकमानसात आहे. पायरव लहान मुलांना लवकर होतो, तोही दुधाचा, या समजुतीमुळेच लहान मुलांना कधी उघड्यावर पाजत नाहीत.

अंगावर दूध पीत असलेल्या बाळाला कधी घराबाहेर पाजण्याची गरज भासली तर पारंपरिक विचारसरणीची आई त्याचे तोंड पूर्णपणे आपल्या पदरा खाली झाकते. बोळ्याने पाजत असल्यास तो बोळा कपड्यात किंवा चामड्याच्या पिशवीत गुंडाळून घेते. लहान मुलाने बाटलीत सांडलेले दूध उकिरड्यावर टाकल्यास बाळ आजारी पडते, या रुढ असलेल्या समजुती मागे सुद्धा हेच कारण आहे.

वाईट शक्तींच्या या प्रभावापासून रक्षण करण्याची विविध यंत्र-तंत्रे किंवा तोडगे आदिम काळापासून मानवाने तयार केलेले आहेत. ज्यातील काही आजही अस्तित्त्वात असलेले दिसतात. यातूनच हजारो वर्षांआधी मानवी मनावर

अदृश्य शक्तींचा केवढा सखोल परिणाम झाला होता, याची कल्पना करता येते. तोडगे दोन तऱ्हेचे केलेले दिसतात, एक दृष्टबाधा होऊ नये म्हणून - प्रतिबंधक आणि दुसरे झाल्यावरचा उतारा. प्रतिबंधक प्रकारात सुंदर वस्तू विद्रूप करणे, बाळाला गालबोट किंवा काळा टिळा लावणे, नवरदेवाच्या गालाला काजळाचे अथवा हळदीचे बोट लावणे, इमारतींवर विद्रूप चित्रे काढणे, नव्या वाहनाला किंवा घराला काळ्या कपड्याच्या बाहुल्या बांधणे, लिंबू-हिरव्या मिरच्या बांधणे, लोखंडाचा खिळा ठेवणे इत्यादींचा समावेश होतो.

उतारामध्ये; मिठ-मिरच्या ओवाळणे, भात ओवाळून चाररस्त्यावर टाकणे, नारळ-लिंबू उतरून टाकणे, कोंबडा बळी देणे, ज्या माणसाची दृष्टबाधा झाली असा संशय आहे त्याच्या कपड्याचा तुकडा कापून आणून तो जाळून बाधा झालेल्या माणसाच्या कपाळाला त्याची राख लावणे, इत्यादींचा समावेश केला जातो. ओवाळण्याचे काम घरातील किंवा कुटुंबातील वयोवृद्ध बाई अथवा पुरुष, गावचा मुखत्यार, महार किंवा मांग समाजातील माणूस अशा खास व्यक्तींकडून केलेले दिसते.

पायरव उतरण्यासाठी बाधा झालेल्या माणसाच्या तोंडासमोर जळत्या निखाऱ्याचे भांडे तीनदा नेतात आणि त्याला दर वेळी दीर्घश्वास सोडायला लावतात. नंतर ते भांडे त्याच्या उष्ट्या ताटांत उपडे करतात. ते भांडे तिथे चिकटून राहिल्यास, त्याला झालेली बाधा निघून गेली, अशी समजूत होते.



## ४८.

# लोखंडात यात्विक शक्ती वसते : आदिमांची धारणा

लोह किंवा लोखंड या धातूच्या शोधाने मानवी जीवनात मोठी क्रांती झाली असे म्हटल्यास ते वावगे ठरणार नाही. या शोधाने खऱ्या अर्थाने मानवी जीवनाच्या प्रगतीला सुरवात झाली. मात्र या धातूसंबंधी तऱ्हेकवार धारणा आणि समजूती मानवाच्या मनात रुजल्या गेल्या, ज्यातील कित्येक आजही प्रचलित असलेल्या दिसतात. आदिवासी समाजात त्या रुढ आहेतच, परंतु शिक्षित आणि सुधारलेल्या समाजातही त्या आहेत. काही धारणा तर अशा आहेत की त्यामागच्या मूळ उद्देशाविषयी तो समाज अनभिज्ञ असून नुसता परंपरेचा भाग म्हणून त्यांचे श्रद्धेने पालन करीत आहेत.

पाषाण युगानंतर धातूचे युग सुरू झाले; परंतु लोह हा पहिला धातू नव्हता. पहिला धातू होता तांबे. या तांब्याच्या युगानंतर किंवा ताम्रयुगानंतर कांस्ययुग आले आणि त्यानंतरच लोहयुगाला सुरवात झाली. तांबे आणि कांस्य या दोन्हीही धातूंचा वापर मानवाने आपले जीवन सुधारण्यासाठी निश्चितच केला. मात्र त्याच्यासंबंधी भीतीयुक्त धारणा किंवा निर्बंध असलेली माहिती सांपडत नाही. या उलट लोहाच्या वापरावर आदिम समाजात असलेल्या कित्येक निर्बंधांची आणि भीतीयुक्त धारणांची माहिती सापडते. लोहाचा वापर यातुकर्मातही आदिमांनी केला.

जगात सगळीकडे एकाच वेळी लोहाचा वापर करण्यास सुरवात झाली असे नाही, तर वेगवेगळ्या भागांत, वेगवेगळ्या काळी लोहाचा वापर सुरू झाला. भारतात तो कधी झाला यासंबंधीही वेगवेगळी मते आहेत. एन.आर.



**पिशाच्च किंवा प्रेतात्मे लोखंडाला घाबरतात अशी आदिमांची धारणा.**

बॅनर्जी या विद्वानाच्या मताप्रमाणे तो आर्य काळात झाला. आर्य लोकांना भारतात येण्यापूर्वीच लोखंडाचा उपयोग माहीत झाला होता. त्यांच्याजवळ लोखंडाची शस्त्रे होती. तसेच त्यांच्या रथांना लोखंडाच्या धावा लावलेल्या होत्या. त्यांच्या भारतातील आगमनानंतरच तसा उपयोग स्थानिक अनार्यांनी करण्यास सुरवात केली.

अ. ज. करंदीकर यांच्या मताप्रमाणे वैदिक आर्यांच्या आगमनापूर्वीच भारतातील आदिवासी लोकांना लोह या धातूचा तसेच पोलादाचा उपयोग माहीत होता आणि त्यांच्याकडूनच तो आर्यांना माहीत झाला.

काहीही असो; परंतु आदिम काळी लोहाचा वापर एक यातुवस्तू म्हणून होत होता, हे सत्य आहे, ज्या धारणेचा प्रभाव आजही समाजमनावर आहे. माझ्या मते लोखंडाचा वापर शेती संस्कृतीच्या उदयानंतर झाला. शेती संस्कृतीच्या इतिहासाचा शोध घेतला तर सुरवातीला खननयष्टीने म्हणजे लाकडी टोकदार काठीने खणून शेती केली जायची. लोखंडाच्या शोधाबरोबर या लाकडी काठीची जागा लोखंडी काठीने घेतली. ज्याचे रुप पुढे नांगरात परिवर्तित झाले. सुरवातीला या नव्या शोधाला आदिम मानवाने सहज स्वीकारलेले दिसत नाही. 'द गोल्डन बाव' या ग्रंथात फ्रेझरनी या संदर्भात विवेचन केलेले आहे. उदाहरणार्थ- पोलंडमध्ये हातनांगराने (लोखंडी) शेत नांगरल्यास चांगले पीक येत नाही, काहीतरी होऊन पिकाची नासाडी होते, अशी धारणा होती. जावा

बेटावरील बडुवी जमातीचे लोक ज्यांचे शेती हेच उपजीविकेचे प्रमुख साधन आहे, ते शेतासाठी कोणतेही लोखंडी अवजार वापरणे अशुभ मानतात. तसे केल्याने पीक चांगले येत नाही, अशी त्यांची समजूत आहे.

लोह किंवा लोखंडाविषयीच्या आदिम काळात जन्माला आलेल्या आणि अजूनही काही प्रमाणात अस्तित्त्वात असलेल्या दोन प्रकारच्या धारणा समाजात दिसतात, त्या अशा : एक – लोखंडाच्या वापराने नुकसान होते किंवा करता येते, तर दुसरी–लोखंडाच्या वापराने किंवा संपर्काने वाईट शक्तींना पळवून लावता येते.

यातूवस्तू म्हणून लोहाचा उपयोग करण्यामागे मला स्वतःला एक महत्त्वाचे कारण दिसते, ते म्हणजे लोखंडाचा लालसर रंग. शिवाय आदिम काळी ते दुर्मिळही होते. लाल रंगाला आदिमांनी नेहमीच मातृदेवीचे रजरुप मानलेले आहे. लाल रंगात यात्विक शक्ती असते ही आदिम धारणा सर्वत्र आहे. या धारणेला अनुसरून आदिम मानवाने लोहाला यात्विक कृत्यांत समाविष्ट केले असावे.

शुद्ध लोह हे फार टणक असत नाही. त्यामुळे त्याचा शस्त्र बनवण्यासाठी उपयोग करता येत नाही. लोहात ज्या वेळी कर्ब मिसळते, त्यावेळी ते पोलाद बनते. हे पोलाद खूप कठीण असते आणि शस्त्रे बनवण्यासाठी उपयुक्त असते, हे ज्या वेळी प्राचिन मानवाने हेरले, त्या वेळी त्याने शुद्ध लोहाचा उपयोग फक्त यातुवस्तू म्हणूनच केला.

पुढे मानवी विकासाच्या प्रगतीपथावर लोखंडाचा सर्रास उपयोग सुरू झाला आणि त्याचे महत्त्व यातुकर्माची वस्तू एवढेच न राहता यंत्रे आणि इतर साधने बनवण्याचा धातू म्हणून त्याला महत्त्व प्राप्त झाले. व उद्योगधंद्याच्या क्षेत्रात त्याला अतिशय मोठी मागणी येऊ लागली. लोखंडाचा इ.स.पू. चौथ्या शतकापर्यंत सर्व भारतात शस्त्रे व उपकरणे बनवण्यासाठी उपयोग झाला, असे प्रख्यात पुरातत्त्वशास्त्री ह. द. सांकलिया यांचे मत आहे.

सर्वसामान्यपणे लोहात एक अदृश्य शक्ती वास करते आणि ती शक्ती सुष्ट असून संरक्षक आहे, अशी समजूत लोकमानसात आहे. या समजुतीला धरून जगभरातील कित्येक समाजात प्रचलित असलेल्या प्रथांची माहिती 'द गोल्डन बाव' या ग्रंथात सापडते. उदाहरणार्थ, मोरोक्कोमध्ये आजारी

माणसाच्या उशीखाली लोखंडी चाकू किंवा खंजीर ठेवतात. त्यामुळे पिशाच्च किंवा प्रेतात्मापासून त्याचे रक्षण होते, अशी त्यांच्यामध्ये समजूत आहे. सिंधाली शेतकरी टोकरीमधून चांगले खाद्यपदार्थ किंवा केक वा फळे एका जागेवरून दुसरीकडे घेऊन जाताना एखादा खिळा किंवा चाकू त्या टोकरीत ठेवल्याशिवाय कधीच जात नाहीत.

दक्षिण भारतातील मारवार नावाच्या जमातीमध्ये बाळंतीणीच्या अंथरुणात खिळा किंवा लोखंडी चाकू ठेवतात, त्यामुळे दुष्ट शक्तीपासून बाळ-बाळंतीणीचे रक्षण होते, अशी त्यांची श्रद्धा आहे. सालसेत बेटावरचे लोक एखादी बाई बाळंतपणात मेली तर तिचे प्रेत नेताना तिच्या कपड्यांच्या निरीमध्ये चाकू ठेवतात. खास करून तिचे मूल जिवंत असेल तर. यामागचा उद्देश तिने मुलाला न्यायला परत आल्यास, लोखंडातील शक्तीने तिला त्यापासून परावर्तीत करावे. स्कॉटलंडमध्ये गावात किंवा घरात मयत झाल्यास घरातील सगळ्या खाद्यजिन्नसांच्या भांड्यांत एखादा खिळा किंवा लोखंडी सरी ठेवतात. तसे केले नाहीतर त्या माणसाचा आत्मा येऊन ते सगळे जिन्नस नासवून टाकतो, अशी समजूत आहे.

भारतात काही जमातींमध्ये मृतदेहाला अग्नी देणारा माणूस आपल्याजवळ एक खिळा घेऊन जातो तसेच सुतकाच्या काळात तो खिळा घेऊनच फिरतो, अशी माहिती सापडते.

भारतात कित्येक जाती-जमातींत, लग्नात नवरदेवाच्या हातात सुरी किंवा चाकू देण्याची, तसेच बाळंतीणीच्या अंथरुणात खिळा ठेवण्याची प्रथा आहे. काही समाजामध्ये घराच्या दारावर नाणे, खिळे किंवा घोड्याचे नाल ठोकण्याचीही प्रथा आहे.

गोव्यात याच विषयासंबंधीत एक विलक्षण प्रथा सापडते. ती म्हणजे, एखादी स्त्री बाळंत होताना मेली किंवा ती मरून लोकांना त्रास देते असा समज असल्यास जुने नार्वे येथील मसणदेवीकडे येऊन तिच्या झाडाला खिळा ठोकतात, असे केल्याने ती आपल्या जागी खिळून राहते आणि तिला लोकांना पिडापीड करता येत नाही, असे मानतात.



४९.

# गोंदणे :
# एक रक्षण स्वरुपी यातुकर्म

आदिम माणसाचे सारे जीवनच एका गूढमय भीतीने व्यापलेले होते. या जगात एक अचाट अशी अदृश्य शक्ती वास करते जिच्या मर्जीवर आपले जीवन अवलंबून आहे, अशी त्याची दृढ समजूत होती. यातूनच या शक्तीच्या वशीकरणासाठी त्याने यातुविद्येची निर्मिती केली. या अदृश्य शक्तीच्या तसेच तिच्या वशीकरणासाठी केलेल्या यातुविद्येच्या प्रभावाचा असर लोकमानसावर या काळी एवढा प्रखर होता की मानवाने आपल्या शरीरावरही या यातू तंत्राचा प्रयोग करण्यास सुरवात केली. कालप्रवाहात या तंत्रामागचा मूळ उद्देश बाजूला पडला आणि त्याला कलात्मक आणि सौंदर्यखुलवण्याचे प्रयोजन जुळले गेले.

एक यातुतंत्र म्हणून मुळात उगम झालेला आणि नंतर कालप्रवाहात कलेचे स्वरुप प्राप्त झालेला एक महत्त्वाचा प्रकार म्हणजे 'गोंदणे'. आदिम समाजात हे तंत्र खूपच लोकप्रिय होते. किंबहुना सर्वच आदिम जमाती या तंत्राचा उपयोग करायच्या. शिक्षण आणि सुधारणेच्या प्रभावाला धरून या प्रकारचे महत्त्व उणावत गेले. मात्र ते पूर्णपणे नाहीसे मात्र झालेले नाही, उलट आज रॉक संस्कृतीत वावरणारी नवी तरुण पिढी या प्रकाराकडे आकर्षित झालेली आहे आणि अंगावर तऱ्हेकवार चित्रे-नावे-चिन्हे गोंदून घेताना दिसते आहे. यातुतंत्र अथवा कला या दृष्टीने आज उपलब्ध आदिवासी समाजात ही परंपरा सर्रासपणे दिसते.

गोंदणे म्हणजे सुईने खास द्रव शरीरात टोचून आपल्याला अभिप्रेत असलेल्या आकृत्या किंवा चिन्हे काढणे. हे द्रव सुकल्यानंतर, म्हणजे ती

जखम भरल्यानंतर काळ्या-निळ्या रंगातील ती चिन्हे किंवा आकृत्या अंगावर कायमच्या कोरल्या जातात (राहतात.)

गोंदण्यासाठी काही लोक स्त्रीचे दूध घेतात आणि ते गोड्या तेलापासून बनवलेल्या कोरड्या काजळात मिसळतात, नंतर ते मिश्रण घेऊन सुईने टोचतात.

काही लोक गोड्या तेलाऐवजी स्त्रीचे दूध वापरतात. गोंदण्याची क्रिया पूर्ण झाल्यावर त्या जागी हळद किंवा एरंडेल लावतात. आमच्या गावात माझ्या लहानपणी स्त्रिया गोंदताना मी बघितलेले आहे. गोंदण्यासाठी त्या खोबरेल तेलापासून बनवलेले ताजे काजळ वापरायच्या.



**गोंदण्याचा प्रकार स्त्रीशी जास्त संबंधित दिसतो.**

चंद्र, सूर्य, मोर, मासा, पक्षी, त्रिकोण, फूल, टिंबे, आडव्या किंवा उभ्या रेषा इत्यादी चिन्हे पारंपारिकपणे गोंदलेली दिसतात. यातील चित्रांची शैली आदिवासी चित्रकलेशी नाते सांगते. किंबहुना आदिवासी चित्रकलेचा उगम या गोंदण्यातूनच झाला असावा. आदिवासी समाजात प्रामुख्याने कपाळावर, हातावर, दंडावर, गळ्यावर गोंदलेले दिसते. परंपरेची बांधिलकी मानणाऱ्या लोकसमाजातील संस्कृतीचे उपासक, गोंदायचे असल्यास विशिष्ट असे एखादे चिन्ह आपल्या हातावर गोंदून घेतात, तर या समाजातील स्त्रिया आपल्या कपाळावर (निंदलावर) एखादा टिंब किंवा चंद्राकृती गोंदून घेतात.

गोंदण्याच्या परंपरेच्या उगम होण्यामागच्या प्रयोजनासंबंधी वेगवेगळी मते सापडतात. निरनिराळ्या वन्य जमातींत भूताखेतांपासून स्वतःचे रक्षण व्हावे म्हणून कपाळावर, हातावर अथवा अन्य अवयवांवर सांकेतिक चिन्हे काढण्याचा प्रघात सुरू झाला. यातूनच गोंदण्याची परंपरा सुरू झाली असावी

असे मत काही विद्वानांचे आहे. गोंदण्यासंबंधी एक प्रचलित कथा भारतीय संस्कृती कोशात सापडते (खंड-३, पृ. ११६), ती अशी : विष्णू (देव) म्हणे वरचेवर लक्ष्मीला घरी ठेवून आपल्या कामासाठी बाहेर जायचा. एकदा लक्ष्मी त्यांना म्हणाली, तुम्ही मला घरी ठेवून वरचेवर बाहेर जाता, मला घरी एकटी राहायला भीती वाटते. तेव्हा विष्णूने आपली आयुध्ये लक्ष्मीच्या हातावर दांबली, त्याची चिन्हे तिथे उमटवून तो म्हणाला, ही चिन्हे या पुढे तुझे भयापासून रक्षण करतील.

काही मानववंशशास्त्र्यांच्या मते, जंगली लोकांत लग्न, देवपूजा अथवा इतर समारंभ याप्रसंगी रक्ताभिषेक करण्याचा जो विधी होता, त्या विधीचेच गोंदणे हे अवशेष रुप. तर फ्रेझर या मानववंशशास्त्र्यांच्या मताप्रमाणे आदिवासी जमातींत स्त्रियांना मारहाण करून त्यांची सहनशक्ती बघण्याची प्रथा होती, त्या प्रथेचेच गोंदणे हे रुप आहे. गोंदण्याच्या प्रसंगी होणाऱ्या जखमेतून रक्त येते, त्या प्रकारातून रक्ताभिषेक घालण्याचा उद्देश फलरुप होतो.

माझ्या स्वतःच्या मते, गोंदण्याची प्रथा मूळ कुलचिन्ह परंपरेशी संबंधीत आहे. आपले कुलचिन्ह असलेले चिन्ह आपल्या शरीरावर कोरून (गोंदून) आपल्या कुळाची ओळख घडवणे, त्याचबरोबर कुलचिन्हाचा आदर करणे ही मूळ भावना त्या मागे होती, पुढे आपले कुलचिन्ह सर्व दुष्ट शक्तींपासून आपले रक्षण करते या धारणेतून त्याचे दृश्य आवाहन करण्याच्या हेतूने ते शरीरावर कोरण्यात आले. सुरवातीला कुलप्रमुख किंवा कुलदैवताचे पौरोहित्य करणारी व्यक्तीच ते अंगावर धारण करीत असावी, पुढे टोळीतील इतर सदस्यही ते अंगावर धारण करू लागले असावेत. या काळी बहुतेकपणे टोळीच्या प्रमुखालाच पुरोहितपणाचा अधिकार होता, ही गोष्ट इथे लक्षात घ्यावी लागेल.

गोंदण्याची परंपरा शेती अवस्थेत पोचल्यावर परंतु धातूचा शोध लागल्यानंतर ज्यास्त विकसीत झालेली आहे. या काळात आदिम धारणांना पुढे नेता नेता मानवाच्या अंगातील कलाविष्कार नकळतपणे अभिव्यक्त झाला आणि त्यांतूनच गोंदण्यासारखा प्रकार विकसीत झाला. याच कलाविष्काराचे पुढचे पाऊल म्हणून भित्तीचित्रे आणि रांगोळीसारखे आज कलाप्रकार म्हणून मान्यता पावलेले प्रकार निर्माण झाले.

गोंदणे हा प्रकार स्त्रियांशीच जास्त संबंधित आहे. म्हणजे आजचे फॅशन

हे प्रयोजन सोडल्यास पारंपारिकपणे स्त्रियांनीच अंगावर सामान्यपणे गोंदलेले दिसते. स्त्रियांशिवाय अंगावर गोंदलेले पुरुष हे बहुतेक पुरोहित अथवा मांत्रिक, जादूगार वगैरे असतात.

गोंदणे हा प्रकार स्त्रियांसंबंधित असण्यामागचे कारण माझ्या मते, या प्रकाराचा उदय शेती अवस्थेत झाला. ही मातृप्रधान समाज व्यवस्था. या काळी स्त्रीच टोळीप्रमुख होती, त्याच बरोबर पुरोहितपणाचा आधिकारही तिच्याकडेच होता. साहजिकच कुलचिन्ह अंगावर धारण करण्याचा अधिकार तिचाच होता. पुढे पुरुषप्रधान अवस्थेत तिचे अधिकार पुरुषाच्या हाती गेल्यावर किंवा, त्या हस्तांतरण अवस्थेत पुरुष पुरोहितांना कुलचिन्ह धारण करण्याचा अधिकार प्राप्त झाला आणि इतर स्वरुपांत ते धारण करण्याबरोबरच त्याने ते गोंदवून सुद्धा धारण केले.

गोंदण्यासंबंधी एक समज आमच्या गावात रुढ होता. लहानपणी असे का गोंदून घेतात म्हणून मी प्रश्न विचारले असता, मला वडिलधाऱ्या स्त्रियांनी उत्तर दिले होते, ते म्हणजे, 'जर गोंदण नसताना वर गेले (मरण पावले) तर मला देव विचारणार, खालून (पृथ्वीवरून) काय घेऊन आलीस? जर मी त्याला हे गोंदण दाखवले नाही, तर तो मला नरकात पाठवणार.'

काही आदिवासी समाजातही, अशाच तऱ्हेची एक समजूत आहे. त्यांच्यामध्ये स्त्री मरण पावून स्वर्गात गेल्यावर पितर विचारतात की तू पृथ्वीवर होती याचे प्रमाण म्हणून अंगावरच्या गोंदणाच्या खाणा-खुणा दाखव. जर ती त्या खुणा दाखवू शकली नाही तर तिला भूतयोनीत टाकले जाते.



५०.

# अशौच :
# विशिष्ट अवस्थेत स्पर्शावर घातलेले निर्बंध

आदिम मानवाला जनन आणि मरण या दोन गोष्टीविषयी अतिशय गूढ पडले होते. जननाची सबंध प्रक्रिया बघून त्या मागे कोणातरी अदृश्य शक्तीचा हात आहे, अशी त्याची दृढ समजूत झाली होती. तसेच जन्माला आलेल्या माणसाला मृत्यू सुद्धा अदृश्य शक्तीमुळेच होतो, अशीही त्याची समजूत होती. जननासंबंधीची शक्ती ही अचाट आणि शीघ्रकोपी असली तरी ती विनाशकारक नाही, परंतु मृत्युसंबंधीची शक्ती मात्र विनाशकारक आहे, ती आपल्या संपर्कात आलेल्या माणसाला आपल्याजवळ ओढून घेऊन जाते, त्याच्या आत्म्याला क्लेश देते, त्याच्या घरच्यांनी त्या शक्तीचा योग्य सन्मान केल्यास, तिच्या अटी पाळल्यास ती त्या आत्म्याला मुक्ती देते, नपेक्षा त्याला आपल्या सोबत भूतयोनीत ठेवते, अशीही त्याची समजूत होती.

जनन-मरणाबरोबरच काही विशिष्ट जाती-वंशाच्या लोकांसबंधीसुद्धा एक गूढ आणि भीतीदायक समजूत आदिम मानवाच्या मनात होती. सत्य बघता, सर्वसामान्यपणे त्या काळी एका मानव समूहाच्या मनात दुसऱ्या समूहासंबंधी एक प्रकारचा आकसच होता. आपल्यापेक्षा दुसऱ्या समूहाचा रंग वेगळा, तोंडावळा वेगळा, शरीराची ठेवण वेगळी, त्यांचे खाण-जेवण वेगळे, चाली-रिती वेगळ्या, हे असे का? या संबंधीही त्याच्या मनात गूढच होते. आपला तो वंश चांगला, दुसऱ्याचा वंश हा भूत-प्रेताने किंवा एखाद्या दुष्ट शक्तीने पछाडलेला, अशी त्याची भावना होती. यातूनच दुसऱ्या समूहाच्या जवळ जाण्यास तो घाबरू लागला. आपण त्याच्या संपर्कात आल्यास आपण आपले



**अशौच : एक आदिम धारणा.**

वैशिष्ट्य हरवून बसू, अशीही त्याला भीती होती.

त्या विनाशकारी शक्तीच्या कचाट्यात सापडू नये म्हणून किंबहुना त्या शक्तीपासून आपला बचाव करण्यासाठी मानवाने काही यंत्रे निर्माण केली, तसेच काही निर्बंधही स्वतःवर घालून घेतले. या निर्बंधांतील एक महत्त्वाचा निर्बंध म्हणजे, विशिष्ट स्थितीत किंवा अवस्थेत स्पर्श न करणे.

शौच-अशौच, ज्याला कोकणीत 'आपूड-भश्ट' (शिवाशिव) असे म्हणतात, ही प्रथा जगात सर्वत्र आहे. फ्रेझरनी आपल्या 'द गोल्डन बाव'मध्ये यासंबंधी कितीतरी उदाहरणे दिलेली आहेत. तिचा उदय आदिम काळी मानवाच्या शिकारी अवस्थेत, जेव्हा समाज गूढ शक्तींच्या अस्तित्त्व कल्पनेने भारावलेला होता, त्या काळी झाला. आज या धारणेचा प्रभाव बऱ्याच प्रमाणात सैल झालेला आहे खरा, मात्र आदिम काळी तो खूपच प्रखर होता. आज सगळ्यात जास्त तो आदिवासी समाजात दिसतो. ग्रामीण भागातही तो काही प्रमाणात आहे. शहरी वातावरणात मात्र तो विरळ सापडेल.

स्पर्शावरचे निर्बंध जगात प्रामुख्याने तीन प्रकारचे सापडतात-

१. अशौचीत व्यक्तीला किंवा तिच्या संपर्कात आलेल्या वस्तूला प्रत्यक्ष स्पर्श न करणे.

२. अशौचीत व्यक्तीशी शरीर संबंध (लैंगिक) न ठेवणे.

३. अशौचीत व्यक्तीच्या घरात शुद्धीकरण होईपर्यंत अन्न-पाणी ग्रहण न

करणे.

सर्वसामान्यपणे अशौच पुढील तीन प्रकारे येते, अशी समजूत आहे आणि त्याच्याशी संबंधित धारणा अशा आहेत–

**१. मृत्यूमुळे आलेले अशौच :**

या अशौचाला कोकणी प्रदेशात 'सुतक' म्हणतात. महाराष्ट्रातही या अवस्थेला सुतक असेच संबोधले जाते. मृत्युचे अशौच दहा दिवस पाळले जाते. या दिवसांत घरात कोणतेही शुभकार्य केले जात नाही. चांगले जेवण शिजवले जात नाही, शक्यतो घराबाहेर जात नाहीत. देवासमोर दिवा लावला जात नाही. कुलपुरुषासमोर अंधःकार ठेवला जातो. अकराव्या दिवशी संपर्कात असलेल्या साऱ्या माणसांनी शुद्धीस्नान करावे लागते. साऱ्या वस्तू, भांडी, कपडे इत्यादी धुवावे लागतात, नंतर काही धार्मिक विधी केल्यानंतर अशौच निवारण होऊन शुद्धी होते. हे विधी जाती–जमाती, समाज, प्रदेश, देश या फरकाप्रमाणे बदलतात. गोव्यात सर्वसामान्यपणे आज पंचगव्य शिंपडून, तसेच अग्नीहोम घालून हे शुद्धीकरण केले जाते.

**२. जननामुळे आलेले अशौच :**

याला कोकणी प्रदेशात 'सुयेर' किंवा 'सुवेर' म्हणतात. या दिवसांत घरात कोणतेही धार्मिक कार्य केले जात नाही. परंतु एखादे लग्नादी कार्य आधी ठरवले असेल तर त्यात बाधा उत्पन्न होऊ नये म्हणून त्यावर पर्याय शोधलेला दिसतो. मंडपदेवतेची आधी स्थापना केल्यास नंतर आलेल्या सुतकाचे अशौच बाधत नाही, अशी समजूत आहे. हा पर्याय वैदिक संस्कृतीच्या प्रभावातून आलेला दिसतो. अनार्य संस्कृतीत अशौच कडकपणे पाळले जायचे, अशी माहिती सापडते. सुयेराचे अशौच दहा दिवस पाळले जाते तरी सुद्धा त्यात सुतका एवढे निर्बंध नाहीत. सुयेरात देवापुढे दिवा लावला जातो, किंबहुना नव्या जीवाच्या येण्याचा आनंद म्हणून तो आवर्जून लावला जातो. मात्र, तो अशौच नसलेल्या दुसऱ्या माणसाकडून लावला जातो. हे कार्य खास करून घरच्या भाच्याचे असते. या दिवसांत घरात गोड–धोड बनवण्यावर निर्बंध नाहीत. उलट ते मुद्दाम बनवले जाते. या अशौचात सुद्धा शुद्धीकरणाचे स्नान

करून, संपर्कात आलेल्या वस्तू धुवून, पंचगव्य शिंपडून आणि अग्नीहोम घालून शुद्धीकरण केले जाते. याचे अशौच दहा दिवस मानतात. हे अशौच फक्त बाळंत स्त्रीच्या घरीच (नवऱ्याच्या) पाळले जाते. तसेच बाळंतिणीला तीन महिनेपर्यंत देवकार्य करायला किंवा देवळात जायला मान्यता नसते. दहा दिवसांनंतर ती स्वयंपाक घरात प्रवेश करू शकते. त्या आधी तिला ते करण्यावर निर्बंध असतात. ऋतुमती स्त्रीलासुद्धा अशौचीत मानतात. तिच्या या अशौचीतपणाचा काळ पाच दिवसांचा असतो. या काळात तिला स्वयंपाकघरात तसेच देवघरात जाण्यास मज्जाव असायचा.

सूतक सर्वसाधारणपणे दहा दिवसांचे असले तरी त्यांतही फरक सापडतो. लहान बाळाचे सूतक तीन दिवस पाळतात. दात आलेल्या मुलाचे–दहा दिवस. लग्न झालेल्या मुलीला आई–वडिलांच्या मरणाचे सूतक बारा दिवस, मात्र भाऊ–बहीण, काका–काकी इत्यादींचे तीन दिवस. लग्न केलेल्या मुलीचे आई–वडिलांना तीन दिवस, भावंडांना नाही. एके काळी काही प्रसंगी पूर्ण कुळच किंवा समूहच सूतक पाळत असल्याचे संदर्भ सापडतात. आजही थोड्या फरकाने ही प्रथा दिसते. स्मशानात मयताला गेलेला माणूस बाराव्याचे जेवण जेवल्यानंतरच शुद्ध होतो, अशी समजूत आहे. तरीपण त्याची पूर्ण मुक्ती वर्ष श्राद्धाच्या जेवणाने होते, असे मानतात. तसेच जो माणूस क्रियाकर्म करतो तोसुद्धा वर्षभर अशौचीत उरतो. वर्षश्राद्धाची क्रिया केल्यानंतरच तो पूर्ण शुद्ध होतो, अशीही समजूत आहे. या वर्षभरात त्याला कोणतेही शुभकार्य करायला मान्यता नसते. तसेच मयत माणसाच्या उपवर मुला–मुलीला एक वर्षभर लग्न करायला सुद्धा समाज मान्यता नसते.

मरण हे अदृश्य शक्तीच्या बाधेमुळे होते, तर जननाच्या काळात आणि ऋतुकाळात स्त्रीच्या अंगात एक अदृश्य शक्ती संचार करते आणि ही शक्ती एका विशिष्ट काळापर्यंतच आपला प्रभाव घालून राहते. या धारणेतून या प्रथा जन्माला आल्या. याच मूळ धारणेतून काही विशिष्ट जाती–जमातींना अस्पृश्य मानले गेले. या जमाती अचाट शक्तींच्या सान्निध्यात राहतात किवा त्या शक्ती त्यांना वश असतात, असाही त्यामागे समज आहे आणि याचे प्रमाण म्हणजे या शक्तींची बाधा उतरवण्यासाठी जी तंत्रे केली जातात, ती त्यांच्या हातून केलेली दिसतात.

एकेकाळी दुरून आल्यावर, बाजार किंवा गर्दीच्या ठिकाणावरून आल्यावर बाहेरच्या बाहेर कपडे बदलून हात-पाय धुवून घरात प्रवेश करायची पद्धत होती. मी लहानपणी गावातील सगळ्या वडिलधाऱ्यांना असे वागताना बघितले आहे. आमचे आजोबा ही कपडे बदलल्याशिवाय आम्हाला शिवायला देत नसत. त्यांच्या खोलीत बरेच वर एक खुंटाळे लावलेले होते, त्याला ते आपले हे 'भस्टलेले' (ओवळे) कपडे अडकवायचे, मग दुसरे सोवळे कपडे नेसून बाहेर यायचे. हे काम ते दरवाजा बंद करून पूर्णपणे नग्न होऊन करायचे. (हा शोध आम्हा मुलांना एका दिवशी लागला.)

सोवळ्याच्या मूळ कल्पनेत बराच बदल झालेला आहे. मात्र ही धारणा अजूनही समाजात आपले पाय स्थिरावून आहे आणि ती देवा धर्माच्या कार्याच्या वेळी हमखासपणे ती दृष्टीस पडते. डोक्यावरून आंघोळ करून काहीजण ओलेत्यांनी देवकार्य करतात, तर काहीजण नवे न धुतलेले पूर्णवस्त्र किंवा रेशमी वस्त्र नेसून ते कार्य करतात.

फक्त भट-ब्राह्मण लोकच, स्वतःला उच्चवर्णीय मानून इतरांचा स्पर्श निषिद्ध मानत नव्हते तर एके काळी गोव्यातील हिंदू गावडी-कुळंबी जमातीच्या लोकांमध्येही ही प्रथा होती. याचे एक उदाहरण म्हणून माझे वडील त्यांच्या तरुणपणी घडलेली एक घटना सांगायचे, ती मी येथे देत आहे :

आमोणे गावी म्हणे लग्नकार्य असले तर गावकराच्या (गावडी जमातीच्या) स्त्रिया येऊन जेवण बनवायच्या. कारण गावकार इतरांच्या हातचे जेवण जेवत नसत आणि त्यांना गावचे प्रमुख मानले जायचे. तर मडवळ जातीच्या एका मुलाचे लग्न गोंधळी मुहूर्ताचे होते. वरात रात्री पोहोचली. गावकार स्त्रियांनी ती येण्या आधी जेवण बनवून ठेवले होते. वरातीबरोबर आलेल्या एका नात्यातल्या बाईला गावच्या प्रथेची कल्पना नव्हती. तिने काय जेवण बनवले आहे हे बघण्यासाठी म्हणून जाऊन सोजीचे (गव्हाची खीर) भांडे उघडले. ते एका गावकान्नीने पाहिले. 'जेवण भष्टले' म्हणून तिने आरडा-ओरड केली. मग सारे गावकार लोक रागाने उपाशी निघून गेले. गावकार उपाशी म्हणून गावचे इतर लोक उपाशी गेले. ते उपाशी म्हणून नवरा-नवरीसहीत लग्नघरातील सारेजण त्या रात्री उपाशी राहिले.



५१.

# स्मृतिशेषांच्या जतनातून आत्म्याचे पुनः अवतरण

आत्मा अमर असतो, अशी आदिम काळी मानवाची दृढ भावना होती. सजीवामधील चैतन्याचे मेल्यावर काय होते हे कोडे मानवी समाजाला पूर्णतः सोडवता आलेले नाहीत. आदिम काळी तर तो या प्रश्नाच्या चकव्यांत पुरता अडकलेला होता. मग त्याने आपल्या परीने या प्रश्नातून स्वतःची सोडवणूक करण्यासाठी ज्या गोष्टींच्या कल्पना केल्या ज्या आजतागायत काही अंशी समाजात प्रचलित आहेत.

आत्मा नष्ट होत नाही, तो पुनर्जन्म घेतो ही त्या कल्पनांमधील एक महत्त्वाची कल्पना. या कल्पनेला प्रत्यक्ष रुप देण्यासाठी मग कित्येक धारणा आणि प्रथांचा उदय झाला. मेल्यानंतर माणसाचा आत्मा भूतप्रेतांच्या मेळ्यात सापडतो,

काही कर्मे किंवा यंत्रे संपन्न करून त्याची त्यातून लगेचच सोडवणूक करणे गरजेचे असते, अशी धारणा होती. यातूनच बारावा-तेरावा, किंवा श्राद्धासारखे विधी जन्माला आले.

वाईट शक्तींच्या किंवा भूता-खेतांच्या तावडीतून आत्म्याला सोडवले तरी तो पुनर्जन्म घेईल का? ते सहज शक्य आहे का?... इतके दिवस दुसऱ्या जगात, दुसऱ्या शक्तींच्या ताफ्यांत राहिल्यानंतर त्याला आपल्या कुटुंबियांची ओळख राहील का?... त्याला ते आपले प्रियजन असे वाटेल का?... असे कित्येक प्रश्न मानवापुढे होते. आपले प्रियजन सदाकाळ आपल्या सान्निध्यात असावे, हीसुद्धा एक सुप्त इच्छा या मागे होती.

दुसऱ्या जगात गेलेल्या आपल्या प्रियजनांना आपल्या सान्निध्यात येण्यास

बांधिल करण्याचे एक तंत्र आदिम काळी मानवाने विकसित केले ते म्हणजे त्याच्या स्मृतिशेषांचे जतन. त्या स्मृतिशेषांच्या माध्यमातून मृतात्म्याचे आपल्या कुटुंबियांशी किंवा कुळाशी नाते जोडून राहते आणि तो मृतात्मा त्या कुटुंबात पुनर्जन्म घेतो अशी धारणा त्यामागे होती.

आज जे सांस्कृतिक संदर्भ उपलब्ध आहेत त्या आधारे दोन प्रकारचे स्मृतिशेष जतन करण्याची प्रथा सापडते. एक दगडाच्या स्वरुपात, दुसरी वस्त्रांच्या स्वरुपात. यामध्ये दगडाच्या स्वरुपात मृत माणसाच्या आठवणी जतन करण्याची प्रथा आधीची तर वस्त्रांच्या स्वरुपातली नंतरची.

स्मृतिशेषांच्या जतनाच्या प्रथेचे मूळ मानवी संस्कृतीच्या आरंभ काळी सापडते. एका अरण्यातून दुसऱ्या अरण्यात, शिकारीच्या शोधात वणवण हिंडण्याची अवस्था पार करून, एका जागी स्थिर होताना अदृश्य शक्ती - आत्मा - प्रेतात्मा - अतिमानवी शक्ती-देव इत्यादी संकल्पना एक-एक करून मानवी कल्पकतेतून जन्माला आल्या. याच काळी ही स्मृतिशेषाची संकल्पनाही मानवी मनातून प्रसूत झाली. हा काळ साधारणतः पाषाणकाल होता. याचे प्रमाण गावागावांतून आणि खास करून आदिवासी पाड्यांवर सापडते. इथे जे मूळ पुरुष किंवा कुलपुरुष दैवते सापडतात ती दगडाच्या स्वरुपात आहेत आणि त्यांच्या कुळांचा इतिहास पाषाणयुगाशी नाते सांगतो. गावडी किंवा कुळंबी या गोव्यातील आदिम जमाती. या जमातींच्या कुलपुरुषाला 'जल्मी' (जन्मी) किंवा 'आदी पूर्व' असे संबोधले जाते. तेही दगडाच्या स्वरुपात सापडते. कधी हे दगड (पाषाण) ओबड-धोबड नैसर्गिक स्वरूपात असतात तर कधी गुळगळीत, निमुळते असतात. कधी ते छोटे छोटे असतात, तर कधी माणसाच्या कंबरेपर्यंत पोहचतील एवढ्या आकाराचे असतात. आपल्या मृत आप्तानां दफन केल्या नंतर त्याच जाग्यावर त्यांच्या स्मृतीप्रित्यर्थ एखादा दगड जतन करण्यात आला, आणि त्यांतूनच या प्रथेचा जन्म झाला.

मुख्य जल्म्याच्या किंवा कुलपुरुषाच्या शेजारीच किंवा जवळच कुटुंबाचे इतर जल्मीही स्थापन केलेले सापडतात. म्हणजेच कुळातील इतर मृतांच्या स्मृती पण त्याच जागी जतन करून ठेवण्याची प्रथा होती. यातून मृत पावल्यावरही आपल्याच वडिलधाऱ्यांच्या छत्रछायेत राहण्याची माणसाची भावना स्पष्ट होते. माझ्या शोधयात्रेत मला असे जल्मी माझ्या आमोणे गावात, तसेच काणकोण तालुक्यात सापडले.



**गोधडी किंवा 'कपयाळे' हा स्मृतीशेषाच्या जतनाचा एक प्रकार.**

पाषाणयुगात जगणाऱ्या मानवाकडे या काळी पाषाणाशिवाय स्मृती जतन करण्याचे दुसरे कोणतेच साधन नव्हते, परंतू मानवी विकासाच्या पुढच्या टप्प्यात ज्यावेळी मानवाने वस्त्राचा शोध लावला आणि तो वस्त्र नेसू लागला तेव्हा दगडाच्या जागी 'वस्त्र' मृताच्या स्मृती जतन करण्याचे साधन म्हणून त्याने वापरले. सुरवातीच्या काळी वस्त्रांची वाण होती. त्या वेळी पूर्ण वस्त्र जतन करण्यापेक्षा त्याचा एखादा तुकडाच जपून ठेवणे परिस्थितीजन्य होते आणि ते तसे ठेवले जायचे. माझ्या मते गोधडीची संकल्पना यातूनच जन्माला आली. मृत आप्तांच्या वस्त्रांचे तुकडे हरवू नये किंवा इकडेतिकडे पडू नये, या भावनेतून ते एकाला एक जोडून ठेवण्यात आले आणि मग त्याची 'गोधडी' तयार झाली. पुढे त्याला कलात्मक आविष्काराची जोड मिळाली.

या दोन्हीही प्रथांचे अवशेषरुप आजही पाहायला मिळते. आजही मरण

विधीत स्मशानात पाण्याचे मडके फोडायला वापरण्यात येणारा दगड, मृत माणसाच्या वस्त्राच्या तुकड्यात गुंडाळून येताना घरी आणला जातो. तो घराच्या पागोळ्यात बांधून ठेवला जातो, मग ज्या वेळी अस्थी विसर्जित करतात त्यावेळी त्या वस्त्रासहित तो दगडही विसर्जित करतात.

संस्कृती विकासाच्या पुढील टप्प्यात मृत माणसांच्या नावे देवघरात 'दाम' (धातूचे नाणे, आधी ते तांब्याचे असायचे) ठेवला जाऊ लागला. हे सुद्धा वरील प्रथेचेच अवशेष रुप. इजिप्तमधील ममीची प्रथा हीसुद्धा मृत माणसाच्या स्मृती जतन करण्याचीच प्रथा. थडगी बांधण्याच्या प्रथेमागे सुद्धा हाच भाव आहे.

आजही कित्येक कुटुंबात मेलेल्या माणसाचे एकतरी वस्त्र घरात जतन करून ठेवले जाते. मृत स्त्रीची एखादी साडी ठेवली तर काही काळाने त्या साडीची गोधडीही बनवून ठेवलेली दिसते. ●●●

५२.

# ओटी भरणे : सुफलीकरणाचे एक यात्विक तंत्र

आपल्या साऱ्या जीवन व्यवहाराचे सूत्र स्त्रीच्या आणि भूमातेच्या निर्मिती प्रक्रियेशी जोडलेल्या आदिम मानवाने त्याच्या फलितासाठी तऱ्हेकवार यंत्र-तंत्रे सिद्ध केली. या तंत्रांमधील 'ओटी भरण्याचे' तंत्र आजही समाजात प्रचलित असलेले दिसते. मानवाच्या शिकारी अवस्थेतून पार झाल्यानंतरच्या शेती अवस्थेच्या काळात हे तंत्र उदयाला आले. विपुल धान्य समृद्धी आणि विपुल संतती हे या काळी मानवाचे जीवन लक्ष्य होते.

स्त्री आणि भूमाता या दोघांच्या निर्मिती प्रक्रियेत साम्य जाणवलेल्या मानवाने या काळी स्त्रीला पृथ्वी लोकातील भूमातेची प्रतिनिधी मानून, स्त्रीच्या रुपात तिला पूजली, तसेच तिच्या सुफलीकरणाचे विधी (तंत्रे) स्त्रीच्या हस्तेच संपन्न केले. त्याचबरोबर स्त्रीच्या सुफलीकरण किंवा सृजन विधी-आचारांनीसुद्धा भूमातेची प्रतीके वापरून संतती वृद्धीची कामना केली. यातुतंत्राच्या प्रचंड प्रभावाखाली जीवन जगणारा हा मानवी अवस्थेचा काळ. 'सारख्यातून सारखे जन्माला येते' किंवा 'संपर्कात आलेल्या वस्तूंचा प्रभाव मानवी जीवनावर होतो.' या दोन धारणांनी तो प्रभावित होता. यातूनच स्त्रीच्या सुफलीकरणासाठी त्याने 'ओटी भरणे', यासारखे तंत्र रचले.

'ओटी भरणे' म्हणजे स्त्रीच्या लुगड्याच्या ओच्यात विधीयुक्त काही वस्तू टाकणे (ठेवणे). ओटी भरण्याची प्रथा भारतात बऱ्याच भागांनी आहे. या तंत्रामागचा उद्देश बघता जगात इतरत्र सुद्धा ती असायला पाहिजे. कदाचित भारतातील प्रथेपेक्षा तिचे दृश्य स्वरुप थोडे वेगळेही असेल.



**स्त्रीची ओटी भरण्यामागे संतती प्राप्तीची कामना असते.**

गोवा-महाराष्ट्रामध्ये ओटी भरताना स्त्रीच्या ओटीत म्हणजे ओच्यात खण (कापडही), नारळ आणि तांदूळ ठेवतात. त्याआधी त्या स्त्रीला हळद-कुंकू लावतात, तिच्या केसांत फुले माळतात. उत्तर भारतात स्त्रीची ओटी फळांनी भरतात. ओटी भरण्याचे कार्य अहेव किंवा सुवासिनी स्त्रीकडून केले जाते. घरातील किंवा कुटुंबातील 'म्हालगडी' (प्रमुख) स्त्रीच मुख्यतः हे कार्य करते.

मानवी स्त्रीची ओटी भरण्यामागे संतती प्राप्ती हा उद्देश असल्याने प्रामुख्याने ती लग्नात वधूची भरली जाते. त्याचबरोबर ती स्त्रीच्या गरोदरपणात (पहिलटिणिच्या) पाचव्या महिन्यात, म्हणजे गर्भ धरल्याची खात्री झाल्यावर भरली जाते. मात्र नंतर ती बाळंत होईपर्यंत तिची ओटी भरणे अशुभ मानतात. काही जण पाचव्या महिन्यांत स्त्रीची ओटी भरण्याचा विधी घरच्या घरी लहान प्रमाणात करतात आणि मग नवव्या महिन्यात मोठ्या थाटामाटाने तो परत साजरा करतात. अशावेळी गरोदरपणाची ओटी भरण्याचा सोहळा होतो खरा, मात्र तिच्या ओटीत नारळ ठेवला जात नाही, तसे करणे अशुभ मानतात. एखादे फळ अथवा खाद्य प्रकार आवर्जून ओटीत ठेवतात. हा खाद्य प्रकार मुख्य करून 'लाडू' असतो किंवा 'करंजी' असते. (येथे लाडू हे तिला मुलगा होण्याचे आणि करंजी हे मुलगी होण्याचे लक्षण अशी समजूत आहे.)

ओटी किंवा ओटीपोट म्हणजे स्त्रीच्या बेंबी खालचा पोटाचा भाग. या भागात स्त्रीचे गर्भाशय असते. ओटी भरण्याच्या विधीतून हे गर्भाशय भरते, म्हणजे कार्यरत होते, त्यांत गर्भाची रचना होते, अशी या तंत्रामागची आदिम

समाजाची धारणा होती.

ओटी भरण्यासाठी ज्या वस्तू वापरतात, त्या वस्तूमध्ये नारळाला जास्त महत्त्व आहे. ओटी ठरवतानाच, दोन नारळांची किंवा पाच नारळांची ओटी असे ठरवले जाते. लग्नात नववधूची ओटी पाच नारळांनी भरली जाते. तर इतर प्रसंगी ती दोन नारळांची असते. नारळाचा ओटीकडला संबंध, नारळ हा पुरुष प्रतिक या अर्थाने येतो. या मागे आदिमांचा संपर्क सिद्धांत दिसतो. स्त्रीच्या फलित होण्याच्या कार्यात पुरुषाचा सहभाग अत्यंत गरजेचा हे ज्यावेळी आदिम मानवाच्या लक्षात आले, त्यावेळी या तंत्रविधीत नारळाचा संबंध आला असावा. किंबहुना या तंत्र रचनेमागे हाच उद्देश असावा. म्हणजे पुरुष प्रतिक असलेल्या नारळाचा, स्त्रीच्या ओटीपोटाशी संपर्क आणून तिच्या गर्भाशयात संतती निर्मितीची शक्ती निर्माण करण्याचा त्यांनी प्रयत्न केला असावा. याच कारणासाठी गर्भाची निश्चिती झाल्यावर, म्हणजे पाचव्या महिन्यानंतर नारळाने स्त्रीची ओटी भरण्यावर निर्बंध ठेवलेले असावेत. कारण जी स्त्री आधीच गरोदर असते, तिला परत गरोदर होवो म्हणून तंत्र सिद्ध करणे चुकीचे आणि अशुभाचे द्योतक असते. गरोदर असलेली स्त्री बाळंत होऊन, तिला मूल झाल्यावर, बारशाच्या दिवशी तिची परत खणा-नारळाने ओटी भरतात. तसेच नववधू सासरहून लग्नानंतर माहेरी जाताना (नंतरही) तिला नुसते कुंकू लावतात, तिची ओटी भरली जात नाही, मात्र माहेरहून सासरी येताना तिची ओटी भरण्याची प्रथा आहे, हे सुद्धा सुचक आहे.

ओटी भरण्याच्या या धारणेला पुढे विस्तारित रुप प्राप्त झाले, यातूनच घरी पहिल्यांदाच आलेल्या सुवासिनीची ओटी भरण्याची प्रथा गोवा-महाराष्ट्रांत उदयाला आली. तसेच लग्न-कार्याचे आमंत्रण घेऊन आलेल्या सुवासिनींचीही ओटी भरण्याची प्रथा तयार झाली.

एके काळी मुलीला पहिला ऋतुस्राव प्राप्त झाल्यावर पाचव्या दिवशी तिला विधीयुक्त शुद्धीकरणाचे नहाण घालून तिची पाच सुवासिनींनी ओटी भरण्याची प्रथा होती. गर्भदान विधीतसुद्धा ओटी भरण्याचा भाग असतो.

एखादी स्त्री नवरा जिवंत असता मेली तर तिचीही ओटी भरतात. अशा स्त्रीची ओटी भरण्याचे कार्य हे शुभदायक मानून इतर सुवासिनी त्या कार्याला हिरिरीने पुढे सरसावतात. नवऱ्याच्या मरण प्रसंगीही स्त्रीची ओटी भरली जाते.

मात्र हे कार्य कुटुंबातील एखादी वडिलधारी स्त्री करते, यावेळी ओटीसाठी एकच नारळ वापरतात.

ओटीचे तंत्र स्त्रीदेवतेसाठी (मातृदेवी) सुद्धा वापरलेले दिसते. देवी पुजनाचा एक भाग म्हणून तिची ओटी भरतात, तर कधी स्त्रिया नवस बोलून किंवा संतती प्राप्तीसाठी सुद्धा तिची ओटी भरतात (ओटी देतात). देवीची ओटी ही पारंपारिकपणे पाच नारळांची असते, परंतु स्थितीनुसार कधी दोन नारळही वापरलेले दिसतात. देवीसाठी असलेल्या ओटीसाठी खास पद्धतीचे खण-कापड वापरण्याची प्रथा आहे. हे मुख्यतः सुती कापडापासून बनवलेले, जरी काठाचे, तसेच प्रामुख्याने लाल, हिरव्या आणि पिवळ्या, अशाच रंगाचे असते. पूर्वीच्या काळी ओटीचे सामान पारंपारिक पद्धतीने सुपात (योनीप्रतीक) ठेवले जायचे. सुपातूनच ओटी भरली जायची. आज फक्त देवीचीच ओटी सुपातून भरलेली दिसते, तीसुद्धा काही ठराविक गावातच.

ओटी भरण्याची पारंपरिक पद्धत आहे. जिची ओटी भरायची तिला आधी फूल-कुंकू करतात. नंतर ओटी भरणारी आपल्या हाताच्या ओंजळीत खणासहीत नारळ घेऊन, खालून सुपातील किंवा तबकातील थोडे तांदूळ पकडते. मग त्या तांदळांचा 'शिंवर' (वर्षाव) जिची ओटी भरायची तिच्या ओटीत करते. असे लागोपाठ चार वेळा केले जाते. पाचव्या वेळेला खणासहीत तो नारळ तिच्या ओटीत ठेवला जातो. शेवटाला थोड्याशा तांदळांचा वर्षाव तिच्या डोक्यावर करून आणि काही तांदूळ तिच्या कपाळाला चिकटवून विधी संपन्न केला जातो. ओटी भरण्याला 'शेंसर करणे' असेसुद्धा संबोधले जाते. डोक्यावरून तांदूळ शिवरण्यावरूनच ही संज्ञा पडली असण्याची शक्यता आहे.

संतती आणि धान्य समृद्धीचे आदिमकाळी उदयाला आलेले ओटी भरण्याचे तंत्र आजही ग्रामीण भागांत मोठ्या प्रमाणात तसेच लग्न-जन्म संस्कारांत न चुकता सिद्ध केलेले दिसते.

●●●

# संदर्भ ग्रंथ

(मराठी)
१. कोळेकर, वैदेही : मराठी लोककथा- स्वरुपमीमांसा, औरंगाबाद, सविता प्रकाशन, १९८७.
२. खेडेकर, विनायक विष्णु : लोकसरिता , पणजी, गोवा कला अकादमी, १९९३.
३. गाडगीळ, स. रा. : वैदिक यज्ञ, मध्ययुगीन तंत्रसाधना आणि ज्ञानेश्वर प्रणीत भक्तीयोग, पुणे, दास्ताने रामचंद्र आणि कं., १९७९.
४. गाडगीळ, स.रा. : लोकायत, मुंबई, लोकवाङ्मय गृह प्रा. लि.,१९८७.
५. गोडसे, दत्तात्रय गणेश : लोकधारा, मुंबई, प्यॉपुलर प्रकाशन, १९७९.
६. जोशी, पं. महादेवशास्त्री : भारतीय संस्कृती कोश- खंड १ ते १०, भारतीय संस्कृती कोश मंडळ, पुणे, (दुसरी आवृत्ती) , १९८२.
७ ढेरे रा. चिं : लज्जागौरी , पुणे, श्रीविद्या प्रकाशन, १९८८.
८. दांडेकर, मालती : लोककथा कल्पकता , पुणे , सुगावा प्रकाशन, १९८२.
९. भवाळकर , तारा : लोकसंचित , पुणे , राजहंस प्रकाशन, १९८९.
१०. भागवत , दुर्गा : धर्म आणि लोकसाहित्य , मुंबई, प्यॉपुलर प्रकाशन, १९७५.
११. भागवत, दुर्गा : लोकसाहित्याची रुपरेखा , पुणे , वरदा बुक्स, १९७७
१२. मांडे, प्रभाकर : लोकसाहित्याचे अंतः प्रवाह, पुणे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, १९७५.
१३. राजवाडे वि.का. : भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास, पुणे, प्रागतीक पुस्तक प्रकाशन, १९७६
१४. राजस, वसंत : देवदासी – शोध आणि बोध , पुणे, सुगावा प्रकाशन, १९९७.
१५. संगवे विलास : सामाजिक मानवशास्त्र, मुंबई, प्यॉपुलर प्रकाशन, १९६९.

१६. सातोस्कर, बा. द. : गोमन्तक-प्रकृती आणि संस्कृती, खंड-१, २, पुणे, शुभदा सारस्वत,१९७९.
१७. साळुंके, आ.ह. : हिंन्दू संस्कृती आणि स्त्री, (चौथी आवृत्ती), मुंबई, लोकवाङमय गृह प्रा. लि., २००१.
१८. हीरक महोत्सव समिती : गोमन्तकाची प्रतिमा, खंड पहिला, पणजी, संचालक समिती, श्री सरस्वती मंदिर, १९७३.

**(कोंकणी)**

१९. नायक, जयंती : आमोणें- एक लोकजीण, पणजी, गोवा कोंकणी अकादेमी,१९९३.
२०. नायक, जयंती : पेडणेचो दसरो , पणजी, गोवा कोंकणी अकादेमी,१९९५.
२१. नायक, जयंती : लोकबिंब , पणजी, गोवा कोंकणी अकादेमी,१९९८.
२२. नायक, जयंती : लोकरंग , केपे, राजाई प्रकाशन, २००८.
२३. राव, आर. के. : गोड्डें रामायण, कोची, कोंकणी भाशा इन्स्टिट्यूट, १९९३

**(English)**

24. Banerjee, Projesh : Apsaras in Indian Dance, New Delhi, Cosmo Publication, 1982.
25. Basham, A. L. : A cultural History of India, Rupa & Co., 1992.
26. Bhattacharyya , Narendra Nath: History of Indian Erotic Literature,, New Delhi, Munshiram Manoharlal Publishers Pvt. Ltd., 1980.
27. Bhattacharyya , Narendra Nath: Indian Puberty Rites,(Second Edition), New Delhi, Munshiram Manoharlal Publishers Pvt. Ltd., 1980.
28. Dhume Sinai, Anant Ramkrishna : The Cultural History of Goa, Panaji, Dr. Anant Ramesh Dhume, Kamala Nivas,1985.
29. Enthoven, R. E. : The Folklore of Bombay, New Delhi, Asian Educational Services, 1990.
30. Gaster Theodar H. : The New Golden Bough , (The New Abridgment of the Classic work by Sir James George Frazer), New York, the American Library, 1959.
31. Reddy Rami V.: Neolithic and Post-Neolithic Cultures, New Delhi, Mittal Publications, 1991.

●●●

# लेखिकेची प्रकाशित पुस्तके

**कथा**

१. गर्जन (१९८९, २००८)
२. अथांग (२००२)
३. मातयेची व्यथा (वेंचीक कथा, २०१७)
४. आर्त (२०१९)

**नाटक**

१. कुकमादेवीची दिपमाळ (२००९)
२. काळमाया (२०१४)

**कविता**

१. मिर्गवेणो (२०२०)

**बालसाहित्य**

१. वागमामाची फजिती (२००२)
२. चड शाण्याक फातराचें शीत! (२००१)
३. नवरंगी फूल (२००२)
४. भुरग्यांखातीर लोककाणयो (२००२)
५. सानुल्यांचीं कवनुलां (२००४)
६. गोंयची लोककला (२००४)

**लोकवेद**

१. रथा तुज्या घुडयो (१९९२)
२. कणेर खुंटी नारी (१९९३)
३. मानालीं गीतां (१९९३)
४. तळय उखल्ली खेळ्यांनी (१९९३)
५. आमोणें – एक लोकजीण (१९९३)
६. पेडणेचो दसरो (१९९५)
७. नागशेराचे सूर (१९९६)
८. लोकबिंब (१९९८)
९. कोंकणी लोककाणयो (२०००, २००५)
१०. कलेंची बनवड (२००२)

११. गांवरान (२००५)
१२. राजरत्नां (२००५)
१३. लोकरंग (२००८)
१४. लोकमंथन (२००८)
१५. देशांतरीच्यो लोककथा - भाग - १ (२०१३)
१६. देशांतरीच्यो लोककथा - भाग - २ (२०१७)
१७. देशांतरीच्यो लोककथा - भाग - ३ (२०१७)

**व्यक्तीचित्र :**

१. म्हजी माती, म्हजीं मनशां (२०१५)

**अनुवाद**

१. सोरपाची करामत (१९९८, मूळ : इंग्लीश - रस्कीन बाँड)
२. विसर्जन (२०१२, मूळ बंगाली : रवींद्रनाथ टागोर)
३. जिन्दगीनामा (२०१५, मूळ हिन्दी : कृष्णा सोबती)

**मराठीत अनुवाद**

१. मृदवेणा ('मिर्गवेणो' कवितासंग्रह, २०१५, अनुवादक : डॉ. सिसिलिया काव्हाल्यो)

**इंग्रजीत अनुवाद**

१. The Salt of the Earth
('मातयेची व्यथा', २०१६, अनुवादक : आगुस्तो पिंटो)

**संकलन-संपादन**

१. गोवा कोंकणी अकादेमीचीं २५ वर्सां (२०१०)
२. अखिल भारतीय कोंकणी साहित्य संमेलनाचीं अध्यक्षीय भाशणां (२०१६)
३. अखिल भारतीय कोंकणी परिशदेच्या अध्यक्षांचीं भाशणां (२०१६)
४. संजीव - संचीत (संजीव वेरेंकार हांच्या साहित्याचें विवेचन)

**लिप्यांतर**

१. Venchik Lokkanio (२००८, लिपयांतर : फेलिसियु कार्दोज)
२. Gorjan (रोमी लिपींत, २०१८, लिपयांतर : एस्. एम्. बोर्जीस)

●●●

## लेखिकेला प्राप्त झालेले पुरस्कार

१. कोंकणी भाशा मंडळ, गोवा - साहित्य पुरस्कार (गर्जन, १९८९)

२. जनवाहिनी मांडसोभाण, मंगळूर - लोकवेद पुरस्कार (जीवन गौरव, १९९८)

३. डॉ. टी. एम. ए. पै फाउंडेशन, मंगळूर-उत्कृष्ट कोंकणी पुस्तक पुरस्कार (कोंकणी लोककाणयो, २०००)

४. कला अकादमी, गोवा-साहित्य पुरस्कार (अथांग, २००२)

५. साहित्य अकादमी, दिल्ली-साहित्य पुरस्कार (अथांग, २००४)

६. गोंवा राज्य सन्मान - कला आनी संस्कृती संचालनालय, गोवा सरकार (साहित्य सन्मान, २००७)

७. यशोदामिनी पुरस्कार - महिला आणि बाल कल्याण संचालनालय, गोवा सरकार (साहित्य सन्मान, २००९)

८. उत्कृष्ट नाट्य पुस्तक पुरस्कार - कोंकणी कला साहित्य केंद्र, कुडचडे (कुकमादेवीची दिपमाळ, २०१०)

९. उत्कृष्ट साहित्य पुरस्कार - कोंकणी भाशा प्रचार सभा, कोचीन (कुकमादेवीची दिपमाळ, २०१०)

१०. लोकवेद कार्य - जीवन गौरव पुरस्कार - दाल्गाद कोंकणी अकादमी, पणजी (२०१०)

११. शणै गोयबाब संशोधन पुरस्कार - वावराड्यांचो इश्ट, पिलार (जीवन गौरव, २०१६)

१२. जेसी फोंडा संस्थेचा लोककलेच्या संशोधन कार्यासाठी 'नक्षत्र' पुरस्कार (जीवनगौरव, २०१७)



**डॉ. जयंती नायक**

- गोमंतकातील लोकसाहित्याची साक्षेपी अभ्यासक . गेल्या तीन दशकांत लोकसंस्कृती आणि लोकसाहित्याच्या संशोधन क्षेत्रात बहुमुल्य कार्य. गोव्यातील खेडोपाडी, डोंगर-कपारी फिरून वेगाने नामशेष होत जाणाऱ्या लोकसंस्कृतीच्या विवीध प्रकारांचे संवर्धन करण्याच्या कार्यांत आघाडीवर. 'लोकसंस्कृती', 'मातृप्रधान संस्कृती' आणि 'स्त्रीजीवन' हे त्यांच्या संशोधनाचे प्रमूख विषय. प्रथा-परंपरांच्या मुळाकडे जाऊन त्यांच्या उगमाच्या प्रयोजनाचा मागोवा घेणे हा त्यांच्या अभ्यासाचा अंतःस्थ भाव. याच प्रेरणेतून *'कोंकणी लोकसाहित्यातील स्त्रीची प्रतीमाः एक सामाजिक-सांस्कृतिक अभ्यास'* या विषयात विद्यावाचस्पती पदवीसाठी संशोधन (कोकणी, २००५). गोमंतकीय आणि पर्यायाने कोकणी लोकसंस्कृतीवर, कोकणी, मराठी आणि इंग्लीश भाषेतून विपूल लेखन. लोकसंस्कृती विषयावर आतापर्यंत १७ पुस्तके प्रकाशीत, तसेच पन्नासावर शोधनिबंध सादर.
- कोकणी भाषेतील सुप्रसिद्ध साहित्यिका. सर्जनशील साहित्याची मुख्यतः लोकसांस्कृतिक दृष्टीकोनातून निर्मिती. कथा, कविता, नाटक, निबंध, बालसाहित्य अशा प्रकारात लेखन. अनुवाद आणि संपादनाचेही कार्य. गोवा कोकणी अकादेमी प्रकाशीत 'अनन्य' या सहामाही साहित्य पत्रिकेची संपादक.
- लोकसंस्कृतीच्या कार्यासाठी 'जनवाहिनी लोकवेद पुरस्कार' (मांड सोभाण, मंगळूर-२००९), 'लोकवेद संशोधन पुरस्कार' (दाल्गाद कोकणी अकादेमी - २०१०), 'शणै गोंयबाब संशोधन पुरस्कार' (वावराड्यांचो इष्ट , पिलार २०१६) आणि 'नक्षत्र पुरस्कार' (जेसी फोंडा, २०१७) अशा पुरस्काराने सन्मानित.
- सर्जनशील साहित्याच्या कार्यासाठी राज्य तसेच राष्ट्रीय स्थरावरच्या कित्येक पुरस्कारां सोबत प्रतिष्ठेच्या केंद्रीय साहित्य अकादमी पुरस्काराने सन्मानित (अथांग कथासंग्रह, २००४).
- गोवा कोकणी अकादेमीत लोकवेद संशोधिका म्हणून कार्यरत.

(संपर्क: पत्ता:- घर क्र. ८४, आमोणे, केपे, गोवा; मो. ९८२३५७५६२३; Email- jaynaikamona@gmail.com)




मूल्य : ₹ २००/-